# गोदू गोखले

## प्रकरण १ लें

## कैफियतीची सुरवात

तालुक्याच्या गांवांतील मामलेदाराचा दर्जा केवढा मोठा असतो, ह्याची कल्पना शहरच्या लोकांना होणार नाहीं. मामलेदार ह्मणजे जवळ जवळ तालुक्याचा राजाच असतो. अधिकारी वर्गांत तालुक्यातील अधिकारी ह्मणजे एक मामलेदार आणि एक मुन्सफ. तालुक्यांतील लोक मुन्सफाबद्दल फार मोठा आदर बाळगतात, पण मामलेदाराला मात्र प्रत्येकजण थरकांप मीतो. तालुक्यापुरती पाहिली तर मामलेदारची शक्ती अमोघ असते. मुन्सफाला सुद्धां वेळीं प्रसंगीं मामलेदारापुढें मान वांकवावी लागते.

अशा तालुक्याच्या एका मामलेदाराची मी मुलगी. एवढा अमोघ अधिकार असणाऱ्या अधिकाऱ्याच्या मुलांना गांवांतील लोक किती मान देतात, ह्याची कल्पना फक्त तालुक्यांतील लोकांनाच होईल. प्रत्यक्ष मामलेदारांना जरी कुणी भीत नसले, तरी त्यांच्या मुलांना सर्वजण वचकून असतात. त्यांतून तो मामलेदारच जर करडा अंमलदार असला, तर त्याचीं मुलें किती बेदरकार होऊं शकतात, ह्याची कल्पना अशा बापांच्या माझ्यासारख्या मुलीलाच करतां येईल.

चिपळूण तालुका ह्मणजे रत्नागिरी जिल्ह्यांतील एक बराच मोठा तालुका आहे. लोकसंख्येच्या मानानें ह्या तालुक्याचा जिल्ह्यांत दुसरा नंबर आहे. समृद्धीच्या दृष्टीनें पाहिलें तर त्या काळांत ह्या तालुका पहिल्या नंबरचा होता. तो दर्जा कदाचित् आज राहिला नसेल, पण व्यापाराची उतारपेठ ह्या नात्यानें कोंकणप्रांतीं चिपळूण तालुक्याला त्या वेळीं फारच महत्व होतें. घांटावरचा बहुतेक सगळा माल कुंभार्ली घांटातून कऱ्हाडपाटणमार्गे चिपळूणांत येत असे आणि अजूनही येतो.

ज्या काळांत मी चिपळूण गांवीं होतें, त्या काळांत चिपळूणचें व्यापारी महत्व हळू हळू कमी होऊं लागलें होतें. कच्छ काठेवाडचा माल जलमार्गानें दामोळ खाडींतून चिपळुणास उतरून पूर्वी जो घाटावर पाठविला जात असे, तो रेल्वेचें दळणवळण दक्षिण महाराष्ट्रांत वाढूं लागल्यापासून परभारें रेल्वेमार्गें मुंबईहून जाऊं लागला होता. मालाच्या वाहतुकीला जलमार्ग खर्चाच्या दृष्टीनें जरी फार फायद्याचा होता, तरी वाऱ्याच्या शक्तीवर अवलंबून राहाणाऱ्या गलबतापेक्षां निश्चितपणें मुक्काम गांठणारा रेल्वेचा मार्ग वाहतुकीच्या दृष्टीनें व्यापाऱ्यांना जास्त फायदेशीर वाटूं लागला होता.

चिपळूणच्या वखारी हळुहळू बंद पडत होत्या. कच्छकाठेवाडचे कोठिये चिपळूणच्या बंदरांत दिवसेंदिवस कमी प्रमाणांत येऊं लागले होते. तरीही गतवैभवाच्या अभिमानाच्या जोरावर चिपळूणचे व्यापारी त्या काळांतही छाती पुढें करून चालत असत.

संध्याकाळच्या वेळीं माझे वडील मला बरोबर घेऊन ज्यावेळीं नदीकांठीं फिरावयास जात असत, त्या वेळीं रस्त्यावर असणाऱ्या वखारींतील भाटिये व्यापारी गादीवरून खालीं उडी टाकून आह्मांला खडी ताजीम देण्यासाठीं सरसावत असत.

एकाद्या दिवशीं माझे वडीलही एकाद्या बड्या व्यापाऱ्याच्या वखारींत घटका दोन घटका पायधूळ झाडण्याची तसदी घेत असत. अशा वेळीं त्या व्यापाऱ्याला फार मोठा अभिमान वाटे. आम्हीं वखारींत बसलों, आणि त्यावेळीं केवढेंही मोठें गिऱ्हाईक आलें, तरी त्या व्यापाऱ्यानें त्याला नुसत्या डोळ्यानेंच दरडावणी दाखवावी. तेवढ्यानें तो नच समजला, तर हळूच त्याच्या कानाशीं लागून त्यानें म्हणावें, कीं, "रावसाहेब बसले आहेत, दिसत नाहीं का तुला ?" गांवचें कोणतेंही गिऱ्हाईक एवढ्या दरडावणीनें थंडावत असे. पण परगांवचा एकादा आडमुठा घांटी व्यापारी जर फाजिल जिद्द करूं लागला, तर त्या व्यापाऱ्यानें म्हणावें कीं, "जा, दुसऱ्या वखारींत जा. रावसाहेब बसले असतां तुझ्याशीं हुज्जत घालायला मला वेळ नाहीं. राव साहेब इथं बसले आहेत हें सांगूनही ज्याला कळत नाहीं, त्याच्याशीं सौदा आम्हांला नको. खुशाल दुसऱ्या वखारींत जा."

एवढयानेंही न ऐकण्याजोगें गिऱ्हाईक लोंचट असलें, तर त्याला धक्की
ऊन बाहेर घालवण्यांत येत असे.

जेव्हां जेव्हां मी बाबांबरोबर वखारींत जात असें, त्या वेळीं असा
दा दुसरा प्रसंग घडला नाहीं, असें बहुधा होत नसे. माझ्या बाबांशीं
रींतील लोकांची वर्तणूक अर्थातच फार अदबीची असे. त्यांत मला कांहीं
श्चर्य वाटत नसे. गांवचे लोक घरीं आले, तर बाबांच्यासमोर खुर्चीवर सुद्धां
त नसत आणि खेडेगांवचा कुणी आला तर, खुर्चीवर बसण्याचें तर दूरच
, पण नुसता सतरंजीवर सुद्धां बसत नसे. मग तो कितीही मोठा असेना,
तोहि श्रीमंत असेना, त्याच्या गांवांतील लोक त्याला थरकांप भीणारे
ले, तरी रावसाहेबांच्या घरीं आल्यावर तो खेडेगांवचा कर्दनकाळ स्तोत
जी सोडून जमिनीवर एकाद्या कोपऱ्यांत बसत असे. ह्या गोष्टीचें जरी
विशेष महत्त्व वाटे, तरीही व्यापाऱ्यांचें माझ्या बाबांशीं होत असलेलें
ा पाहून माझ्या मनावर फार परिणाम होत असे.

हाताखालचे नोकर वरिष्ठांना केव्हांही मान देणारच. गांवांतील लोकांनीं
ाधिकारी मामलेदाराचा दरारा बाळगला, तर त्यांतही कांहीं आश्चर्य नाहीं.
गांवचीं माणसें बोलूनचालून बावळींच-कायदा म्हणतांच चूरमार होऊन
ारीं-तींही अंमलदाराला घाबरलीं तर त्यांत कांहीं आश्चर्य नव्हतें. पण
लेदारसाहेब नुसते खुर्चीवर येऊन बसले म्हणजे आलेलें गडगंज गिऱ्हा-
देखील व्यापाऱ्यानें धुडकावून लावावें, ह्याचाच मला मोठा चमत्कार वाटे.
आणि त्यामुळेंच बाबांचें महत्त्व माझ्या मनांत पूर्णपणानें प्रतिबिंबित होत
अशा मोठ्या शक्तिशाली बापाची मी मुलगी, ह्याची जाणीव मला
दीं होत असे.

आधींच आईबापांच्या फाजील लाडानें मी थोडीशी शेंफारून गेलेली असें.
ून कचेरींतील पटेवाले आणि कारकून माझी मर्जी संपादन करण्यासाठीं
अट्टाहास करीत असत, त्याचा माझ्या मनावर एक विलक्षण प्रकारचा
ााम झाला होता. बाबांना खूष करण्यासाठीं माझ्या वेड्यावाकड्या चाळ्याचें
ल हे लोक ज्या वेळीं कौतुक करीत, त्या वेळीं मला माझ्या महत्वाची
ीव वाटत असल्याचें प्रत्यक्ष दिसून येई.

एके दिवशीं खुद्द कोतवालाच्या तोंडात मीं भडकाविली. प्रत्यक्ष बाबांच्या समोर ही गोष्ट घडली. बाबांनीं तिचें कौतुक केलें. तोंडभर हंसून कोतवालसाहेबांनींही बाबांच्या कौतुकाला साथ दिली. मी अधिकच शेफारून गेलें, आणि कोतवालसाहेबांच्या लांब मिशा जोरानें उपटल्या. डोळ्यांतून पाणी येऊं लागलें तरीही कोतवालसाहेब रडक्या तोंडानें गालभर हंसत होते.

त्या वेळीं बाबांनींही मला दटाविलें नाहीं आणि कोतवालसाहेबांनींही आपली नाराजी दाखवली नाहीं. बाबांचें कौतुक कांहींच नव्हे, इतकें माझें मलाच कौतुक वाटूं लागलें.

त्या दिवसापासून माझ्या व्रात्यपणाची कमाल हळूहळू चढतच जाऊं लागली. माझें वय त्या वेळीं आठ वर्षांचें होतें. पण वाटेल तेवढ्या मोठ्या माणसाचा वाटेल तसा अपमान करण्यास मला कधींच संकोच वाटला नाहीं.

माझ्या व्रात्यपणाला बाबांचा पुरा पाठिंबा असे. पण माझी आई मात्र माझ्या वर्तनावर नाराज होत असावी, असें माझ्या बालबुद्धीला वाटत असे. तिनें मला कधींच दटावलें नाहीं. मार देण्याचें तर दूरच राहो, पण ती कधीं रागाच्या शब्दानेंसुद्धां मला बोलली नाहीं. तरीही मला वाटत असे, कीं माझें वर्तन माझ्या आईला आवडत नाहीं. मी कितीही व्रात्यपणा करीत असलें आणि आई समोर आली, तर एका क्षणांत मी विरघळून जात असें. माझी मलाच लाज वाटे. तसें कां व्हावें ह्याचा मला उलगडा होत नसे खरा, पण समोर आई आली आणि मीं व्रात्यपणा चालू ठेवला असें कधींही होत नसे.

आठ वर्षांच्या वेळेपासून माझी कथा मी सांगत आहें खरी, पण त्यापूर्वींच्या गोष्टी माझ्या ध्यानांत नाहींत असें नाहीं. पण त्यांत कांहीं वैशिष्ट्य नव्हतें. चिपळूणला यायच्या पूर्वीं बाबा बेळगाव जिल्ह्यांत कलेक्टरचे हेडक्लार्क होते. त्या वेळचा त्यांचा पगार जवळजवळ मामलेदाराच्या पगाराइतकाच होता—दर्जाही कांहीं अगदींच सामान्य नव्हता—पण ती मामलेदारी नव्हती. कलेक्टर ऑफिसांतील पटेवाल्यांपैकीं एकादा पटेवाला आमच्या घरीं दिवसांतून कांहीं वेळ येत असे, पण तो 'आमचा' पटेवाला नव्हता. हातीं अधिकार होता, पण तो दुय्यम प्रतीचा होता. लोक घरीं येत असत, पण ते बहुतेक बरोबरीच्या नात्यानें वागत असत. त्यामुळें अधिकाराच्या जाणिवेनें येणारा बेफामपणा बाबांच्या ठायीं आला नव्हता. अर्थातच त्याची झळ मलाही लागली नव्हती.

इतर चार कुटुंबांतील साधारण सुखवस्तु गृहस्थ ज्या दर्जानें रहात असत, त्याच दर्जानें माझे बाबाही रहात होते. त्यामुळें शेजारपाजारच्या कुटुंबांतील मुलांपेक्षां माझ्या वृत्तींतही कांहीं फरक झाला नव्हता.

म्हणूनच मीं म्हटलें, कीं त्या पूर्वीचा इतिहास फारसा महत्वाचा नव्हता. सुखवस्तु कुटुंबांतील इतर चार मुलांची जी हालहवाल, तीच माझी. सकाळीं उठायचें, शाळेंत जायचें, जोडीला दंगेखोर मुलें असलीं तर शाळेंतही थोडी गडबड करायची, शांत मुलें असलीं तर त्यांच्यासारखेंच शांत रहायचें, दहा वाजतां घरीं यायचें, जेवण झाल्यावर जरा इकडे तिकडे बागडायचें, पुन्हां दोन वाजतां शाळेंत जायचें, सहा वाजतां घरीं यायचें, पुन्हां थोडें शेजारच्या मुलांशीं खेळायचें आणि रात्रीं जेवण झाल्यावर झोंपी जायचें. यापेक्षां माझ्या नित्यक्रमांत फारसा फरक नसे. रविवारच्या दिवशीं जेवढा कांहीं उनाडपणा करतां येईल, तेवढाच काय तो फरक.

माझ्या बालपणांत बाबांचाही आयुष्यक्रम माझ्याइतकाच ओसल्यासारखा असे. वर्षाचे आठ महिने त्यांना कलेक्टरच्या स्वारींत हिंडावें लागे, आणि ज्या वेळीं ते घरीं असत, त्यावेळीं त्यांना कामाचा इतका बोजा असे, कीं मला घटकाभर मांडीवर घ्यायलाही त्यांना फुरसत नसे. त्या काळांत बाबांचा आणि माझा फारसा जिव्हाळ्याचा परिचय नव्हता म्हटलें तरीही चालेल. माझी फुणफुण असायची ती केवळ आईभोंवतीं. पण आईचा स्वभाव इतका शांत असे, कीं माझ्या त्या फुणफुणीनें ती कधींही सतावून गेली नाहीं.

माझ्या आठवणीपासून माझा स्वभावच मोठा हट्टी. शक्य तेवढें करून दुसऱ्याला कसा त्रास द्यावा आणि कसें सतावून सोडावें, ह्याचेच विचार माझ्या डोक्यांत चालत असत. बाबा घरीं क्वचितच असत. पण आईच्या मनावर माझ्या व्रात्यपणाचा कांहींच परिणाम होत नसल्यामुळें मी मोठी नाराज असें. शेजारची मुलें माझ्या चाळ्यामुळें सतावून जात असत. शाळेंत एकट्या माझ्यामुळें वर्गाच्या मास्तरांना तोंड चालवावें लागत असे. घरीं येणाऱ्या पाहुण्यांच्या कांहीं ना कांहीं तरी खोड्या केल्यामुळें त्यांच्या हातचाही क्वचित् प्रसाद मिळत असे. पण मी कशीही वागलें, तरी आई माझ्यावर कधींच चिडून जात नसे.

दादा माझ्यापेक्षां चार वर्षांनीं मोठा. त्याला पदोपदीं आईनें रागें भरावें, पण मला कधींच काहीं बोलूं नये, ह्याचें दादाला सुद्धां वैषम्य वाटत असे. एखाद्या दिवशीं आई रागावली, तर त्यानें म्हणावें कीं, "गोदीनें कितीही दंगा केलेला तुला चालतो, पण माझं जरासं कुठं चुकलं, तर मला फाडफाड बोलतेस. असं मीं काय केलं आहे ?"

"आज तुला तें कळायचं नाहीं. पोरीची, जात थोड्या वर्षांनीं सासरीं जाईल, मायेच्या घराला पारखी होईल, पण तुझं तसं नाहीं. तुला इथं रहायचं आहे, अभ्यास करायचा आहे, पुढं आमची सेवा करायची आहे. ह्याच घरीं तुला रहायचं आहे, आमच्या बरोबरच रहायचं आहे. आम्ही कशीं वागतों हें तुला कळलं पाहिजे. आमच्याशीं कसं वागायचं हेंही तुला कळलं पाहिजे. तरच हा जोडीचा संसार साजरा होईल. गोदीचं काय, उद्यां सासरीं जाईल, तेव्हां तिथं कसं वागायचं ते आपोआप शिकेल. आज आम्ही तिला एक वळण लावलं, आणि उद्यां तिच्या सासरचं वळण मलतंच असलं, तर तिचा संसार सुखाचा व्हायचा नाहीं. म्हणून तिला मी आज बोलत नाहीं." असें आईनें उत्तर द्यावें.

मी त्या वेळीं लहान होतें खरी, पण आईच्या तोंडचा प्रत्येक शब्द अगदीं मनाशीं टिपून ठेवीत असें. त्या प्रत्येक शब्दाचा माझ्या मनावर फार परिणाम होत असे. आधींच माझी आई फार मितभाषणी होती. आणि त्यातून माझ्या बाबतींत तर ती बहुधा कधीं बोलतच नसे. दादाला सुद्धां बोलायचें, तेंही वारंवार नसे. त्यामुळें ती केव्हांही काहीं बोलली, तरी त्याचा ठसा माझ्या मनावर कायम रहात असे.

दादाला जरी ती फारशी बोलत नसे, तरी ज्या वेळीं बोले, त्या वेळीं दादा चिडून जात असे. त्याचा स्वभावच मोठा चिडखोर होता. मुलगी असूनही माझें कोडकौतुक होतें आणि त्याला वारंवार बोलणीं ऐकावीं लागतात, ह्याचा त्याच्या मनावर उलटा परिणाम होत असे. त्यानें माझ्याशीं जरी दावा धरला नाहीं, तरी माझ्याशीं तो कधींच मोकळा झाला नाहीं. त्याला माझा मत्सर वाटत नसे, पण परकेपणाची भावना मात्र त्याच्या मनांत दिवसें दिवस वाढत जात होती. शेजारच्या इतर मुलांशीं तो मिसळत असे, खरा, पण

माझ्याशीं तितकाच फटकून वागत असे. ह्या गोष्टीचा माझ्या मनावरही उलटा परिणाम होत होता.

आधींच माझा स्वभाव थोडा हट्टी—थोडा चढेल—त्यांतून आईची फूस—बाबांचें दुर्लक्ष आणि दादाचा परकेपणा, ह्या सर्व गोष्टीमुळें मी एक प्रकारे भरल्या घरांत एकलकोंडी झालें होतें. शेजारच्या मुलांशीं मी मोकळ्या मनानें बोलत असें, पण घरीं येतांच माझा एकलकोंडेपणा जागा होई. आई मला प्रेमानें वागवीत असे खरी, पण तिच्या गंभीरपणामुळें अंतःकरण मोकळें करून तिच्याशीं बोलावें असें मला कधींच वाटलें नाहीं. आईच्या बद्दल मला आदर होता, पण प्रेम नव्हतें. जिव्हाळ्याचा ओलावा नव्हता. तसला जिव्हाळ्याचा ओलावा हृदयांत उत्पन्न व्हावा आणि तिथल्या तिथेंच सुकून जावा, अशी माझी बाळपणची अवस्था होती.

चिपळूणला येतांच ही वृत्ति बदलली. चोहींकडून पदोपदीं माझें कोडकौतुक होऊं लागलें, बाबांनींही त्याला भर दिली, आईनें कधीं विरोध केला नाहीं आणि शाळेच्या अभ्यासामुळें दादाचा सहवास दुरावला गेला. अंतःकरणांत जो जिव्हाळ्याचा ओलावा बालपणीं उत्पन्न होत असतो, त्याचा झराच ह्या परिस्थितीमुळें दिवसेंदिवस आटत चालला. बालपणांतच मला मोठेपणाची जाणीव होऊं लागली. कुणालाही मी कांहीं बोललें तर त्याचें कौतुक होऊं लागल्यामुळें मी बोलावें तेंच खरें असें मला वाटूं लागलें. आत्म-विश्वासाची फाजील जाणीव झाल्यामुळें माझ्या बोलण्यालाही ताळतंत्र राहिलें नव्हतें. कुठें बोलावें, काय बोलावें, आणि कुणाशीं कसें बोलावें, याचा मीं कधींच विचार केला नाहीं. वाटेल त्या विषयांत मी तोंड घालीत असें. सर-कारी कामाच्या गोष्टी जरी कुणी बोलत असले, तरीही त्यांत मी आपलें मत ठोकून देत असें. माझी बुद्धि तीव्र होती. शब्दांची आठवण मला चांगली रहात असे, त्याचा फायदा मी पदोपदीं घेत असें.

लहानपणापासून मला वाचनाचाही नाद फार. दादाच्या परकी वृत्तीमुळें घरीं मला कसलाच विरंगुळा नव्हता. साधारण वाचतां येऊं लागल्यापासून मी वर्तमानपत्रें वाचावयास सुरुवात केली. मला त्यांतील विषय कळत नसे, पण शब्द ध्यानांत रहात असत. दररोजच्या संभाषणांत बेचारा एकादा शब्द

सांपडतांच त्याचा अर्थ मी तेव्हांच विचारून घेत असें आणि तेवढाच गांठीला बांधू ठेवी असें. केव्हां कुठें बोलण्याचा प्रसंग आला, म्हणजे असले सांठ्याचे शब्द वापरून पहाण्याची मला खोड लागली होती. त्या खोडीमुळेंच माझी तारीफ होऊं लागली. हळूहळू शब्दांप्रमाणेंच विषयांतही माझें डोकें जाऊं लागलें. वर्तमानपत्रांतील विषयांची चर्चा आमच्या घरीं रोज चालत असे. ह्या चर्चेच्या अग्रस्थानीं माझ्या बाबांप्रमाणेंच तिथले मुन्सफही असत. त्याचप्रमाणें कांहीं वयोवृद्ध वकीलही असत. पहिल्या पहिल्यानें ही चर्चा मी मुकाट्यानें ऐकून घेत असें. ती ऐकून घेतलेली चर्चा मनांत सांठवून ठेवावी आणि दुसऱ्या वेळीं वर्तमानपत्रांत वाचलेल्या विषयाशीं त्याचा पडताळा पहावा, हा माझा बहुतेक नित्यक्रमच होता.

आमच्या घरीं जितकीं वर्तमानपत्रें व मासिक पुस्तकें येत असत, तितकीं एखाद्या लायब्ररींतही येत नसतील. इंग्रजी पुस्तकांचा आणि पत्रांचा मला कांहीं उपयोग होत नव्हता. पण घरीं आलेलें एकही मराठी वर्तमानपत्र किंवा पुस्तक वाचल्याशिवाय मी मोकळें जाऊं दिलें नाहीं.

अभ्यासाच्या पलीकडे दुसरें कांहींही वाचण्याची आवड दादाला नसल्यामुळें माझ्या वाचनांत कसलाच अडथळा आला नाहीं. मी आठवणीची घड होतें खरी, पण वर्तमानपत्रें वाचण्यांत चांगल्या मोठ्या माणसांपेक्षांही पटाईत होतें. शाळेंत त्या वेळीं मी दुसरींतून तिसरींत गेलें होतें पण वाचनाच्या बाबतींत मी सहावींतल्या मुलांनाही मागें टाकलें असतें.

वाचनाच्या माझ्या ह्या आवडीचें बाबाही कौतुक करीत असत. कुणी पाहुणा आला, कीं त्याच्यासमोर माझ्याकडून मुद्दाम कांहींतरी वाचून घ्यावें, स्वतः तारीफ करावी, आणि दुसऱ्यानें केलेली तारीफ उणी झाल्याचें त्याला मासवावें, असा त्यांचा नित्यक्रम होता. पुढें पुढें तर त्यांनीं स्वतः वर्तमानपत्रें वाचावयाचें सोडून दिलें. आलेलें वर्तमानपत्र त्यांना मीच वाचून दाखवूं लागलें. ऐकणारा कुणी जवळ असला, तर मधून मधून वाचित असलेल्या विषयावर ते चर्चाही करीत असत. ती चर्चा मी लक्षपूर्वक ऐकत असें.

ह्या सर्व परिस्थितीचा माझ्या बुद्धीवर परिणाम होऊं लागला. कुणीही मोठीं माणसें बोलूं लागलीं, तर मध्येंच तोंड घालून मी त्यांच्या चर्चेत भाग

येऊं लागलें. रावसाहेबांची मुलगी असल्यामुळें मला कुणी त्यांच्यासमोर टाकून बोलत नसे. पण " रावसाहेबांनीं मुलीला फार चढवून ठेविली आहे " असे उद्गार लहान मोठया सर्व दर्जाच्या माणसांकडून निघत असलेले मला वारंवार आजुबाजूनें ऐकूं येऊं लागले.

लोक मला नांवें ठेवतात हें मला कळून आलें खरें, पण बाबांच्यासमोर तेच लोक माझी तारीफ करीत असल्यामुळें त्यांचें खरें मत कोणतें, ह्याचा माझ्या बालबुद्धीला अंदाज होईना. बाबांच्या समोर लोक जें बोलतात तेंच खरें आणि मागें बोलतात तें सर्व खोटें, असाच माझा समज होऊं लागला होता.

ह्या समजामुळें मी दिवसेंदिवस चढेल होऊं लागलें. भाषणांत मी फार मोठमोठें शब्द वापरीत असल्यामुळें माझें सर्वांकडून जें कौतुक होत असे, त्याची ह्या चढेलपणा वाढविण्यास एक प्रकारें जोड मिळाली. मला असें वाटे, कीं एवढया मोठया बाबांच्यासमोर लोक कसें खोटें बोलतील ? बाबांच्या नजरेआड मला जीं नांवें ठेविलीं जात होतीं, तीं बुद्धिपुरस्सर माझा पाणउतारा करण्याकरितां होतीं, असाच माझा समज होऊं लागला.

लोकांनीं माझी स्तुती करावी आणि दादाला शिळपट म्हणावें, ह्याचाही तो चढेलपणा अधिकाधिक वाढविण्यास उपयोग होत होता. मी फार हुषार आहें, माझ्यापेक्षां वयानें चार वर्षें वडील असलेल्या दादापेक्षांही हुषार आहें, असे रावसाहेब असलेल्या माझ्या बाबांसमोर जमणाऱ्या लोकांनीं म्हटल्यामुळें ' मी कुणी तरी आहें ' असें मला वाटूं लागलें.

तीच माझी वृत्ति बाणली. आणि ह्या प्रौढ वयांतही ' मी कुणी तरी आहें ' ह्या ब्रम्हवाक्याची अजूनही मला विस्मृति होत नाहीं. माझ्या पुढील आयुष्याचे धागे ज्या निरनिराळया प्रसंगानीं विणले गेले, त्यांच्या पार्श्वभागीं ह्याच ब्रीदवाक्याची प्रभावळ कशी उठावण देत राहिली आहे, याचा पदोपदीं मला प्रत्यय येत होता.

---

## प्रकरण २ रें

# तेल्याच्या घाण्यावर

माझ्या आईची वृत्ति फार धार्मिकपणाची होती. ज्या ज्या गांवीं आम्ही गेलों, त्या त्या गांवीं तिच्या धर्मनिष्ठतेबद्दल सर्वत्र ख्याति होत असल्याचेंच ऐकूं येत असे. भिक्षुकवर्गांत तिला फार मान्यता असे. पुरोहित असो किंवा पुराणिक असो, त्यानें तिची तारीफ केली नाहीं, असें कधीं झालेंच नाहीं.

म्हणजे बाबांचा स्वभाव अधार्मिक होता असें मुळींच नाहीं. बाबांच्या धर्मनिष्ठतेचीही मटांभिक्षुकांत ख्याती होती खरी, पण ती तोंडदेखली होती. किंबहुना आईच्या धर्मनिष्ठतेच्या ख्यातीचा नवरा या नात्यानें त्यांना फायदा मिळे, येवढेंच. कोणत्याही विशेष धर्मकृत्यांत ते प्रत्यक्षपणें भाग घेत नसत. आईच्या करवीं होत असलेलीं व्रतेंवैकल्यें करतांना ती सढळ हातानें जो खर्च करीत असे, त्याला बाबांची पूर्ण संमति असे. मामलेदार या नात्यानें गांवांत त्यांची जी प्रसिद्धी होती, तिला आईच्या ह्या धार्मिकतेमुळें एक प्रकारें सात्विक जोड मिळत असे.

तालुक्याचा एक करडा अंमलदार म्हणून बाबांचा फार दरारा होता. तितकीच धार्मिकतेची मायमाउली म्हणून आईची ख्याति होती. कुणीही संकटांत असलें आणि बाबांकडून त्याचें कांहीं काम होण्याजोगें असलें, तर त्यानें येऊन बाईसाहेबांचे पाय धरावे, कीं त्याचें संकट हटकून दूर होत असे. तें कोणत्या विशेष प्रकारच्या विधीनें होत असे, हें मला फार उशीरां कळलें. त्या वेळच्या माझ्या वयांत जास्त खोल पाण्यांत जाण्याची माझी ताकद नव्हती. लोक म्हणत, "रावसाहेब फार करडे, पण बाईसाहेब म्हणजे एक माउली आहे. तिनं मनांत आणलं, तर रावसाहेबाची करडी अंमलदारी वाटेल त्या वेळीं ती थंड करूं शकते." एवढयावरच माझें समाधान होत असे. बाबा फार सरळ स्वभावाचे आणि माझी आई अत्यंत दयाळू असा माझा दृढ समज झाला होता.

माझ्या आईचें नांव मला कळलें नाहीं म्हटलें तरी चालेल. मला कळूं लागलें तेव्हांपासून मी तिला 'आई' म्हणत असे. आणि लोक 'बाईसाहेब' म्हणत असत. घरांत बोलतांना आई म्हणायचें आणि लोकांशीं

बोलतांना ' बाईसाहेब ' ह्या नांवानें उल्लेख करायचा, असाच आमच्या घरचा शिरस्ता असे. दादाला देखील लोक " दादासाहेब " म्हणत असत, आणि मी सर्वांची ' ताईसाहेब ' होते.

आई जरी मला हांक मारतांना ' गोदू ' म्हणत असे, तरी इतरांशीं बोलतांना माझा उल्लेख ' ताईसाहेब ' ह्या नांवानेंच करीत असे. बाबा मात्र मला केव्हांही गोदू म्हणत नसत. त्यांनीं मला जर ' ताईसाहेब ' म्हटले नसतें तर लोकांनींही त्यांच्याच म्हणण्याचें अनुकरण केलें असतें, असें ते स्वतःच बोलून दाखवीत. मामलेदाराच्या घराण्याचा दर्जा ही ' साहेब ' पदवी दिल्याशिवाय तालुक्याच्या छोट्या गांवीं कधींच टिकाऊ झाला नसता.

शाळेंत सुद्धां तीच स्थिती होती. मास्तर सुद्धां मला ' ताईसाहेब ' म्हणत असत. आई आणि दादा ह्यांनीं माझें पाळण्यांतलें नाव जर कधीं उच्चारलें नसतें तर माझें नांव गोदू आहे हे मला कळलेंही नसतें. शाळेंतल्या हजेरीपटांत माझें नांव जरी ' गोदू गंगाधर गोखले ' असें लिहिलेलें होतें, तरी हजेरी घेतांना मास्तर ' ताईसाहेब गोखले ' ह्याच नांवानें पुकारीत असत.

मला राहून राहून ह्याचें आश्चर्य वाटे. पहिलें पाळण्यांत ठेवलेलें नांव असतांना हें ताईसाहेबांचें बांडगुळ कशाला ? सर्वांनींच मला ' गोदू ' कां म्हणू नये ? माझा जीव अगदीं आशेला येत असे. आई आणि दादा जर मधून मधून मला गोदू म्हणतांना, तर मला वाटतें, मी अगदीं चिडून गेलें असतें. एक नांव ठेवायचें आणि दुसऱ्याच नांवानें हांक मारायची कां म्हणून ?

मास्तर ताईसाहेब म्हणत असत, त्याला आणखीं एक कारण होतें. मला घरीं शिकवायला रोज तेच येत असत. ते आल्याबरोबर त्यांना सांगायचें झालें, तर माझा उल्लेख ' ताईसाहेब ' ह्याच नांवानें केला जात असे. मास्तर आलेले पहातांच " अरे, ताईसाहेबांना म्हणावं, मास्तर आले आहेत. " असें खुद्द रावसाहेबानींच म्हटल्यावर दुसऱ्या संबोधनानें मला हांक मारायची कुणाची प्राज्ञा होती ?

दुसरेंही एक कारण होतें. निदान महिन्यांतून एक वेळ तरी मामलेदार ह्या नात्यानें बाबा शाळेला भेट देत असत, मुलांची चांचणी घेत असत, शेरा लिहीत असत आणि वेळींवरुतीं मास्तरांना तंबीही देत असत. बाबा शाळेंत

आले, कीं हेडमास्तर सुद्धां गणू पटेवाल्याइतक्या अदबीनें त्यांच्याशीं वागत असत, तिथें माझ्या वर्गाच्या मास्तरांची काय कथा !

शाळेच्या अभ्यासांत इतर मुलींप्रमाणें माझ्याही हातून चुका होत असत, पण त्याबद्दल मला कधींच शिक्षा झाली नाहीं; छडी मिळण्याचें दूरच राहो. इतर मुलींना छड्या मिळाल्या आणि त्या रडूं लागल्या, तर आपल्याला अशी शिक्षा होत नाहीं म्हणून आनंद वाटण्याऐवजीं मला दुःखच होत असे. किंबहुना त्या मुलींचा मला मत्सर वाटे. छड्या मिळून आपल्यालाही एकदां रडण्याची संधि मिळावी, म्हणून माझा जीव आशेला येत असे. घरीं कुणी बोलत नाहीं, रागावत नाहीं, शाळेंत कुणी छड्या मारीत नाहीं, मास्तर नुसते डोळे सुद्धां वटारीत नाहींत, याचें मला राहून राहून आश्चर्य वाटे. सुखाला दुःखाची जोड मिळाल्याशिवाय जिणें अपुरें वाटतें, याचा अनुभव मला त्या लहानशा वयांत येत होता. दादा मधून मधून भांडत असे, रागें भरत असे, क्वचित् एकादी लहानशी चापटीही मारीत असे, म्हणून समाधानाला मला कांहीं तरी जागा होती.

शाळेंत माझा नंबर पहिला होता. मला घरीं शिकवायला येणाऱ्या मास्तराच्या करामतीमुळें माझा पहिला नंबर कांहीं दिवस आजारी पडून गैरहजेरी लागल्याशिवाय कधींच खालीं गेला नाहीं. एकदां बरेच महिने मी आजारी पडलें नव्हतें, त्यामुळें पहिला राहिलेला नंबर अढळपद घेऊन बसला. त्या रागानें मी आजारीपणाचें ढोंग केलें, आठ दिवस घरीं राहिलें, तेव्हां दुसऱ्या महिन्याला तिसरा नंबर गेला. वर्गाच्या पहिल्या बांकावर पहिल्या जागीं मुतक्यासारखें बसणें मला कंटाळवाणें जात असे, म्हणूनच मी ही लबाडी केली, आणि दोन्ही बाजूंना दोन मुली असतांना मधें बसण्याचें तिसऱ्या नंबरचें सौख्य अनुभवलें.

ह्या माझ्या लबाडीमुळें मला एक मित्रलाभ झाला. मी सदोदित पहिल्या नंबरला असें. मी मामलेदाराची मुलगी असल्यामुळें दुसऱ्या नंबरची मुलगीही माझ्यापासून जरा सरकूनच बसत असे, त्यामुळें तिच्याशीं माझा परिचय होत नव्हता. शाळेंत येतांनाही दप्तरपाटी घेण्यास शिपाई बरोबर असल्यामुळें इतर मुली माझ्याबरोबर येत नसत. शाळेंतून घरीं जातांनाही तीच स्थिति !

या अधिकाराच्या सीमेमुळें माझा कुणाच मुलीशीं परिचय होत नव्हता. इतर मुलींनीं माझ्याशीं फाजील सलगीनें वागूं नये म्हणून मास्तरही खबरदारी घेत असत—म्हणजे इतर मुलींशीं मीं सलगी करूं नये असें मला सांगत नसत—तर मी इतर मुलींशीं सलगी ठेवण्याचा प्रयत्न करूं लागलें म्हणजे उलट ते त्या मुलींनाच दटावीत असत. त्यामुळें बरोबरच्या मुलींनीं माझ्याबद्दल एक प्रकारची भीति घेतली होती.

तिसरा नंबर आल्यामुळें ही सीमा दूर झाली. उदाहरणें घालून मास्तर वर्गाबाहेर गेले, म्हणजे बाजूच्या दोन्ही मुलींशीं मी बोलण्याचा प्रयत्न करीत असे. पहिल्या पहिल्यानें त्या मुली माझ्याशीं बोलायला भीत असत. हळूहळू संकोच दुरावत चालला आणि दुसऱ्या नंबरला असलेली मुलगी पहिल्यानें माझ्या प्रश्नांना उत्तरें देऊं लागली.

हळूहळू संकोचाचा पडदा दूर होतां होतां तीही मला प्रश्न करूं लागली. मी उत्तरें देऊं लागलें. दिवसेंदिवस हा सलोखा वाढत जाऊं लागला.

या मुलीचें नांव ठकू नागू तेली. तिचा बाप तेल्याचा धन्दा करीत असे. त्याचा एक घाणा होता. एखादे दिवशीं आम्हां मुलींना अभ्यास करावयास सांगून खाजगी कामासाठीं मास्तर ज्या वेळीं झुंकाडी देत असत, त्या वेळीं आम्ही दोघी सलोख्याचा जिव्हाळा वाढविण्याचा प्रयत्न करू लागलों. माझ्या घरच्या गोष्टी मी तिला सांगत असें, त्या वेळीं ती त्या लक्षपूर्वक ऐकत असे. दुसऱ्याला सांगून त्याचें कुतूहल वाढविण्याइतक्या माझ्या घरच्या गोष्टी विशेष आकर्षक नसत. माझ्या तोंडच्या गोष्टी म्हणून तिनें त्या भक्तिभावानें ऐकाव्या एवढेंच.

पण तिच्या गोष्टींचें मात्र तसें नव्हतें. घरच्या असोत किंवा घाण्यावरच्या असोत, तिच्या गोष्टी मोठ्या आकर्षक असत. विशेषतः ती आपल्या ढवळ्या बैलाच्या हकिकती ज्या वेळीं सांगत असे, तेव्हां अगदीं देहभान विसरून जात असे. घरच्या गोठ्यातल्या एका जनावराबद्दल माणसाचें इतकें बेभान प्रेम असतें तरी कसें, ह्याचें राहून राहून मला आश्चर्य वाटे.

वास्तविक पहातां तो बैल पांढरा नव्हता—करडा होता. पण त्याचें नांव मात्र ढवळ्या म्हणून ठेवलेलें होतें. ठकूचें ढवळ्याबद्दलचें प्रेम पाहिलें, म्हणजे

माझ्या मनांत एक विलक्षण कल्पना येत असे. जनावराबद्दल माणसाचा इतका ओढा असावा, आणि माणसामाणसांचाच तितका कां असूं नये ?

प्रत्यक्ष माझा दादा—पाठोला पाठ लावून आलेली मी त्याची बहीण—पण आम्हां दोघांचें घटकाभर सुद्धां पटत नसे. तो अभ्यास करीत असला आणि मी क्षणभर जाऊन जवळ बसलें, तर तो वसकन् अंगावर येत असे. एकादे दिवशी एकादें उदाहरण सोडवून दे म्हणून म्हटलें, तर तो 'विचार आपल्या मास्तरांना' असें ताडकन् उत्तर देत असे. एका रक्तापासून उत्पन्न झालेले दोन जीव, पण त्यांचें देखील एकमेकांशीं पटूं नये ! आणि ठकूनें एका बैलाबद्दल—एका जनावराबद्दल—इतका लोभ दाखवावा, इतका ओढा धरावा, तोंड फाटे-पर्यन्त त्याच्या गुणांची वर्णनें करावीं, याचें मला आश्चर्य वाटल्यास नवल कसलें?

माझी तळमळती जिज्ञासा धीर धरीना. कौटुंबिक वात्सल्याचा हा अपरिचित मासला एकदां तरी पहाण्यासाठीं माझें मन कासावीस होऊं लागलें.

एवढया क्षुल्लक गोष्टींत मन कासावीस होण्याजोगें असें काय होतें, असा साहजिकच प्रश्न येईल. पण माझी परिस्थिति तशीच मानगडीची होती. मी एक मामलेदाराची मुलगी होतें आणि ठकू ही एका यःकश्चित तेल्याची मुलगी होती. मी एकाद्या मुन्सफाच्या घरीं गेलें असतें, वकीलाच्याही घरीं गेलें असतें, फार काय, एकाद्या कारकुनाच्या किंवा शाळा मास्तराच्या घरीं गेलें असतें तरी तें गैर दिसलें नसतें. पण एका तेल्याच्या घरीं जाणें मामलेदाराच्या मुलीला तालुक्याच्या गांवीं तरी अशक्य होतें. तसें करण्यांत माझ्या बाबांची इभ्रत कमी झाली असती. त्यांच्या दर्जाला धक्का बसला असता. म्हणूनच मीं म्हटलें, कीं ठकूच्या घरीं जाण्यासाठीं माझा जीव कासावीस होत होता.

मी मनाचा निश्चय केला—काय होईल तें होवो—एकदां नागू तेल्याच्या घाण्यावर जायचेंच. पूर्ण विचार करूनच मीं हा निश्चय केला होता. त्याचे कोणतेंही परिणाम भोगावे लागले तरी त्याला माझी तयारी होती.

शाळा सुटण्याच्या वेळीं पट्टेवाला माझें पाटीदप्तर नेण्यासाठीं शाळेच्या दाराशीं थांबलेला असे. आमची शाळा गांवाच्या अगदीं मध्यावर होती आणि राहण्याची जागा कचेरीच्याच अलीकडे पण जवळ जवळ गांवाच्या बाहेरच

होती. नागू तेल्याचा घाणा बाजारांतून बंदरावर जाण्याच्या रस्त्यावर होता. किंबहुना त्याच्या घाण्यापासूनच बाजारपेठेला सुरवात होत होती असें म्हटलें तरी चालेल.

शाळा सुटून मी बाहेर आलें, पाटीदप्तर शिपायाच्या हातीं दिलें आणि ठकू पुढें जात होती तिला थोपवून धरलें.

मी तिच्या घाण्यावर येणार आहें, असें सांगतांच ती आ पसरून माझ्याकडे पहातच राहिली. तिच्या गळ्यांत हात टाकून मीं म्हटलें, " एवढी घाबरलीस कशाला? खरोखरच मी तुझ्या घाण्यावर येणार आहें. मला एकदां तुमचा ढवळ्या पहायचा आहे. "

ढवळ्याचें नांव ऐकतांच ठकूची भीति पार नाहींशी झाली. ती म्हणाली, " खरंच ! देवाशपथ ? मग फार छान होईल ! मी त्याच्या एक एक गंमती तुला दाखवून देतें. "

आम्ही वाट चालू लागलों, आणि गांवाच्या मधल्या चवाठयावर येतांच घरच्या रस्त्याकडे वळायच्या ऐवजीं बाजारपेठेच्या रस्त्याला वळलों. पट्टेवाला आश्चर्यचकित झाला आणि म्हणाला, " ताईसाहेब, धरीं यायचं आहे ना ?"

मी मागें न पहाताच उत्तर दिलें " तुला काय करायचं आहे त्याच्याशीं ! तूं आपला माझ्या मागून ये. "

आम्ही दोघीही बोलत बोलत वाट चालूं लागलों. ठकूचें हृदय आनंदानें भरून गेलें होतें. ती सारखी बोलत सुटली होती. सारखी ढवळ्याच्याच गुणाचीं वर्णनें चाललीं होतीं. पट्टेवाल्याचीही पिरपिर सारखी सुरू होती. रावसाहेब रागावतील, आपली नोकरी जाईल, गरिबाची पोरेंबाळें उपाशी पडतील, वगैरे कांहींसे रागाचे व कांहींसे विनवणीचे शब्द बोलत तो जड पावलांनीं आमच्याबरोबर येत होता.

" आतां पहा " ठकू म्हणाली, " हें आमचें दुकान जवळ आलें. आतां एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं. अगदीं मुकाट्यानं चोरपावलीं जायचं. ढवळ्या कशी माझी चाहूल ओळखतो तें तरी पहा. "

आम्ही दोघीही घाण्याच्या दाराशीं आलों. नागू तेली आश्चर्यचकित झाला आणि कांहीं बोलणार, तोंच ओंठावर बोट ठेऊन ठकूनें त्याला खूण केली. ओठाशीं आलेला शब्द तसाच दाबून तो आमच्याकडे टकमक पहात राहिला.

घाणा एका गवती झोपडींत होता. त्याच्या भिंती कारवीच्या खुंटावर मातीचा लेप देऊन केलेल्या होत्या. जागा अगदींच गलिच्छ होती. जिकडे तिकडे तेलाचें साम्राज्य पसरलेलें होतें. तेलकट नसलेली एक चिंधोटीसुद्धां तेथें मिळणें शक्य नव्हतें. नागू तेली तर नखशिखान्त तेलानें माखलेला होता. तेलानें भरलेले कांहीं डबे इकडे तिकडे ठेवलेले होते. त्याचप्रमाणें काळ्या संगमवरी दगडासारख्या काळ्याकुट्ट दिसणाऱ्या पेंडीच्या राशीही जिकडे तिकडे पसरल्या होत्या.

बैल घाण्याशी जोडलेला होता. त्याच्या डोळ्याला एक सोपटें बांधलेलें होतें आणि यंत्रासारख्या ठराविक गतीनें तो घाण्याभोंवतीं फिरत होता.

ठकूची चाहूल लागतांच तो उभा राहिला आणि कान टवकारून मानेला हिसडे देऊं लागला. मधून मधून आपल्या चवरीसारख्या शेंपटीचे फटके तो आपल्या दोन्हीं पायांवर फडकावीत होता.

ठकूनें नागू तेल्याला खूण केली, आणि त्याला हाणावयास खुणेनेंच सांगितलें. नागूनें हातांतील काठीचे दोन तीन फटके त्याला हळूच लगावले, पण तो एक पाऊलही पुढें सरकेना. हळूच काठीनें ढोसलेंही, तरी पुढें न जातां तिथूनच मान वळवून सोपट्याच्या आवरणांतून मागें पाहूं लागला. मधून मधून मानेला हिसडे देण्याचें काम सारखें सुरू होतें.

ठकूच्यानें त्याचा जास्त अंत पहावेना ती हळूच गेली आणि त्याच्याजवळ उभी राहिली. त्याचें सर्वांग थरारलें. डोळ्यावरच्या सोपट्यामुळें अर्थातच त्याला कांहीं दिसत नव्हतें. तो चारही पांयावर नाचूं लागला. ठकू त्याच्या आटोक्याबाहेर होती, आणि मानेवर जूं असल्यामुळे तो जखडला गेला होता.

ठकूनें हळूच त्याच्या मानेवर हात टाकला, त्यासरशीं त्यानें आपली मान तिच्या खांद्यावर टाकली आणि अंदाजानें जागा ओळखून तो तिचे गाल चाटूं लागला.

नकळत माझ्या डोळ्यांतून आलेलीं दोन आंसवें माझ्या अंगावर पडलीं, तेव्हां मी जागी झाल्यासारखी दचकलें आणि इकडे तिकडे पाहूं लागलें. भरून आलेले डोळे डाव्या मनगटानें पुसून मी पहातें, तों आपल्या अर्धवट काढलेल्या चित्राकडे लावून पहाणाऱ्या चित्रकाराप्रमाणें नागू तेली वाकड्या मानेनें मुली-बैलाचें वात्सल्य डोळे भरभरून न्याहाळीत होता.

तें सर्वच दृश्य मला अलौकिक वाटलें. माझ्या घरीं वैभव होतें, समृद्धी होती, चाकरमाणसें होतीं, माथ्यावर आईबापांची पाखर होती—पण असल्या वात्सल्याचा अनुभव मला आला नव्हता. त्या देखाव्यानें माझें अन्तःकरण वेडावून गेलें. नागू तेली क्षणभर स्वतःला विसरला होता.

बैलाच्या मानेची पिशवी आपल्या हातानें हळूहळू खाजवीत मागें वळून ठकू म्हणाली, " पहातां काय बाबा ? ताईसाहेब आल्या आहेत तें दिसत नाहीं का तुम्हांला ? त्यांना बसा तरी म्हणावं कीं नाहीं !

जागा झाल्याप्रमाणें दचकून नागू तेली म्हणाला, " आतां काय म्हणावं या पोरीला ? आपणच मला बोलूं नको म्हणून खूण करते आणि बोलत नाहीं म्हणून आतां आपणच मला दोष देते !" माझ्याकडे वळून तो म्हणाला, " आतां तुम्हांला कुठं बसा म्हणून म्हणूं, ताईसाहेब ? इथं ही सगळी तेलाची घाण. तुमच्या कपड्यावर तेलाचा डाग पडायचा एखादा ! "

मला बसायला काय द्यावें म्हणून तो इकडे तिकडे पाहूं लागला. कांहींच कुठें सांपडेना, तेव्हां तो बावरल्यासारखा झाला, असें पाहून ठकूनें ढवळ्याची मिठी सोडली, शेजारीं पडलेला एक देवदारी खोका आणून झोंपडीच्या बाहेर ठेवला, आणि त्याच्यावर ढवळ्यासाठीं आणलेल्या गवताची एक पेंडी ठेवून दिली.

" आतां याच्यावर बसा ताईसाहेब," ती हंसत हंसत म्हणाली. " कशी छान गादी झाली आहे ? तुमच्या घरीं नाहीं मिळायची बरं असली गादी !"

' खरंच ' असें म्हणून मी त्या गवताच्या पेंडीवर बसलें. त्यासरशी पट्टेवाला वसकन् ओरडून म्हणाला, "तुम्हाला बसायचं असलं तर खुशाल बसा. माझं काय जातंय त्यांत ? पण मी मात्र इथं एक क्षणभरही राहणार नाहीं. तुमची दप्तरपाटी घेऊन असाच तडक घरीं जाईन आणि सारी हकिकत बाईसाहेबांना सांगेन. आधीं मला कळलं असतं तर मी मुळीं आलोंच नसतों. परभाराच गेलों असतों बंगल्यावर. तुम्ही आणि तेल्याच्या घाण्यावर ? रावसाहेबांना कळेल तर मला चाबकाखालीं फोडून काढतील ! "

तसाच जाण्यासाठीं तो चुळबुळत उभा राहिला. तें पाहून नागू तेली म्हणाला, " तुमचं आतां काय स्वागत करूं ताईसाहेब ! घरीं आलां असतां, तर वाटीभर दूध तरी दिलं असतं. पण इथं काय देऊं ! "

मी म्हटलें, " कांहीं नको वरं द्यायला ! झालं हेंच पुष्कळ झालं. तोही घाई करतो आहे, तेव्हां जातेंच. "

"असं कधीं झालं आहे ?" नागू तेली म्हणाला, "गरिबाच्या घरीं तुमच्या सारख्यांची पायधूळ लागली माझ्या पोरीच्या माग्यानं. तुम्हीं आज इथं आलांत आणि तोंड हालवल्याशिवाय गेलांत, तर पाप लागेल. माझा गृहस्थपणा बुडेल. आम्ही गरीब झालों तरी आम्हांला कुलाचार आहे ना ? घरीं पाहुणा आला आणि तोंड गोड केल्याशिवाय गेला, तर माझ्या घरवासीपणाला बाध येईल ! "

" मी काढतें त्याला तोड " ठकू म्हणाली. धांवतच ती एका कोंपऱ्याकडे गेली आणि पेंडीचे खडे बाजूला सारून अगदीं तळाशीं असलेल्या तसल्याच पण पांढऱ्या पेंडीचा तुकडा घेऊन माझ्या समोर आली आणि म्हणाली, " ही खोबऱ्याची पेंड. परवां कुणी मुद्दाम औषधासाठीं मालवणी खोबरं आणून त्याचं तेल काढून घेतलं होतं, त्याची ही पेंड. फार गोड असते. थोडी खाऊन पहा ना ! "

ठकूचे ते शब्द ऐकून पटेवाला आपल्याशींच धुसपुसूं लागला. मला नको म्हणण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. माझा हट्टी स्वभाव त्याला माहीत होता. रागाच्या मिरमिरीसरशीं तिथल्या तिथें मीं त्याच्या थोबाडींत भडकावली असती, ह्याची त्याला जाणीव होती. मी ती पेंड घेऊन खाऊं लागलें, त्याबरोबर त्यानें आपलें तोंड फिरवलें. ती पेंड मला खरोखरच फार गोड लागली.

मीं ठकूला विचारलें " ढवळ्याला सुद्धां हीच पेंड खायला देतां का ? "

" ढवळ्याला ही पेंड ! त्याचं कुठं आहे एवढं भाग्य ! " ठकू मोठ-मोठ्यानें हंसत म्हणाली, " कधीं अशी खोबऱ्याची पेंड निघालीच तर तिची चटणी करण्यासाठीं बामण लोकांच्या तिच्यावर उड्या पडतात. वाटेल ती किंमत देऊन घेतात. ढवळ्याच्या नशिबीं नुसती तिळाभुईमुगांची पेंड. ती देखील वाईट नाहीं हो. लसूण मिरची घालून आमच्या घरीं आम्ही ह्या तिळाच्या पेंडीचंच तिखट करून ठेवतों. खोबऱ्याची पेंड श्रीमंतांसाठीं. बिचाऱ्या ढवळ्याला ती कुठून मिळणार !"

ठकूच्या भाषणाचा नागू तेल्याला राग आला. तो म्हणाला, " माझी अब्रू घेतेस पोरटे ! ढवळ्याच्यापुढं मला पैशाची पर्वा नाहीं. बामण लोक विकत मागतात म्हणून देतों—नाहीं तर ही खोबऱ्याजी पेंड ढवळ्यालाच घातली असती. आतांच पहा—" असें म्हणून तो धांवतच त्या कोपऱ्यांत गेला आणि पांढऱ्या पेंडीचे दोन तीन तुकडे घेऊन येऊन त्यानें ते एकामागून एक ढवळ्याच्या तोंडी दिले.

पटेवाला मोठ्यानें ओरडला. "आतां तरी यायचं आहे कीं नाहीं तुम्हांला ताईसाहेब ? "

" जरा थांब, " असें त्याला सांगून मी ठकूला उद्देशून म्हणालें, " ढवळ्यावरून मी हात फिरवला तर तो मारायचा नाहीं ना ? "

" मी जवळ असलें तर नाहीं कदाचित् मारायचा. " ठकूनें विचारपूर्वक उत्तर दिलें. तिच्या बोलण्याची वाट न पहातां मी बैलाच्या जवळ गेलें. तें पहातांच ठकू माझ्यापुढें होऊन बैलाच्या कोळ्यावर हात टाकून उभी राहिली. मीं हळुहळू त्याच्या मानेची पिशवी खाजवूं लागलें तेव्हां पूर्वीप्रमाणेंच तोंडांतील पेंडीचा खडा टाकून तो आपल्या खरखरीत जिभेनें माझे गाल चाटूं लागला. माझा आनंद गगनांत मावेना—

" तो मला ठकू म्हणून तर समजला नाहीं ना ? " मी नागू तेल्याकडे वळून म्हटलें.

" छेः छेः मुळींच नाहीं. " ठकू म्हणाली, " त्याला माणसाची चांगलीच पारख आहे. डोळ्यावर झांकण असलं तरी चाहूलीनंच तो माणसाला ओळखतो आणि शिंगं रोखून अंगावर येतो. शेजारी पाजारी त्याला ' मारकुटा बैल ' म्हणतात. पण तुला त्यानं ओळखलं. तुझी त्याची दोस्ती जमली. आतां डोळे उघडून दाखवलं तरी तो तुला मारायचा नाहीं. "

मीं त्याचे डोळे उघडण्याविषयीं सांगतांच ठकूनें पायानें पेंडीचे तुकडे दूर सारीत सारीत त्याच्या डोळ्यावरील झांकण काढून घेतलें. मानेला हिसडे देत देत त्यानें डोळे मिचकावीत क्षणभर इकडे तिकडे पाहिलें आणि पुन्हां माझे गाल चाटण्यास सुरवात केली.

" वाः ! आतां अगदीं छान गट्टी जमली ! " मोठमोठ्यानें हंसत ठकू म्हणाली.

" आतां येतांहांत कीं मी जाऊं घरीं ? " मधेंच पटेवाला मोठ्यानें ओरडला. मलाही आईच्या रागाची आठवण झाली. " जातें हं ! येतें बरं !" म्हणत म्हणत आणि बैलाच्या आंगावरून हात फिरवीत फिरवीत मी झोपडी-बाहेर आलें. नागू तेल्यानें पुढें येऊन लवून मुजरा केला. " अशाच पुन्हां केव्हां तरी गरीबाच्या घरीं पायधूळ झाडा. " असें बोलत बोलत तो रस्त्या-पर्यंत चार पावलें माझ्याबरोबर आला.

भराभर पावलें उचलीत मी घरच्या रस्त्याला वळलें. चालत असतांना घोवाल्याची सारखी भुणभुण सुरू होती.

बैलाशीं कानगोष्टी करीत ठकू तिथेंच राहिली होती. मी जात आहें याचेंही तिला भान नव्हतें.

घराच्या दाराशीं आलें, तों आई दारांतच उभी असलेली मला दिसून आली.

" इतका वेळ होतीस कुठं गोदे ? " आई वस्कन ओरडून म्हणाली. शिपाईमाणसासमोर मला तिने ' गोदे ' असें हें पहिल्यानेंच संबोधिलें. आईचा राग खरोखरच फार भडकला, अशी माझ्या मनाची खात्री झाली.

मी उत्तर देण्यापूर्वीच पटेवाला म्हणाला, " माझा नाइलाज झाला बाई-साहेब. मी नको म्हणून किती वेळां सांगितलं तरी ताईसाहेब ऐकेनातच मुळीं ! त्या शाळेंतल्या ठकीबरोबर बंदरावरच्या नागू तेल्याच्या घाण्यावर गेल्या होत्या. तिथं पेंड खाल्ली बरं—यांनीं पेंड खाल्ली—ताईसाहेबांनीं पेंड खाल्ली ! बैलाचं खाणं, तो हरामखोर तें देतो काय आणि या खातात काय ? आणि म्हणे गोड लागते खोबऱ्याची पेंड ! आणि म्हणे बैलाची दोस्ती जमली ! राव-साहेबांच्या मुलीची कुणाशीं दोस्ती जमली ? तर बैलाशीं दोस्ती जमली ! तो तेलगंड सांगतो काय आणि या ऐकतात काय ! स्वतः ताईसाहेब त्या बैलाला खरारा करूं लागल्या, तिथं मी काय करणार ! किती झालं तरी मी नोकर माणूस ! स्वतःची मुलगी असती तर बखोटीला धरून ओढून काढून दोन धपाटे लगावले असते. इथं पडल्या या ताईसाहेब ! मूग गिळून स्वस्थ बसलों. नुसता चला, चला, म्हणत होतों. पण यांचा पाय कांहीं केल्या तिथून हालेना—"

आई अगदीं गंभीरपणें ऐकत होती. मी उंबरठ्याच्या आत कांहीं पाऊल टाकलें नव्हतें. मी बाहेर उभी होतें आणि आई दोन हात दाराला धरून उंबरठ्यावर पाय देऊन उभी होती. ती मध्येंच म्हणाली, " हें खरं का ! "

मी मानेनेंच होकार दिला. तिनें पुन्हां विचारलें, " तूं पेंड खाल्लीस ! तेल्याच्या घरची पेंड खाल्लीस ! " पुन्हां मी मानेनें होकार दिला.

एकदम आईनें कडकडून माझे दोन गालगुच्चे घेतले. ह्या अनपेक्षित प्रकारामुळें मी स्तंभित झालें. पट्टेवाला माझ्याकडे पाहून डोळे मिचकावित हंसूं लागला.

आईनें ह्यापूर्वीं कधींच माझ्यावर असा हात टाकला नव्हता. पट्टेवाल्यादेखत तिनें माझे गालगुच्चे घेतले आणि तें पाहून त्याला समाधान वाटलें, याचाच मला संताप आला. त्या संतापाच्या भिरमिरीसरशीं मी धांवत जाऊन पट्टेवाल्याच्या थोबाडीत एक मडकावून दिली.

रागानें फणफणत आई एकदम बाहेर आली, आणि एकामागून एक चारपांच रपाटे तिनें मला हाणले आणि बखोटीला धरून मला घरांत लोटून दिलें.

मी जवळ जवळ तोंडघशीच पडणार होतें, पण तशीच सांवरून उभी राहिलें आणि आईकडे वळून म्हणालें, " ध्यानांत ठेव आई ! तूं आज मला मारलं आहेस ! माझा अपराध काय तें मला न सांगतां मला शिक्षा केलीस ! प्राण गेला तरी हें मी कधीं विसरणार नाहीं. "

मी तशीच तणतणत आंत गेलें आणि बिछान्यावर आंग टाकून रडूं लागलें. रडण्याचे उमाळ्यावर उमाळे येत असल्यामुळें माझा दम कोंडला जात होता. ते उमाळे अनावर होते. मारलें म्हणून मी रडत नव्हतें, पण मला निष्कारण मारलें, असें माझें मन मला ग्वाही देत होतें. त्यांतूनही नोकराच्या देखत माझा अपमान केला, आणि तोही नोकराच्या सांगण्यावरून—माझें म्हणणें काय आहे हें मुळींच न ऐकतां मला मार दिला—ह्याचेंच मला मरणप्राय दुःख होत होतें.

इतरांप्रमाणें वाईट शब्द वापरण्याची मला संवय असती, तर त्या वेळीं मीं आईला शिव्या दिल्या असत्या. नुसतें "दुष्ट—चांडाळ" एवढें तरी

म्हणावें असें मला वाटत होतें पण मी मन आंवरून धरलें. आईनें केलेली चुकी आपण केली, तर त्यांत आपला काय मान राहिला, असेंच मला वाटलें. आईने अविचार केला, पण आपण तसा न करतां तिचा अपराध पोटीं घालावा, अशा मनाच्या मोठेपणाचा विचार माझ्या बालबुद्धींतून वर उसळून आला. मी डोळे पुसले आणि इकडे तिकडे पाहिलें.

आई समोरच उभी होती. तिच्या डोळ्यांतून टपटप आसवें गळत होतीं. एखाद्या मानी राणीचें अवसान आणून कंबरेवर दोन्ही हात ठेऊन मी तिच्या-समोर उभी राहिलें आणि ताठर नजरेनें तिच्याकडे पाहू लागलें.

आईचा राग ह्यापूर्वींच निघून गेला होता. ती गुडघ्यावर बसली आणि मला घट्ट पोटाशीं धरून माझे मुके घेत म्हणाली, " जळळे ते माझे हात. पट्टेवाल्याच्या बोलण्यानं मला मिरमिरी आली आणि त्यासरशीं मी तुझा गालगुच्चा घेतला. "

तितक्याच गंभीरपणाने मी म्हटलें, " मी तुझीच मुलगी ना? मलाही मिरमिरी आली आणि म्हणूनच मी पट्टेवाल्याच्या थोबाडींत दिली. '

" जाऊं दे तें! आतां कांहींच बोलायचं नाहीं. तिकडेही कांहीं सांगायचं नाहीं. पट्टेवाल्याला मी चांगलं बजावून ठेवतें. ऊठ, न्हाणींत जा आणि हात-पाय धुऊन ये. " असें म्हणून आई चटकन् स्वयंपाकघरांत निघून गेली.

त्या दिवसाची ही हकिगत बाबांच्या कानीं गेली नाहीं.

---

## प्रकरण ३ रें.

# मोरुभाऊ वैद्य

त्या रात्रीं मला ताप आला. हवेंत कांहीं फरक नव्हता किंवा गांवांतही कांहीं तापसर नव्हती. माझें मन सांगत होतें, कीं माझ्या मनाच्या संतापानेंच मला ताप आला. आईलाही तसेंच वाटलें असावें. सकाळीं वैद्यबुवा तपासावयास आले त्यावेळीं त्यांनांही थोडासा विचार पडला. हे आमचे वैद्यबुवा ह्मणजे चिपळुणांतील एक मोठें प्रस्थ होतें. वैद्यकींत ते हुषार होतेच पण गांवच्या इतर व्यवहारांतही ते पुष्कळ मन घालीत असत. त्यांचें आडनांवही वैद्यच होतें.

मला तपासून झाल्यावर माझ्या बिछान्याशेजारींच ते बाबांबरोबर बोलत बसले. ताप फणफणत होता, डोकें चढलें होतें, तरीही माझें लक्ष त्यांच्या भाषणाकडेच लागलें होतें. त्यांचे शब्द मला मधून मधून अगदीं खोल ऐकूं येत असत, तर केव्हां केव्हां कानठाळ्या बसण्याजोगे मोठे वाजल्याचा भास होत असे.

ते ह्मणत होते, " बरं झालं रावसाहेब, ही तुमची मुल्गी आजारी पडली ह्मणून तुमच्या आमच्या ह्या गांठी भेटी झाल्या. गोखले घराण्याचा आणि आमचा अगदीं जवळचा संबंध आहे. नामदार गोखले आणि मी आतेमामेभाऊ—किंबहुना अगदीं सख्या भावासारखा आमचा लोभ आहे. तेही इभ्रामपुरचेच कीं नाहीं ! तुह्मीही मूळचे इभ्रामपुरचेच असाल. आमच्या घराण्याचे फांटे घाटावर पसरले आहेत—पण ते आतां कोंकणची ओळख ठेवीत नाहींत. तुह्मीं साताऱ्याचे ह्मणवतां—कांहीं तर जमखंडीचे म्हणवितात—कांहीं सांगलीकर होऊन बसले आहेत—आणि पुणेकर तर सर्वांत मोठे झाले आहेत. पण खरं पाहिलं तर गोखले तेवढे इभ्रामपुरचे. दौऱ्याच्या वेळीं तुम्हीं इभ्रामपुरला गेलांही असाल—पण हें आपलं गांव आहे ह्याची तुम्हांला जाणीवही झाली नसेल."

बाबा अगदीं स्वस्थ राहून ऐकत होते. देहस्वभावाप्रमाणें मधेंच तोंड घालून कांहीं तरी बोलावें, असें माझ्या मनांत येत होतें खरें, पण जिभेवर शब्दच उमटत नव्हता.

बाबा उगीच राहिले असें पाहून मोरोबा वैद्य म्हणाले " रावसाहेब, आपण गैरसमज करून घेऊं नका. आपल्याशीं नातं जोडून दाखवण्यांत मला कांहीं लम्यांश नाहीं. तुमच्याकडे दुसऱ्या कोणाचा वशिलाही मला लावायचा नाहीं. जवळ जवळ दोन वर्षे तुम्हीं इथं आहांत—पण मी कधीं तुम्हांला भेटायला सुद्धां आलों नाहीं, यावरून तरी तुम्हांला माझं धोरण कळायला पाहिजे होतं. गणू पट्टेवाल्यानं बोलावलं म्हणूनच मी मुद्दाम आलों, नाहीं तर मामलेदार मुन्सफांचे उंबरटे झिजवणारांतला मी नव्हे, एवढं ध्यानांत ठेवा."

ओशाळल्या वाणीनें बाबा म्हणाले " असा गैरसमज करून घेऊं नका वैद्यबुवा. मी नुसता विचार करीत होतों. कोंकणचे लोक आम्हीं—घाटावर गेलों—पण मूळ विसरलों का ? " असा प्रश्न माझ्या मनांत आला.

मोरोबा वैद्य उसळून उठून म्हणाले " तुम्हींच कां, सारेच कोंकणस्थ आपलें मूळ घर विसरले आहेत. मूळ भूमि कोंकणांत—जन्म सुद्धां कोंकणचाच, पण कोंकणचं नांव घ्यायला शरमतात. आम्हीं घाटावरचे, कुणी आमचे वाडवडील असतील कोंकणांत—असं तुच्छतेनं सांगतात, हें बरं का ! आम्हीं आपल्याला स्वच्छ चित्पावन म्हणवतों—पण नांव सांगतो कोंकणचं ! तुम्हीं कोंकणस्थ म्हणवतां आणि गांव सांगतां घाटावरचं. कोंकणस्थ म्हणवायचं आणि कोंकणचं नांव घेतलं कीं नाक मुरडायचं, ही वृत्ति प्रामाणिकपणाची आहे काय ! आईला विसरून दाईचं नांव लावण्यासारखंच हें कृतघ्नपणाचं कृत्य होत आहे, असं नाहीं का तुम्हांला वाटत ? "

" खरं आहे " एक सुस्कारा टाकून बाबा म्हणाले, " तुमचा हा चाबूक मला चांगला वर्मी बसला आहे. यापुढें तरी मी साताऱ्यचं नांव सांगणार नाहीं. "

" माफ करा रावसाहेब, " मोरोबा वैद्य म्हणाले, " माझ्या बोलण्यानं तुमच्या मनाला लागलं असेल तर त्याची मला क्षमा करा. पण काय करूं ! मला ह्या गोष्टीची चीडच येते. जेव्हां जेव्हां मी पुण्याला गोपाळरावांकडे जातों,

जेव्हां तेव्हां मला अगदीं हेंच दिसून येतं. आणि म्हणूनच माझं मस्तक मणमणतं—"

तशा त्या फणफणाऱ्या तापांतही बरळल्यासारखा माझ्या तोंडून उद्गार निघाला " मी कोंकणची आहे. ऐकलंत मोरूभाऊ—मी कोंकणची आहे—मी बरी झालें कीं मला इभ्रामपुरला न्या—"

माझ्या डोक्यावरून हळुहळू हात फिरवित वैद्यबुवा म्हणाले, " नेईन हं बाळ. मी स्वतः तुला घेऊन जाईन आणि तुला तुझ्या देवाच्या पांयावर घालीन. "

तापांत माझें बरळणें वाढेल या भीतीनें बाबांनीं बहुधा वैद्यबुवांना खूण केली असावी. कारण दोघेही तिथून एकदम उठले आणि बाहेरच्या दिवाणखान्यांत गेले. माझा ताप सारखा वाढत होता. " मी कोंकणची आहे. इभ्रामपूरची आहे. " हें एकच वाक्य मी सारखी बरळत होतें.

त्या तापाच्या गुंगींत माझ्या डोक्यांत सारखे विचार चालले होते. वैद्यबुवांचें भाषण ग्रामोफोनच्या लावलेल्या तबकडीप्रमाणें मला पुन्हां पुन्हां ऐकूं येत होतें. त्या भाषणांतील एका विशिष्ट वाक्यावरून माझ्या मेंदूचा कांटा स्थिरावला. ' गणू पटेवाल्यानं बोलावलं म्हणून मी आलों ' हे वैद्यबुवांचे शब्द पुन्हां पुन्हां ऐकू येऊं लागले. पाटीवरच्या पुसून टाकलेल्या शुद्धलेखनांतील एकच ओळ न पुसतां रहावी, तसेंच हें झालें होतें.

एकूण गणू पटेवाल्यानें मोरूभाऊ वैद्यांना बोलावलं तर ! कां बोलावलं ? गणू पटेवाल्याला मोरूभाऊंनाच बोलवावं असं कां वाटलं ? गणू पटेवाला आपण होऊनच त्यांना बोलवायला गेला कीं आईनें त्याला बोलवायला सांगितलें !

काल मी गणू पटेवाल्याच्या थोबाडींत मडकावली होती. आईनें त्याबद्दल मला खरपूस बक्षिस दिलें होतें. तें गणू पटेवाल्याच्या मनाला लागलें का !

कां लागावें ? मीं त्याला मारलें—त्याचें प्रायश्चित्त मला मिळालें. उलट गणू पटेवाल्याला आनन्द झाला पाहिजे होता. मग त्यानें मोरूभाऊंना कां बोलावलें ! बाबांचा वैद्यावर विश्वास नसे, आईही त्यांच्या विरुद्ध जात नसे.

बाबांना वारंवार हिंवताप येण्याची संवय होती. त्या वेळीं ते सरकारी डॉक्टरला बोलावीत असत. मग आज मोरूभाऊ वैद्य कसे आले ?

वैद्य या नात्यानें मोरूभाऊंची चिपळुणांत जरी फार सुख्याति होती, तरीही त्यांच्या छानछोकीच्या पोषाकावरून सभ्य समजले जाणारे लोक त्यांना कमी लेखीत असत. त्यांची ती झिळमिळ्यांची किरमिजी पगडी, कानांतील मोठ्या दोन मोत्यांची भिकबाळी, तिला लटकलेला पाचूचा झळकणारा खडा, रेशीमकाठीं नागपुरी उपरणें, मोठ्या घेराचा पेशवाई आंगरखा, जमिन झाडण्या इतकें लांब नेसलेलें तलम धोतर, हातांतील चांदीच्या मुठीची काठी आणि या सर्व जोडणीला उठाव देणारा नामदार गोखल्यांइतकाच सुन्दर असलेला त्यांचा चेहरा पाहिला, कीं अतिसभ्य ह्मणवणाऱ्या पण पदवीपायीं निस्तेज कृश देह बाळगणाऱ्या वरच्या दर्जाच्या लोकांना मत्सर वाटल्यास नवल कसलें ! थट्टेनें ते त्यांना ' दुष्यंत ' ह्मणत असत. पण दुष्यंताच्या पोषाकांत चेहऱ्यापलीकडे दुसरें कांहींच साम्य नव्हतें, असें म्हटलें तरी चालेल.

गांवांतील एक सभ्य आणि प्रतिष्ठित गृहस्थ, त्यांतून वैद्य असतांना गांवकीच्या खासगी नाटकांत ते कामें करीत असत, म्हणून त्यांना 'दुष्यंत' म्हणत असल्यास नकळे. मी शाळेंत जातां येतांना त्यांना कितो तरी वेळां पाहिलें होतें. पण प्रत्यक्ष त्यांचा परिचय होण्याची वेळ आली नव्हती. ते आमच्या घरीं येत नसत म्हणून बाबाही त्यांना तुच्छतेनें लेखीत असत. असें असून मला पहाण्यासाठीं गणू पटेवाल्यानें त्यांना कां आणलें ?

गणू पटेवाल्याची वैद्यबुवांवर फार निष्ठा होती. त्याच्या बायकोला त्यांनीं काळाच्या दाढेंतून काढलें असें तो वारंवार सांगत असे. बाबा ज्या ज्या वेळीं आजारी पडत, त्या त्या वेळीं वैद्यबुवांना बोलावून आणण्याबद्दल तो भुणभुण लावी. पण मामलेदाराच्या घरीं पटेवाल्याचें कोण ऐकणार ? आधींच बाबांचा डॉक्टरांवर विश्वास—त्यांतून रजा घेण्याचा प्रसंग आल्यास डॉक्टरचें सर्टीफिकेट मिळविण्याची जरूरी, ह्या दोन्ही गोष्टींमुळें वैद्यबुवांचा प्रवेश आमच्या घरीं ह्यापूर्वी झाला नव्हता. मग आजच गणूनें हा धीर कसा केला ?

गणूचा डॉक्टरांवर मुळींच विश्वास नसे. डॉक्टरांना नाडीज्ञान नाहीं आणि नाडीज्ञानाशिवाय रोगाचें निदान करतां येत नाहीं, असा त्याचा ठाम समज

होता. डॉक्टरकडून माझ्या आजारीपणाची परीक्षा होणार नाहीं असें त्याला वाटलें असेल का ? मोरूभाऊ आले तरच माझें योग्य निदान ठरवितील आणि योग्य उपचार होतील, या खात्रीनें बाबांच्या रागाची पर्वा न करतां आपल्याच अधिकारांत त्यानें मोरूभाऊंना बोलावून आणलें असेल का ?

विचार करतां करतां आणखी एक कल्पना माझ्या डोक्यांत आली. कालच्या मारामारीची हकिकत तर त्यानें वैद्यबुवांना सांगितली तर नसेल ? अस्सल कारण न कळल्यामुळें डॉक्टरच्या हातून योग्य उपचार होणार नाहींत या भीतीनें सर्व हकिकत सांगून मोरूभाऊंना तर त्यानें बोलावून आणलें नसेल ?

माझा जीव ओशाळल्यासारखा झाला. मी ज्याच्या थोबाडींत मडकावली त्यानें माझ्याविषयीं एवढी कळकळ कां बाळगावी ? मला वाटलें, गणूच्या अंगीं माणुसकी आहे. ठकूच्या घाण्यावर मी गेलें म्हणून मला रागें भरणारा गणू माझ्यासाठीं बाबांच्या मर्जीविरुद्ध वैद्यबुवांना बोलावून आणतो हें पाहून माझा जीव शरमिंदा झाला. मला वाटलें, कीं गणूची किंमत मला कळली नाहीं. ठकूच्या घाण्यावर मी गेलें ह्या गोष्टीमुळे राग वाटण्याच्या ऐवजीं खरोखर त्याला अंतरांत आनंद तर झाला नसेल ? बाबांच्या मताप्रमाणें तो त्याला गुन्हा वाटला, पण त्याच्या स्वतःच्या—गरीब बिचाऱ्या गणू पटेवाल्याच्या—दृष्टीनें तो प्रसंग चांगला ठरला असेल काय ?

एकाएकीं गणू पटेवाल्याच्या मनांत माझ्याबद्दल कळकळ उत्पन्न होण्याचें दुसरें कोणतेंही कारण मला दिसेना. माझ्या अंतराची स्वभावामुळें नुसते शिपाई चाकरच नव्हे, तर कारकून शिरस्तेदारसुद्धां मला भीत असत. यापूर्वी गणू पटेवाल्यानें केव्हांही माझ्याविषयीं कळकळ दाखविली नव्हती. सर्वच मला भीत असत तसाच तोही मला भीत असे. भीतीपायीं कांहीं कळकळ उत्पन्न होत नाहीं. जिव्हाळ्याचा ओलावा उत्पन्न व्हायला तसेंच कांहींतरी कारण घडावें लागतें. ठकूचा घाणा हेंच तें कारण काय ? मी ह्या गोष्टीचा छडा लावण्याचा निश्चय केला.

मी फार दिवस बिछान्यावर पडून राहिलें नाहीं. गणू मात्र घटकोघटकीं येऊन माझा समाचार घेत असे.

दोन दिवसांनी वैद्यबुवा आले आणि त्यांनी मी बरी झाल्याचें जाहीर केलें. दोन तीन दिवस विश्रांति घेऊन नंतर शाळेंत जाण्यास हरकत नाहीं असे बाबांना सांगून ते निघून गेले.

वैद्यबुवा निघून गेले तरी गणू माझ्या बिछान्याशेजारीं बसला होता. खोलींत कुणी नाहींसें पाहून तो अगदीं हलक्या आवाजानें म्हणाला, " देवानं खैर केली, माझ्यावरचं किटाळ दूर झालं."

" तुझ्यावरचं किटाळ ! " मी आवेशानें म्हणालें, " गणबा, तुझ्यावरचं किटाळ! किटाळ जर कुणावर असेल तर तें माझ्यावरच. मी रागाच्या भरांत तुझ्या थोबाडींत दिली ! जळले ते माझे हात ! कुठली मला दुर्बुद्धि झाली ! "

" असें म्हणूं नका ताईसाहेब. " गणू अदबीनें म्हणाला, " तुमच्या सारख्यांच्या हातच्या चापट्या खाण्यासाठींच देवानें आम्हां गरिबांना गाल दिले आहेत. तुमच्या हातची चापटी मिळाली—आम्ही ती मुकाट्यानं सहन केली, तर आम्हांला स्वर्ग मिळेल. "

मला एकदम हंसूंच लोटलें. मी हंसत हंसतच म्हटलें, " हें काय म्हणतां गणबा ! चापट्या खाऊन का कुठं स्वर्ग मिळत असतो ! स्वर्गाचं राहूंदे बाजूला, पण मला आधीं असें सांगा, मोरूभाऊ वैद्यांना कुणी बोलावलं ? "

अगदीं मनांतल्या मनांत गुदगुदत गणू म्हणाला, " संधि अगदीं नामी मिळाली. दोन दिवसांत तुम्ही उठलां कीं नाहीं बिछान्यावरून ! त्या डॉक्टरानं तुम्हांला पंधरा दिवस बिछान्यावर लोळवलं असतं. एरव्ही रोजचे सहा आणे कसे वसूल झाले असते ! शिवाय तपासायची फी ! चोर कुठले ! औषधाच्या नांवाखालीं नुसते पैसे उकळीत असतात. मोरूभाऊंना नुसता एक रुपया द्यावा लागला. पण त्या डॉक्टरानं—चोरानं—पंचवीस रुपये उकळले असते. आतां एक रुपयांत आणि दोन दिवसांत गूण आला, तो मोरूभाऊंच्या औषधानंच ना ! आम्ही गरीबांनीं थोरांमोठ्यांना कोणत्या तोंडानं सांगायचं ! पण आतां बाईसाहेबांची तरी खात्री पटली. आणि ते म्हणे तुमच्या आत्याचेच आहेत— "

मी हलूच बिछान्यावरून उठलें, गणूच्या कानाशीं तोंड नेलें आणि म्हटलें, " मारामारीची हकीकत सांगितलीत कां मोरूभाऊंना ?

तितक्यांच गंभीरपणें गणू म्हणाला " त्याशिवाय का असा चटकन् गूण आला ! देवाजवळ आणि वैद्याजवळ कांहीं लपवून चालत नाहीं. "

" खरं आहे, " मी म्हटलें, " ठकूनं चौकशी केली का माझी ? " डोळ्यांत नकळत येणारीं आंसवें पुशित गणू म्हणाला, "दिवसांतून तीन खेपा घालीत होती पोर. पण कुणीच तिला आंत येऊं दिलं नाहीं ! "

गणूच्या खांद्यावर हात टाकून लडिवाळपणें मीं म्हटलें, "तर मग गणबा, ठकूच्या घाण्यावर मी गेलें म्हणून तुम्हांला कांहीं मनापासून राग आला नाहीं तर ? "

" आतां ह्याचं उत्तर कसं देऊं ? " असें म्हणत असतांना गणूच्या डोळ्यांतून टपाटप आंसवें गळत होतीं. गणूच्या गळ्याशीं जास्तच बिलगून मी म्हटलें, "आणि मी तुमच्या घरीं आलें तर ? "

माझे दोन्ही गाल आपल्या हातांत घट्ट पकडून गणू आवेशानें म्हणाला, " खरंच ? ताईसाहेब, माझ्या घरीं याल–गणू पट्टेवाल्याच्या घरीं याल ! तुम्हीं माझ्या घरीं याल ? "

मी हंसत हंसत उत्तर दिलें, " कां येणार नाहीं ! ठकूच्या घाण्यावर नव्हतें का मी गेलें ! "

गणूचा आनंद त्रिभुवनांत मावेना. कोसळत्या पावसांत उन्ह प्रकाशावें, तशी त्या टपटप आंसवांतून उसळणाऱ्या आनंदाची छकेर त्याच्या चेहऱ्यावर खुलून उठली.

---

# प्रकरण ४ थें

## पुन्हा शाळेंत

दोन दिवसांनीं मी शाळेंत गेलें. वर्गात ठकूची भेट होतांच तिनें पहिल्यानें माझ्या प्रकृतिची चौकशी केली.

मी म्हटलें " मी शाळेंत आल्यावरूनच नाहीं का कळत ! चांगली बरी झाल्याशिवाय का शाळेला आलें ! "

थोडेसें ओशाळल्यासारखें करून ठकू म्हणाली " अशी रागावूं नकोस गडे. किती किती वेळां मी तुझ्या घरीं गेलें, पण मला कुणिच तुझी बातमी देईना. गणू पटेवाल्याचा माझ्यावर राग आहे कीं नाहीं—त्या दिवशीं तुला आमच्या वाण्यावर घेऊन गेलें होतें ना ! त्या रागानं धुसपुसत होता तो. दुसऱ्या कुणाला विचारून पाहिलं, त्यांनीही धुडकावून काढलं. आम्हीं गरीब माणसं अंगावर धड कपडे नाहींत, थोरामोठ्या घरचीं माणसं—कशीं बोलणार आमच्या बरोबर !—आणि आतां तूंही अशी रागावतेस. "

नित्याच्या संवयीनें माझ्या तोंडून उर्मटपणाचें उत्तर गेल्याचा मला पश्चात्ताप झाला आणि त्याच भावनेनें मी उत्तर दिलें, " अशी रागावूं नकोस गडे. मला ही वाईट खोड लागली आहे. सहजी उत्तर दिलं तरी उर्मटपणा तोंडीं येतो. एकूण गणू पटेवाल्यानंच तुला आंत यायला अडथळा केला ! "

माझ्या मनांतून झटकन विचार निघून गेला. गणू पटेवाल्याच्या बोलण्याचा आणि करणीचा मेळ कसा घालायचा ! ठकूला कुणि आंत येऊं दिलं नाहीं अशी त्यानेंच तक्रार केली—आणि आंत येऊं न देणारा तोच !

ठकू म्हणाली " मला किती किती वाईट वाटलं म्हणून सांगू ! आपलं मन मला सांगत होतं, कीं माझ्यामुळं हें सारं झालं. बाहेरून बाहेरून बातमीही कळली, गणूची आणखी तुझी घाण्याच्या बाबतींत कांहीं झटापट झाली म्हणून. तुझी आईही म्हणे तुला रागें भरली ! खरं का हें ! त्यामुळंच का तुला ताप आला ! "

मोठ्या माणसांच्या घरच्या क्षुल्लक बातम्या देखील गांवांत किती लौकर फैलावतात ह्याची मला कल्पना आली. आश्चर्य वाटलें तें ठकूच्या विचारसरणीचें. डॉक्टरवैद्यापेक्षां देखील तिला माझ्या रोगाचें निदान अचूक करतां आलें! मला दुसरें आश्चर्य वाटलें तें तिला ही बातमी कुणी सांगितली याचें. पण त्याचेंही निराकरण त्याच क्षणीं झालें.

चौथ्या नंबरला असलेली मुलगी म्हणाली "मीच सांगितलं तिला. आमचे बाबा कचेरींत कारकून आहेत ना! ते त्यावेळीं तुमच्या घरीं आले होते. गणूच्या थोबाडींत तू दिलीस असं जेव्हां बाबांनीं सांगितलं तेव्हां मला किती गंमत वाटली! मो त्यावेळीं तिथं नव्हतें त्याचं मला फार वाईट वाटलं."

मी तिच्याकडे वळून रोखून पाहिलं. ह्या पूर्वीं तिनें माझ्याशीं बोलायला सुरुवात केली नव्हती. मी कपाळाला लहानशी आंठी घालून तिला विचारलें, "तुझे बाबा आमच्या कचेरींत कारकून असतात तर!"

"हो" ती म्हणाली, "तरी पण कचेरींतच कारकून असतात असं कांहीं म्हणतां यायचं नाहीं. ते आहेत भागकारकून. महिन्यांतून पंधरा वीस दिवस त्यांना खेड्यांतून फिरावं लागतं. त्याच दिवशीं ते गांवाहून आले होते. त्यांनीं मला सांगितलं."

"आणि तूं ऐकून साऱ्या गांवभर डांगोरा पिटलास," मी कुत्सितपणें बोललें "असंच ना!"

ठकू दुसऱ्या बाजूनें उद्गारली, "आला वरं तुझा उर्मटपणा! मी कळकळीनं विचारीत होतें, तुझ्या घरच्या माणसांनीं दाद दिली नाहीं, तिनं बिचारीनं सांगितलं, तर तिच्या अंगावर येतेस! हें असलं कांहीं बरं नाहीं. ही मामलेदारी हवी तर घरी गाजीव. पण गांवांतल्या शाळेत आम्ही सारीं मुलं सारखीं आहोंत. इथं नको ह्या मामलेदाऱ्या—" चौथ्या नंबरच्या मुलीकडे वळून ती म्हणाली, "काय बने, कसं उत्तर दिलं!"

"तुझं नांव बनी वाटतं!" मी विचारलें, "आणि आडनांव?"

"आडनांव गोडबोले" बनी म्हणाली, "आतां तुला कदाचित आठवण होईल. रावसाहेबांनीं केव्हां तरी बाबांचं नांव ऐकलं असेल—"

" असेल, पण मला कांहीं आठवत नाहीं. ह्यापूर्वी मी कधींही ह्या गोष्टी-कडे लक्षच दिलं नव्हतं. आपली आपल्याच तोऱ्यांत चूर असें. तुम्ही मला कदाचित नांवंही ठेवित असाल, पण माझ्या तें ध्यानांत येत नव्हतं. ठकूच्या घाण्यावर गेलें, तेव्हांपासून बरेच धडे मिळाले. "

आम्ही पुरत्या काढीत होतों आणि लिहित असतांना मधून मधून बोलत होतों. आमची पुरती काढण्याची वेळ म्हणजे मास्तरांची विश्रांतीची वेळ असे. याच वेळीं बरेचसे मास्तर बाहेर जाऊन विडया ओढीत असत. आम्ही बोलत असतांना आमचे मास्तर आंत आले. बोलण्याच्या भरांत तें आमच्या ध्यानीं आलें नाहीं. ते आले त्यावेळीं बोलत होतें मी. पण मला रागें भर-ण्याची त्यांची प्राज्ञा नव्हती. ठकूला उद्देशून ते म्हणाले, " काय ग ठके, काय बडबडते आहेस? बडबडल्याशिवाय पुरत्या काढतां येत नाहींत ? असल्या वाचाळपंचविशीनं उद्यां नंबर घालवून बसशील. आपण बडबडायचं तें बडबडायचं, आणि दुसऱ्याला अडथळा. ताईसाहेबांना त्रास होईल ना !–"

माझ्यानें रहावेना. " बोलत होतें मी बरं मास्तर " मी चटकन् म्हटलें, " बोलत होतें मी आणि माझा राग तिच्यावर कां बरं काढतां ? आणि आतां ही ताईसाहेबीही पुरे झाली. मला शाळेंत आपली गोदूच म्हणत जा. घरीं म्हणा हवें तर ताईसाहेब म्हणून–आईबाबांची भीति वाटत असेल तर. पण मला इथं ताईसाहेब म्हटलेलं नाहीं आवडायचं. हिला कुठं बनीसाहेब किंवा ठकूसाहेब नाहीं म्हणत तें !

बनी आणि ठकू खुदखुदून हंसल्या. मास्तर थोडेसे रागावलेच पण " बरं बरं" म्हणत खुर्चीवर जाऊन बसले. माझ्या या उर्मटपणाबद्दल ठकू कांहींच बोलली नाहीं. मात्र त्यानंतर आमचें बोलणें तेवढेंच राहिलें.

गणिताच्या तासावेळीं ठकूनें मला म्हटलें, "तितकंसं बरं वाटत असेल तर आज ये ना घाण्यावर. " मी थोडा वेळ विचार केला. काय उत्तर द्यावें ह्या विचारांत मी होतें तोंच ठकू म्हणाली, " प्रकृती बरी नसेल तर आजच येऊं नकोस. पुन्हां केव्हां तरी जाऊं तुला बरं वाटल्यावर. "

मी उत्तर दिलें " तसं नव्हे, आज यायला कांहीं हरकत नव्हती. पण आज मी गणू पटेवाल्याच्या घरीं जाणार आहें. "

" अगबाई ! गणू पटेवाल्याच्या घरीं ? " ठकू म्हणाली.

मी जरा खोंचून बोलले " का बरं? तुझ्या घाण्यावर नाहीं का आलें मी ? "

ठकू ओशाळून म्हणाली " तसं नव्हे–गणू पटेवाल्याचं आणि तुझं भगडं झालं, तरीही तूं त्याच्या घरीं जाणार आहेस ? "

मी थोड्या अभिमानानें उत्तर दिलें, " म्हणनच त्याच्या घरीं जाणार आहें. त्या बिचाऱ्याचा कांहींच अपराध नव्हता. मी तुझ्या घाण्यावर गेलें आणि तो बरोबर होता, हें जर बाबांना कळलं असतं तर त्याची नोकरी गेली असती. त्यानं केलं तें अगदीं योग्यच केलं. मी तुझ्या घाण्यावर गेल्याचं पुष्कळांनीं जातां येतांना पाहिलं असेल. कुणितरी बाबांकडे चुगली केली असती आणि तो राग बाबांनीं गणूवर काढला असता. मी तुझ्या घाण्यावर गेल्याचं मनापासून गणूला आवडलंच, पण बाबांच्या रागाच्या भीतीनं तो तसं बोलत होता. त्यानंच सांगितलं मला हें. " असें म्हणून मी त्या दिवशीं गणूचा आणि माझा झालेला संवाद तिला सांगितला.

" मोठं आश्चर्य आहे, " ठकू म्हणाली, " मला वाटतं, त्याचमुळं त्यानं मला तुझ्या घरीं गेलें असतां आडवलं असेल. एकदां तो आंत जाऊन आला खरा; त्यावेळीं कदाचित बाईसाहेबांना–तुझ्या आईला विचारूनही आला असेल. आतां मला चांगलं आठवलं. त्यावेळीं कांहीं माझ्या ध्यानांत आलं नाहीं. त्यावेळीं अपमान झाला याच रागांत मी होतें. "

सर्व कांहीं कोडीं उलगडलीं. त्यानंतर या विषयावर आमचें फारसें बोलणें झालें नाहीं. वर्ग चालत असतां मी मधूनमधून तेल्याच्या ठकूबरोबर आणि गोडबोल्यांच्या बनीबरोबर उगीच कांहींतरी कारण काढून बोलत होतें. मास्तरांच्या तें ध्यानीं आलें. दोनतीन वेळां त्यांनीं आमच्याकडे डोळे वटारून पाहिलेंही. पण मी मनाचा निश्चय केला होता, कीं मास्तरांना कांहींही करून आज खिजवायचेंच.

व्हायचा तो परिणाम झाला, आणि मास्तर शेवटीं गंभीरपणें म्हणाले, " गोदूताई, हें बरं नव्हें–" ताईसाहेब म्हणायचें नाहीं आणि गोदूही म्हणायचें नाहीं असें ठरवून मामलेदारीचा मान राखण्यासाठीं मास्तरांनीं हुडकून काढलेलें हें संबोधन ऐकून मला कौतुक वाटलें. " गोदूताई मी पुन्हां सांगतों,

हें बरं नव्हे ?" मास्तर म्हणाले, " मीं कानाडोळा करतों याचा फायदा घेणं तुम्हाला शोभत नाहीं. ठकू एक तेल्याची मुलगी आहे, आणि बनी रावसाहेबांच्या हाताखालच्या एका पंचवीस रुपये पगारवाल्या कारकुनाची मुलगी आहे, हें तुम्हीं विसरतां कामा नये–"

मी बसल्या जागेवरून उभी राहून म्हटलें, " तेल्याची मुलगी असली म्हणजे काय नकटी असते, कीं पंचवीस रुपयेवाल्या कारकूनाची मुलगी आंधळी असते ? कुणाला ठाऊक, कदाचित् आमच्या बाबांचे वडील पंचवीस रुपयेवाले कारकून नव्हते असतील कशावरून ? "

वर्गांतील सारीं मुलें खों खो हंसू लागलीं. हातांतील छडी कडाकड टेबलावर वाजवून मास्तर ओरडले, " चूप–गडबड बंद. " माझ्याकडे वळून ते म्हणाले " गोदू गोखले, पांच नंबर खालीं जा. "

मी विचारलें " एवढ्या वेळापुरतं कीं रोज ? " वर्गांत पुन्हां एकदां हंशा पिकला.

पुन्हां टेबलावर छडी वाजवित मास्तर म्हणाले, " फाजिलपणा करूं नकोस. पांच नंबर खालीं जा. याचवेळीं कीं रोज ते कळेल उद्यां. इथं मी मास्तर आहें, तूं मास्तर नाहींस, हें ध्यानांत ठेव. "

वर्गाच्या डाव्या कोंपऱ्यांतील एक लहानशी मुलगी मोठयानें पुटपुटली- " ताईसाहेब म्हणा ताईसाहेब. रोज 'अहो' 'जाहो' म्हणतां–आजच 'अग' 'तुग' कां मास्तर ! "

डाव्या कोपऱ्याकडे झटकन् नजर वळवून मास्तर ओरडले " यमिटले, गप्प बैस. जीभ फार लांब झाली वाटतं ? खुर्ची मिळेल भिंतीला ! मुलगी म्हणणार नाहीं–घोडीवर उलटी टांगीन. मी मुलांच्या शाळेचा मास्तर होतों हें माहित आहे ना ? पुस्ती काढायच्या वेळेस मानेवर दौत ठेविन ! फार फाजिल झाल्या आहेत पोरी ! "

रागारागानें मास्तर वर्गाबाहेर निघून गेले. ते बाहेर गेलेले दिसतांच साऱ्या मुली येऊन माझ्या समोंवार गोळा झाल्या आणि तोंड भरून मला शाबासकी देऊं लागल्या. शेवटीं यमू म्हणाली, " कसं उत्तर दिलं मास्तरनां !

पळवून लावलं कीं नाहीं वर्गांतून ? म्हणे मुलांच्या शाळेचे मास्तर होतो ! काय मुलगे म्हणजे वाघ आहेत आणि मुली म्हणजे गरीब गाया आहेत ? कशी उडाली मास्तरांची। ”

गंभीरपणानें ठकू म्हणाली, “ असं म्हणूं नये यमे. किती झालं तरी ते आपले मास्तर आहेत—गुरुजी आहेत—वडील माणूस आहेत. वडील माणसांना उलटून उत्तर देऊं नये. ”

“ मोठी आली आहे आजीबाई सांगायला ! ” यमू म्हणाली, “ मी दिलीं तीं उलटून उत्तरं आणि गोदूनं दिली ती फुलं वाटतं जासवंदीचीं ! मामलेदाराची मुलगी म्हणून तिचा कड घेते आहेस ! मला माहित आहे तुझ्या घाण्यावर ती गेली होती ती ! आमच्या दुकानीं देखील घेऊन जाईन एक दिवस. आमच्या बाबांचं किराण्या मालाचं दुकान आहे. आमच्या दुकानीं बदाम आहेत—पिस्ते आहेत—भुईमुगाच्या शेंगा आहेत—घांटावरचा गूळ आहे. तुझ्या घाण्यावर काय ? नुसती खोबऱ्याची पेंड ! ”

ठकूला कांहीं उत्तर सुचेना. ठकूची बाजू सांवरण्यासाठीं मी पुढें सरसावलें आणि म्हणालें, “ तुझ्या बदाम पिस्त्यापेक्षां खोबऱ्याची पेंडच चांगली. ती कांहीं तुझ्या दुकानीं मिळायची नाहीं. ”

सर्व मुलींनीं टिऱ्या पिटल्या. ठकूच्या अंगावर मुठभर मांस चढलें. यमू अगदीं ओशाळून गेली. पण आपली फजिती झाली नाहीं असें ठरवण्याच्या उद्देशानें म्हणाली, “ आमच्या दुकानीं खोबऱ्याची पेंडही नाहीं आणि सुके बोंबिलही नाहींत ! ”

पुन्हां सर्व मुलींत हंशा पिकला. सुके बोंबिल म्हणजे काय, हें मला माहित नव्हतें. इतर मुलींना हसूं येण्याजोगा तो शब्द होता, एवढेंच मला कळलें. विचारावें तर आपलें अज्ञान उघडें पडेल, या अभिमानानें मी त्यावेळीं कुणालाच त्या शब्दाचा अर्थ विचारला नाहीं. पण कुणाला तरी—वर्गाबाहेरील इतर कुणाला तरी—विचारायचें एवढी खूणगांठ मी मनाशीं बांधून ठेवली. इतक्यांत मास्तर वर्गांत आले आणि साऱ्या मुली आपआपल्या जागीं जाऊन बसल्या. अर्थात तो विषयही तेवढाच राहिला.

शाळा सुटली. सर्व मुली घरोघर निघाल्या. मधल्या चवाठ्यावर येईपर्यंत ठकू आणि बनी माझ्याबरोबरच होत्या. माझें पाटीदप्तर घेऊन नित्याप्रमाणें गणू माझ्या मागून येत होता. मी सहज ठकूला विचारलें, " ह्या यमीचें आडनांव काय ? "

तिनें उत्तर दिलें " तिचं नांव यमू सारदळ. तिच्या बापाचं दुकान आहे. आमच्या घाण्यावर तो वारंवार येतो. आमच्याच घाण्यावरचं गोडं तेल त्याच्या दुकानीं विक्रीला असतं. "

बोलत असतांना रस्ते फुटण्याच्या जागीं आम्ही आलों. दोघीही माझा निरोप घेऊन आपल्या रस्त्याकडे वळल्या. गणू मागें घुटमळत होता, हें माझ्या ध्यानीं आलें. मी म्हटलें, " गणबा, कोणत्या वाटेनें तुमच्या घराकडे जायचं ? "

आनंदाच्या उकळ्यावर उकळ्या येत गणूनें विचारलें, " खरंच–खरंच, खरंच का तुम्ही माझ्या घरीं येणार ? "

कांहींच न बोलतां आमच्या घराची वाट सोडून कुठल्या तरी दुसऱ्या रस्त्याला मी वळलें, असें पाहून गणू म्हणाला, " तो नव्हे–माझ्या घरीं जायचा रस्ता तो नव्हे. असं या–या रस्त्यानं या ताईसाहेब. "

मी गणूच्या दाराशीं येऊन पोहोंचलें. एक बाई घाबऱ्याघुबऱ्या घराबाहेर आली आणि मला पहातांच 'आ' वासून उभी राहिली. तिला उद्देशून गणू म्हणाला, " पाहिलंस ? तुला खोटं वाटलं होतं ! पण आतां या पहा–प्रत्यक्ष ताईसाहेब आपल्या घरीं आल्या ! "

---

## प्रकरण ५ वें.

# सुके बोंबिल



गणूचें घर अगदीं रस्त्यावर नव्हतें. रस्ता सोडून बऱ्याच आंतल्या भागाला चांगलें पन्नास फूट रिकामी जागा सोडून त्याच्या पलीकडे हें घर–घर कसलें झोंपडीच होती.

नागू तेल्याच्या घाण्याच्या जागेप्रमाणेंच या घराच्या भिंतीही कारवीच्या खुंटावर मातीचा लेप केलेल्या होत्या. घराची मागली बाजू मात्र चिखल मातीची होती, त्यावरून पुढला भाग नंतर वाढवून घर वाटवलेलें असावें असें वाटे.

गणू घाईघाईनें आंत गेला आणि त्यानें एक खुर्ची बाहेर आणली. ती आणून ठेवतांच तिच्या खालून कांहीं कोळी आणि झुरळीं निघालीं. त्यांना झटकण्यासाठीं म्हणून त्यानें खुर्ची जमिनीवर आपटतांच खुर्चीचे दोन पाय मोडून पडले.

पहात उभी असलेली गणूची बायको एवढया मोठयानें हंसली, कीं तो आवाज कानीं जातांच गणू रागानें झटक्यासरशीं वळला. त्याची रागावलेली मुद्रा पाहून तीही गंभीर झाली. एक क्षणभर दोघें एकमेकांकडे पहात राहिलीं. मी तशीच अंगणांत उभी होतें.

बायकोच्या अंगावर वसकन् ओरडून गणू म्हणाला, “ लाज नाहीं वाटत हंसायला ? ही तुझी व्यवस्था ! ताईसाहेब काय म्हणतील ? ”

“मी कांहीं म्हणणार नाहीं बरं,” मी संयपणानें उत्तर दिलें, “ तुमचं घर म्हणजे मुन्सफाचं नव्हे किंवा वकिलाचं नव्हे–नुसत्या कारकुनाचं सुद्धां नव्हे ! असली खुर्चीसुद्धां इथं असेल असं मला वाटलं नव्हतं. त्यांत कशाला वाईट वाटायचं—”

मी बोलत असतांनाच गणूची बायको घरांत गेली होती, ती एक घोंगडी घेऊन बाहेर आली. ती घोंगडी तिनें जमिनीवर आंथरली आणि सूचक दृष्टीनें नवऱ्याकडे पाहिले.

" या बसा इथं ताईसाहेब. " असें तो म्हणतो न म्हणतो तोंच मी जाऊन त्या घोंगडीवर बसलेंही होतें. " या खुर्च्या आम्हांला काय कामाच्या ? मागें कुठल्या तरी एका रावसाहेबांनीं बदली होऊन जातांना एक पडित खुर्ची मला दिली होती तीच इथे सामानसुमान ठेवायला उपयोगी पडत असे. आम्ही कुठं कधीं बसणार खुर्चीवर ? आज तुम्हीं आलांत त्यावेळीं म्हटलं उपयोगी पडेल ! पण नाहीं—गरीबाघरची खुर्चीसुद्धां अशी आयत्या वेळीं दगा देते. " असें म्हणून गणूनें पुन्हा एकदां बायकोकडे आणि एकदां खुर्चीकडे पाहिलें.

अगदीं घाबरल्या स्वरानें तिनें मला विचारलें, " दुध आणूं का थोडं ? तापलेलं चालेल कीं निरस पाहिजे ? निरसं हवं असेल तर आतां पिळून आणतें. "

गणू तिच्याकडे वळून म्हणाला, " आतांच धार काढून आण. तेवढीच आमच्या घरची नवी नवलाई ताईसाहेबाना चाखूं द्या. त्यांच्या घरीं गवळी येऊन रोज धार काढून देतो खरा पण त्यांतल्या त्यांत हातचलाखी करून दुधांत पाणी मिसळतोच. असं निर्मळ दुध काहीं त्यांना मिळायचं नाहीं. "

गणूची बायको घरात गेली, त्यावेळी गणू तिला ओरडून म्हणाला " भांडं चांगलं घासून घे बरं. " पुन्हां माझ्याकडे वळून तो बोलूं लागला, "एक म्हैस पाळली आहे. पगारावर कसं भागणार ? एवढा घरप्रपंच चालवायचा तेव्हां थोडासा दुधाचा व्यापार त्यांतल्या त्यांत करतों. चारदोन उकाडे लावले आहेत. त्यांत म्हैशीच्या दाणावैरणीचा खर्च भागतो. चार पैसेही शिल्लक रहा-तात, नाहीं असं नाहीं. पण मुलांना चांगलं पोटभर दूध प्यायला मिळतं हा मोठा फायदा आहे. "

" किती आहेत तुह्माला मुलं, गणबा ? " मी जरा जपूनच विचारलें.

गणूनें उत्तर दिलें " तिचा एक मुलगा आहे—माझाही एक मुलगा आहे आणि शिवाय आमचीं चार मुलं आहेत. "

मुलांच्या या हिशेबाचा अर्थ मला कळला नाहीं. ' तिचा ' ' माझा ' आणि ' आमचा ' ह्मणजे काय समजायचे ? मी क्षणभर गणूच्या तोंडाकडेच पहात राहिलें. माझ्या शंकेची त्याला अटकळ आली—असावी कारण तो ह्मणाला " तुह्मांला प्रश्न पडला असेल, पण आह्मां कुणब्यांचं हें असंच

असतं. सर्वांत मोठा मुलगा आहे तो तिचा–म्हणजे तिच्या पहिल्या नवऱ्याचा. त्याच्याहून लहान आहे तो माझा–म्हणजे तो माझ्या पहिल्या बायकोचा. आणि बाकीचीं चार ही आतां आमचीं. एकूण तीन मुलगे आणि तीन मुली आहेत—म्हणजे ही माझी पाटाची बायको आहे."

'पाटाची बायको'–पाटाची बायको म्हणजे काय हें मला कांहींच समजलें नाहीं. विचारून घ्यावें तर आपलें अज्ञान उघडें पडतें, म्हणून विचारणेंही माझ्या जीवावर आलें. निदान गणूला तरी विचारायचें नाहीं, असेंच मी मनाशीं ठरविलें. माझ्या मनांत हे विचार चालले होते त्यावेळीं गणूचें बोलणेंही सुरू होतें, पण माझ्या विचाराच्या भरांत त्यांतलें कांहीं बोलणें माझ्या कानींही आलें नाहीं.

तो सारखा बोलतच होता, "–बरेच रावसाहेब येऊन गेले पण त्यांत या रावसाहेबांच्या कारकिर्दीत मला सूख लाभलें. मागले रावसाहेब फार खस्याळ होते. त्यांच्या घरीं कधीं सुद्धां माझा हात ओला झाला नाहीं. कामाचीही किटकिट फार. कधींच कांहीं मनाला यायचं नाहीं. त्या बाईसाहेबही तसल्याच होत्या. पण या बाईसाहेब म्हणजे एक माऊली आहे. तुम्हीं पहातच आहांत. सणसुदिनाला तर मला जेवायला बोलावतातच पण एरव्हीं देखील मुद्दाम हांक मारून आमटीभाजी देत असतात. एवढ्यानंच कुठं भागतं आहे? कुणी बाहेर गांवचे खोत कुळकर्णी आले तर भाजीपाला घेऊन येत असतात. त्यातली चांगली हात भरून भाजी मला देतात! कोण घेतं आहे एवढी गरीबाची काळजी? माझी कारबारीण तोंड फाटेपर्यंत बाईसाहेबांची स्तुति करीत असते. तरी अजून तिनं त्यांनां पाहिलं नाहीं—"

मी मध्येंच गणूला विचारलें "पण तुमचीं हीं मुलं कुठं आहेत?"

स्तुतिपठणाच्या आवेशांत विक्षेप येण्यापुरतें "असतील कुठं तरी खेळत." एवढेंच उत्तर देऊन तो पुन्हां मूळपदावर आला, "आज इतकी वर्षं नोकरी करतों आहें पण असा भरभरून भाजीपाला कुणी मला दिला नव्हता. म्हणून तर तिला चोज वाटतं. मुद्दाम शेजाऱ्यापाजाऱ्यांनां बोलावून आणून घरीं भाजी आली म्हणजे दाखवित असते. दिवाळीच्या वेळीं बंदरच्या भाटियांकडून फरकी येते, तेव्हां त्यांतले देखील बदामपिस्ते ओंजळ भरभरून बाई-

साहेब मला देतात. तुह्मीं पाहिलं नाहीं तें. थाईसाहेबाची आवड अशी गुपित दानाची आहे. आह्मां गरीबांना बदामपिस्ते कधीं पहायला मिळणार ! पण घरीं आले ह्मणजे शेजारी देखील कौतुक करतात. थोडासा त्यांनां मत्सरही वाटतो. हे रावसाहेब आल्यापासून असं हें भाग्य आलं आहे— ''

बदामपिस्ते म्हणतांच मला शाळेंतल्या संवादाची आठवण झाली. जिज्ञासा तृप्त करून घेण्याला ही संधि बरी आहे, असें वाटून मी विचारलें, " गणबा, सुके बोंबिल म्हणजे काय हो ? "

गणबा थक्क झाला. बदामपिस्त्याची गोष्ट चालली असतां मी काय हा मलतास प्रश्न केला, ह्याचें त्याला विलक्षण आश्चर्य वाटलें असावें, असें त्याच्या मुद्रेवरून दिसलें. माझ्या अचानक प्रश्नानें त्याच्या भाषणाची सांखळीही तुटली होती. कांहीं तरी उत्तर देऊन पुन्हां मुळपदावर यावें असें त्याला वाटत असावें, असें त्याच्या घुटमळण्यावरून वाटलें. तो क्षणभर गंभीर झाला. जरा गालांतल्या गालांत हंसला आणि म्हणाला, " सुके बोंबिल तुह्मांला काय माहित? कोण बोललं तुमच्याजवळ ? "

मीही थोडीशी ओशाळलें. " शाळेंत कुणी मुली बोलत होत्या. " असें कांहीं तरी वेळ मारून नेण्यासाठीं मी दिलेलें उत्तर ऐकतांच तो ह्मणाला, " आधीं तुह्मी रावसाहेब—त्यांतून बामण, तुह्मांला या असल्या पदार्थांची माहिती कशी होणार ? आमच्यासारख्या कुणब्यामाळ्याच्या घरींच असले जिनस असायचे. ती एक माशाची जात आहे. ते वाळवून ठेवीत असतात. आम्हां गरिबांचं तेंच खरं तोंडीलावणं. भाज्याबिज्या मिळायच्या म्हणजे तुमच्यासारख्या थोरामोठ्यांनीं दिल्या तर. एरव्हीं तीच आमची चटणी आणि तीच भाजी. फार स्वस्त मिळतात, वासही येतो आणि तोंडीलावणं भरपूर झाल्संसं वाटतं. "

इतक्यांत दुधाची चरवी भरून घेऊन गणूची बायको आली. अगदीं चकचकित घासलेलें एक फुलपात्र तिनें माझ्यापुढें ठेवलें. चरवीवर दुधाचा फेस फुलून आला होता, तो फुंकरीनें दूर सारून तिनें दुध फुलपात्रांत ओतलें आणि चरवी बाजूला ठेऊन ती अदबीनें म्हणाली, "ताईसाहेबांनीं गरीबाघरचं थोडं दूध मुखीं लावावं. "

तिच्या त्या वाक्यप्रयोगाचें मला हंसूंच आलें असतें पण तें गंभीरपणानें दाबून कांहींच न बोलता मी दूध प्यायला सुरवात केली. दूध अगदीं गरम गरम होतें— म्हणजे तापवल्या सारखें नव्हे—पण अशा उबेचा गरमपणा असलेलें दूध मी यापूर्वी कधींही चाखलें नव्हतें. या दूधाची रुचीही आमच्या घरीं येणाऱ्या दूधापेक्षां अगदींच निराळी होती. मी रोज दूध पीत असें, पण तें तापवलेलें असे. मी गरमगरम दूध पीत असें—पण तो तोंड भाजणारा गरमपणा! हें दूध गरम नव्हतें, उबदार होतें. त्याचा गरमपणा सजीव होता. मला वाटलें, गणूनें म्हटलें तें कांहीं खोटें नव्हे. असलें दूध गवळ्याकरवीं मला कधींच मिळालें नसतें.

मी दूध पीतपीत विचारलें, "सुके बोंबिल मला पहायला मिळतील का?"

गणूची बायको गणूपेक्षांही थक्क झाली. चांगलें सोन्यासारखें दूध पीत असतां मधेंच कुठें असल्या या पदार्थाची हिला आठवण झाली, असें तिला वाटलें असावें.

गणू हंसत हंसत ह्मणाला, "दाखवतों आणून."

ती वेड्यासारखी त्याच्या तोंडाकडे पहातच राहिली, असें पाहून तो पुढें ह्मणाला, "त्यांत काय झालं? पाहूंदेत त्यांनां. तेवढाच माहिती होईल. परव्हां असले जिन्नस त्यांना कुठं पहायला मिळणार? कांहीं संकोच मानायला नको. नागू तेल्याच्या घाण्यावर जाऊन त्यांनीं खोबऱ्याची पेंड खाल्ली, तें परवां तुला मी सांगितलं ना? ताईसाहेबांचा स्वभाव मोठा चौकस आहे. वयावर जाऊं नकोस. तूं बोलतांना ऐकलं नाहींस त्यांना. वकीलमुन्सफांबरोबर गोष्टी करूं लागल्या म्हणजे ते सुद्धां अगदीं जिरून जातात. दाखीव ते आणून—पण दुरून दाखीव, जवळ आणूं नकोस. घाण येईल आणि शिसारी बसेल."

बायको आंत निघून जातांच गणू मला म्हणाला, "तो फार चमत्कारिक जिन्नस आहे. तुम्हांला अजून माहित नाहीं पण असल्या निरनिराळ्या वाळवलेल्या माशांवर आम्हीं गुजारा करीत असतों. माजीच्या मानानें ते फारच स्वस्त पडतात आणि एकदां आणून ठेवलें कीं बेगमी होते. माजी जशी रोज आणावी लागते तसे ताजे मासेही रोज आणावे लागतात. पण त्यांना किंमत फार पडते. रोज ताजे मासे आणून आमच्यासारख्यांचं निभायचं नाहीं. ताजे मासे

देखील आह्मी आणतों. नाहीं असें नाहीं. पण ते केव्हां तरी आठवड्यांतून एखाददोनदां." तो बोलत असतांना ती हातांत एक लांब जुडगें घेऊन येऊन दूर उभी राहिली, त्याच्यावरील कागद उलगडला आणि ह्मणाली, "हेच ते सुके बोंबिल." कागद उलगडतांच मला वस्कन घाण आली. मला प्रश्न उभा राहिला, कीं गणूनें 'वास' ह्मटला तो हाच का? गरिबाच्या घरीं घाणीला वास ह्मणतात का?

माझ्याकडे वळून गणू ह्मणाला "पाहिलंत-झालं? आतां जा ग ते आंत घेऊन. कोण घाण मारते आहे."

मला आश्चर्य वाटलें—इतक्यांत वासाची घाण झाली का? कीं मी तिथें असल्यामुळें त्याला तसें वाटलें? तो जिन्नस फार चमत्कारिक होता. अशा लांब लांब वाळलेल्या काड्या दिसत होत्या. घाण आली असें गणूनें ह्मटलें तें कांहीं खोटें नाहीं. आणखी घटकाभर तो जिन्नस तिथेंच ठेवला असता तर मला ओकारी सुद्धां आली असती. दूध मी आधींच पिऊन टाकलें होतें म्हणून बरें झालें.

तो जिन्नस आंत ठेवून गणूची बायको धुतलेले हात ओच्याला पुशीत घरांतून बाहेर आली. तिच्याशीं कांहीं तरी बोलावें असें मला वाटलें, म्हणून मी गणूला विचारलें, "कोणत्या नांवानं हिला हांक मारायची?"

अगदीं नव्या नवरीसारखा लाजून गणू म्हणाला, "तें मी कसं सांगूं? बायकोचं नांव नवऱ्यानं घ्यायचं नाहीं ना?" तिच्याकडे वळून तो म्हणाला, "आतां तूंच सांग ना आपलं नांव!"

तिनें आपलें नांव सुभद्रा म्हणून सांगितलें. "सुभद्राबाई" अशा संबोधनानें सुरुवात करून मी बोलायला जात होतें, इतक्यांत ती म्हणाली, "मला 'बाई' म्हणायचं नाहीं. नुसतं सुभद्रा म्हणायचं. 'बाई' म्हणायचं भटाबामणांच्या बायकाना."

हा भेदाभेद मला माहित नव्हता. ब्राम्हणांच्याच बायकांना 'बाई' कां म्हणायचें आणि कुणब्यांच्या बायकांना नुसत्याच नांवानें कां हांक मारायची या रीतीचा मला उलगडा होईना. हा भेदाभेद कां उत्पन्न झाला, कसा झाला, केव्हां झाला, ह्याची नोट ध्याननी करायचें मी मनाशीं ठरविलें.

बायका तवढया इथून तिथून सर्व सारख्याच. मग हा भेद श्रीमंतीमुळें आला कीं जातीमुळें आला हा प्रश्न साहजिकच माझ्यापुढें उभा राहिला. पुरुषांनां ' राव ' ' पन्त ' असें कांहीं तरी उपपद लावितात. मराठा कुणबी असला तरी ' बा '–' जी, ' असेंही उपपद लावतात. मग बायकांनाच तसें दर्जा-प्रमाणें उपपद कां असूं नये ?

स्वतःचा हट्ट चालविण्याच्या उद्देशानें मीं म्हटलें, " सुभद्राबाई, मी तुम्हाला सुभद्राबाईच म्हणणार. सुभद्राकाकू सुद्धां म्हटलं असतं. पण तुम्ही कांहीं एखाद्या ' काकू ' सारख्या दिसत नाहीं. बाईसाहेब नाहीं–पण नुसतं बाई म्हणायला काय हरकत आहे ?"

" आह्मां गरिबांना कशाला ही आडनांवं ? आपलं सुभद्राच झटलेलं बरं. खरं पाहिलं तर तुमच्या सारख्या माणसांनीं नुसतं ' सुभे '–च झटलं पाहिजे—"

" पुरे झालं तुझं व्याख्यान ! " गणू ह्मणाला, " आतां घरी गेलं पाहिजे. बाईसाहेब वाट पहातील. मागल्या वेळेला एकदा मी बोलून घेतलं आहे. त्यावेळीं ताईसाहेब गेल्या होत्या नागू तेल्याच्या घाण्यावर, आतां खुद्द आमच्या घरीं आल्या आहेत. उत्तर द्यायला मला तोंड नाहीं. त्या दिवशीं मीच चहाडी केली–त्याचं बक्षिसही मिळालं—पण आज माझं मलाच सांगितलं पाहिजे. ! " असें म्हणून गणू निघण्याच्या तयारीनें उठून उभा राहिला. मीही उठलें आणि सुभद्रेचा निरोप घेतला.

ती रस्त्यापर्यंत मला पोहोंचवायला आली, त्यावेळीं शेजारच्या तीनचार कुणबी बाया रस्त्याच्या बाजूला मुद्दाम उभ्या राहिलेल्या दिसल्या. त्यांच्या-कडे सुभद्रा मोठ्या अभिमानानें पहात होती. तिचें हें वैभव पाहून त्याही अगदीं चूरमार होऊन गेल्यासारख्या दिसत होत्या.

जातां जातां माझ्या कानी सुभद्रेचे शब्द पडले, " ताईसाहेब बरं या ! रावसाहेबांची मुलगी–स्वतः आमच्या घरीं आली. कधीं कुणी ऐकलं होतं हें ! पण आज प्रत्यक्ष घडून आलं. ताईसाहेबांचा स्वभावच फार मायाळू–"

नागू तेल्याच्या घाण्यावर गेल्या दिवशीं गणूच्या थोबाडींत दिल्याची आठवण होऊन माझें मलाच हसूं आलें.

घरीं येऊन पोहोचताच आई दाराशीं उभी होती तिला गणू म्हणाला, " माफ करा बाईसाहेब, ताईसाहेब आज आमच्या घरीं गेल्या होत्या. ताज्या निरशा दूधाखेरीज मी दुसरं कांही दिलं नाहीं! त्यांना माफ करा बाईसाहेब."

" खरंच ? " असें म्हणून आई नुसती हंसली मात्र.

मी न्हाणीवर हातपाय धुऊन आलें, त्यावेळीं आई म्हणाली, " एकूण आज तूं गणूच्या घरीं गेली होतीस. छान ! असं नाक ठेचलंस त्याचं ? काय पाहिलंस तिथं ? "

अगदीं मोठया माणसाचा आव आणून मी म्हटलें, " गरिबाच्या घरीं काय पहायचं दुसरं ? आमच्या सारखीं थोडींच त्याचीं घरं आहेत ? आपलं आहे कारवीच्या खुंटांचं घर–परसदारीं गोठयांत म्हैस आहे. परसवांत बरोंबरशीं कोंबडी आहेत–घरांत सुके बोंबिल आहेत–"

आई मोठयानें हंसत म्हणाली, "ते देखील दाखवले का त्यानं तुला ?"

" त्यानं नाहीं दाखविले " मी म्हटलें, " मीच मुद्दाम पहायला मागितले. परवां शाळेंतली एक मुलगी त्याबद्दल कांहीं बोलत होती. असली ही वस्तु तरी काय आहे तो पहावी म्हणून मुद्दाम गणूला सांगितलें. आमच्या घरीं कांहीं पहायला मिळायचे नाहींत–म्हटलं गणूच्या घरीं असतील–आणि शेवटीं तिथंच पहायला मिळाले–" आठवण झाल्यासारखें करून मी मधेंच आईला विचारलें, " आई, पाटाची बायको म्हणजे का ग ? "

" गणूची बायको पाटाची आहे वाटतं ? " आई म्हणाली, "मला नव्हतं हें माहीत. बाकी तें कळणार तरी कसं म्हणा–'

मी जिज्ञासापूर्वक प्रश्न केला, " पाटाची बायको समजायची कांहीं खूण नसते वाटतं ?—पण आधीं पाटाची बायको म्हणजे काय हें मला सांग ना ?"

" कळेल पुढें तुला आपोआप " असें बोलून आईनें उत्तर द्यायची टाळाटाळ केली. पण मी थोडीच ऐकणार होते ? मी म्हटलें, " हें पहा आई, अशीं टाळाटाळ करून चालायचं नाहीं. पाटाची बायको म्हणजे काय तें मला कळलंच पाहिजे. "

आई क्षणभर स्वस्थ राहिली. उत्तर द्यावें कीं न द्यावें—किंवा मलतेंच कांहीं तरी उत्तर देऊन माझें समाधान करावें, याचा ती विचार करीत

असावी, अशी शंका आल्यामुळें मी म्हटलें, " कांहीं उडवाउडवी चालायची नाहीं बरं आई. मला नीट काय तें कळलं पाहिजे. उडवाउडवीची उत्तरं बाबा देतात म्हणून ऐकून घेतें--तूं उडवाउडवी केलेली मला नाहीं खपायची ! "

" असं ? " असें म्हणून क्षणभर माझ्याकडे कौतुकानें पहात आई म्हणाली, " तिकडनं उडवाउडवीचीं उत्तरें दिलेलीं तुला खपतात आणि मी मात्र तसं करतां नये !—कां ? "

तिच्या कंबरेला मिठी मारून मी म्हटलें, " कां म्हणजे ? तूं आई आहेस ना ! "

आईच्या डोळ्याला टचूकन् पाणी आलें. " खरं आहे-खरं आहे—" असें म्हणत तिनें पदरानें हळुंच डोळे पुसले. " पुरुषांचं हें मेलं असंच असतं. केव्हां कांहींही विचारा. मोकळ्या मनानं उत्तर कधीं मिळायचं नाहीं. तुलाच का ? मला देखील तशींच उत्तरें मिळतात. फारच झालं तर ' पुरुषाच्या व्यवहारांत बायकांना कशाला उठाठेव ? ' असा शेवटचा टोला मिळतो. तें तसं उत्तर आलं म्हणजे मला वाईट वाटतं आणि आतां मी स्वतः तुला तसंच उत्तर देणार होतें. नाहीं बरं बाई, ह्यापुढं मी कधीं उडवाउडवी करणार नाहीं. " असें बोलून तिनें पुन्हां एकवार पदरानें डोळे पुसले.

" काय म्हणालीस बरं ? " आई आठवल्यासारखें करून म्हणाली. 'तुला पाटाची बायको' म्हणजे काय हें सांगायला हवं ना ! ऐक. आपल्या ब्राह्मण लोकांत बायकांच्या जातीचं एकदांच लग्न होतं. कुणबीमराठ्यांत तसं नाहीं. त्यांच्यांत एक नवरा वारला तरी बायका दुसरा नवरा करतात. त्या बायकोला पाटाची बायको म्हणतात. पहिलं लग्न होतं तें सर्वांचं सारखंच होतं. म्हणजे कुणबी असो, मराठा असो किंवा ब्राह्मण असो सर्वांचीं लग्नं ब्राम्हण उपाध्यांच्या हस्तेंच लागतात. ब्राह्मणांचीं लग्नें वैदिक विधीनं होतात —म्हणजे त्यांच्या लग्नाच्या वेळचे मंत्र वेदांतले असतात. कुणबीमराठ्यांचीं लग्नं पौराणिक विधीनं होतात. ह्मणजे लग्नाच्या वेदमंत्राऐवजीं कुठले तरी पुराणांतले श्लोक म्हणून कुणबीमराठ्यांची लग्नं उपाध्ये लोक लावतात.

वेदांच्या मंत्रांनीं झालेलं लग्न मोडत नाहीं. कुणबीमराठ्यांना एक नवरा मेल्यावर दुसरा करायचा असतो म्हणून त्यांचीं लग्नं पौराणिक विधीनं लावतात. नुसते पुराणांतले श्लोक म्हणून त्यांचं लग्न लावलेलं असतं म्हणून त्यांना पुन्हां लग्न करतां येतं, असं उपाध्ये लोकांचं म्हणणं आहे. वेदांच्या मंत्रांनीं त्यांचं लग्न लावलं तर त्यांना पुन्हां लग्न करतां येणार नाहीं."

आणखी एक नवा प्रश्न उत्पन्न झाला. 'पाटाची बायको' म्हणजे काय हें मला कळलें. पण वेदांतले मंत्र म्हणून लावलेलें लग्न मोडत नाहीं कसें हें मला उलगडेना. मी आईला विचारलें, "पुन्हा विचारतें म्हणून रागावूं नकोस आई. पण मला आणखी एक नवीन प्रश्न उत्पन्न झाला आहे. परवां आपल्या गोडबोले कारकूनांची बायको वारली. त्यांचं लग्न वेदांच्या मंत्रांनींच झालं होतं ना ?"

आईची मुद्रा अगदीं चमत्कारिक झाली. माझ्या प्रश्नांमुळें ती घोटाळ्यांत पडल्यासारखी दिसली. तिनें नुसतें मानेनेंच होय म्हटलें. मी विचारलें, "होय ना ? मग त्यांनीं आतां दुसरी बायको कशी केली ? वेदांच्या मंत्रांनीं लावलेलं लग्न जर मोडत नाहीं, तर गोडबोल्यांचं पुन्हां लग्न कसं झालं ?"

"खरं आहे" आई म्हणाली, "तूं म्हटलंस म्हणून हें माझ्या ध्यानांत आलं. वैदिक लग्नानं बायकांनां तेवढं बांधून घ्यावं लागतं. पुरुष खुशाल लग्नावर लग्नं करतात. मी विचारून तुला सांगेन."

मला मोठा आनंद झाला. मी आईला निरुत्तर केलें, याचा मला अभिमान वाटला. माझ्या बुद्धीमत्तेबद्दल मी माझ्यावर खूष झालें. 'मी कुणितरी आहें' याची मला पुन्हां आठवण झाली.

जेवायला वाढीत असतांना आईचा बाबांबरोबर संवाद झाला. तो असाः—

"रागवायचं नाहीं बरं. पण मला एक प्रश्न विचारायचा आहे. वैदिक लग्न मोडत नाहीं म्हणतात. पौराणिक विधीनं लग्न होतं म्हणून—सप्तपदी आणि लाजाहोम झाला नसतो म्हणून—कुणब्याच्या बायकोला पाट लावतां येतो. असंच ना ? सप्तपदी आणि लाजाहोम झाला आणि त्या बायकोचा नवरा गेला तर तिनं पुन्हां लग्न करायचं नाहीं—आमरण विधवेचं व्रत घेऊन राहायचं—तें सप्तपदीच्या बंधनासाठीं—असंच ना ? मग पुरुषाचं दुसरं लग्न कसं होतं ? पुरुषांनां नाहीं का सप्तपदीची आडकाठी ?"

पाण्याचा घोंट घेत घेत बाबा ह्मणाले, " बरोबर आहे. रूढी तशीच आहे, कायदाही तसाच आहे. या रूढीच्या आधारावर कायदा बनवलेला आहे. उच्चवर्गाच्या लोकांसाठीं जो कायदा आहे तो खालच्या वर्गाच्या लोकांनां लागू पडत नाहीं. एक नवरा मेल्यावर खालच्या वर्गाच्या बाईला दुसरं लग्न करतां येतं–इतकंच नव्हे तर एक नवरा जिवंत असतांना नुसती कायदेशीर नोटीस देऊनही कुणब्याच्या बायकोला दुसरं लग्न करतां येतं आणि तें बेकायदेशीर ठरत नाहीं. धर्माचा प्रश्न वेदाला धरून न सोडवतां रूढीच्या अनुरोधानं सोडवला आहे. कायद्याच्या दृष्टीनं रूढीला महत्त्व आहे. धर्माच्या बाबतींत कायदा आधीं पहावा लागतो. भलत्याच प्रकारानं झालेलं लग्न कायदेशीर ठरत नाहीं. कायद्यानं जें लग्न खरं तेंच खरं लग्न. ह्मणून ब्राम्हणाचं लग्न वैदिक विधीनं आणि कुणबीमाळ्यांची लग्नं पाटाच्या किंवा गांधर्वाच्या विधीनं झालीं असलीं म्हणजे कायदेशीर समजलीं जातात. "

" पण पुरुषांचं काय ? " आई म्हणाली, " पुरुषांचा प्रश्न तसाच राहिला. सप्तपदीचं बंधन जर बायकानां आहे तर तें पुरुषांना का नसावं ? पुरुषानं जन्मभर विधुर म्हणून कां राहूं नये ?"

" रूढी अशी आहे आणि कायदाही तसाच आहे. " असें म्हणून बाबा आंचवण्यासाठीं पाटावरून उठले. आई माझ्याकडे पाहून नुसती हंसली. बाबांनां पुन्हां प्रश्न विचारण्याचें तिला धैर्य झालें नाहीं

मी बिछान्यावर पडलें होतें. इतक्यांत आई तिथें आली आणि मोठ्या प्रेमानें माझा मुका घेऊन ह्मणाली, " गोदे, पोरी, आज तं मला नवी दृष्टी दिलीस. "

माझें हृदय अभिमानानें भरून आलें. पुन्हां आठवण झाली, कीं ' मी कुणितरी आहें ! '

---

## प्रकरण ६ वें.

# पेपरमिंटच्या वड्या

पुढल्या महिन्याला पुन्हां माझा नंबर पहिला आला पण मैत्रीचें क्षेत्र वाढण्यास त्यामुळें अडथळा आला नाहीं. नागू तेल्याच्या घाण्यावर मधून मधून माझ्या खेपा होतच असत. त्याचप्रमाणें गणू पटवाल्यालाही मी कांहीं विसरलें नव्हतें. सारदळांच्या यमूच्या घरीं किंवा दुकानीं जावें, असें माझ्या मनांत आलें होतें. पण बोलावल्याशिवाय कसें जाणार ? तिच्या एकंदर माष-णावरून मी तिच्या घरीं यावें अशी तिची इच्छा फार दिसत होती. पण कुठें नडत होतें तें कांहीं कळेना.

या घोटाळ्यावर ठकूनें प्रकाश पाडला. यमूच्या बापाच्या दुकानीं जाण्याचा एके दिवशीं तिला प्रसंग आला होता. त्यावेळीं यमूही दुकानीं होती. ठकूला पहातांच मला बोलावण्याचा विषय निघाला, त्यावेळीं जो संवाद झाला त्या वरून ठकूनें असें धोरण बांधलें, कीं यमूचा बापच या कामीं विरुद्ध होता. यमू जवळ जवळ रडकुंडीला सुद्धां आली पण तो कांहीं कबूली देईना.

ही हकिकत ऐकल्यावर मलाही थोडेसें आश्चर्य वाटलें. मोठमोठे माळ्ये व्यापारी मी पेढीवर गेलें असतां माझा किती मानमरातब ठेवतात—नव्हे आलेले गडगंज गिऱ्हाईकही आमच्या स्वागतासाठीं घालवितात—असें असतां एका साधारण किराणा मालाच्या दुकानदारानें हा मान मिळविण्याचें कां टाळावें !

माझ्या खोडकर मनानें उचल घेतली. नाहीं का बोलाविना—आपण होऊनच जायला काय हरकत आहे ? न बोलावतां गेल्यामुळें कदाचित अपमान झालाच तर त्याची मला पर्वा वाटली नसती. मानासाठीं मी कांहीं हपापलें नव्हतें. माझ्या आत्यंतिक जिज्ञासेच्या तृप्तीपुढें मानापमानाची मला पर्वा नव्हती. शाळा सुटल्यावर एके दिवशीं माझ्या लहरीनें अधिकच उचल खाल्ली आणि मी यमूला म्हटलें, "चल, आपण आज तुझ्या दुकानीं जाऊं."

यमूला जितक्या लवकर आनंद झाला, तितक्याच लवकर तिचा चेहरा पडला. ठकूच्या तोंडून सर्व कांहीं कळलें असल्यामुळें–अर्थात् हा प्रसंग अनपेक्षित नसल्यामुळें, मला त्याचें कांहींच वाटलें नाहीं.

यमू म्हणाली, " तूं आलीस तर फार छान होईल—" थोडेंसें घुटमळल्यासारखें करून म्हणाली, " पण बाबा काय म्हणतील कोण जाणे ! कदाचित त्यांना आवडणार नाहीं. त्यांचा स्वभाव–आतां तुझ्याकडे कशाला .लपवून ठेवूं ?–त्यांचा स्वभाव जरा तिरसट आहे. तुला दुकानीं घेऊन येतें असं मी त्यांना सांगितलं, त्यावेळीं त्यांनीं मला चरूख बजावलं, कीं अशी थोरामोठ्यांचीं मुलं घरीं आणूं नकोस म्हणून. म्हणूनच माझ्या मनांत असतांही मी इतके दिवस तुला बोलावलं नाहीं. "

मी कुचेष्टेनें म्हटलं, " समज, मी आतां आलें तुझ्याबरोबर, तर ते काय करतील ? हाताला धरून मला दुकानाबाहेर ओढून काढतील का ? "

साशंक होऊन यमू म्हणाली, " कुणी सांगावं, कदाचित् तसंही करतील ! "

मी हंसत हंसत म्हटलें, " ठीक आहे. मग पाहूयाच एकदां परिक्षा. "

" नको ग बाई, " घाबरून यमू म्हणाली, " उगीच माझ्यामुळें तुझी फजिती नको. दुकानावर गिन्हाईकं आलेलीं असायचीं आणि त्यांच्यासमोर मलतंच कांहीं तरी व्हायचं. "

" कांहीं हरकत नाहीं. " मी म्हटलें, " झाली फजिती तर माझी होईल. मी स्वच्छ तुझ्या तात्यांना सांगेन, कीं मी आपणहूनच आलें. यमूनं कांहीं मला बोलावलं नाहीं. पाहू या तर एकदां काय गंमत होते ती. तूं असं कर, मी कोण आहें हें त्यांना मुळीं सांगूंच नकोस. ठकूलाही आपण बरोबर घेऊं. गोडबोल्यांची बनीही येईल. गणबाला बाजूला उभं रहायला सांगूं. मी यापूर्वीं कधीं तुमच्या बाजूला गेलेंच नाहीं, त्यामुळं त्यांनीं कदाचित् मला पाहिलंही नसेल. ओळखलंच, तर व्हायचं तसं होईल. आणि नच ओळखलं तर कांहीं नवीनच गंमत होईल. "

माझ्या या बेताचें यमूला मारीच कौतुक वाटलें. ठकूनेंही साथ दिली. आणि गणू पटेवाला म्हणाला, " त्याची काळजी नको ताईसाहेब. मी समोरच्या घरीं बसून तुमच्यावर नजर ठेवतों. त्याची काय बिशाद आहे त्यांचा

अपमान करायची ! बाकी तो माणूस आहे जरा विचित्रच—पण मी असलों म्हणजे भ्यायचं कांहीं कारण नाहीं. "

" इथं कोण मीतं आहे ? " मी तुच्छतेनें म्हटलें, " मला मानाची हांव नाहीं कीं अपमानाची परवाही नाहीं. जाणूनबुजून जायचं आहे—मग झाला अपमान तर झाला. मात्र बनीनं तोंड उघडतां कामा नये. तिचा स्वभाव आहे जरा उतावळा. पटकन् कांहींतरी बोलून जायची. "

" नाहीं हं, " बनीं म्हणाली. " पहा तर खरी माझी परीक्षा, एरव्हीं मी कितो जरी बडबडलें तरी एकदां ठरलं म्हणजे प्राण गेला तरी तोंडांतून शब्द काढणार नाहीं. "

' आतां तें प्रत्यक्षच पाहूं. ' असें म्हणून आम्हीं गांवांत वळलों.

यमूच्या बापाचें दुकान पेठेंत नव्हतें. तें गांवांतलें एक लहानसें दुकान होतें. राहाण्याचें घर आणि दुकान हीं निराळीं नव्हती. ओटीचा उपयोग दुकानासारखा केला होता आणि घरचीं माणसें आंत घरांतच रहात असत. यमूचें घर आणि दुकान निराळें नाहीं, हें तिच्या घरीं गेल्यानन्तरच मला कळलें.

दुकानांत जाण्यापूर्वी तिथें गेल्यावर काय बोलायचें तें जातां जातां मी यमूला पढवून ठेवलें. एकएक पाऊल मागें रहात गणू पिछेहाट घेत होता. पण तसें करण्यापूर्वी आपण कोणत्या घरांत बसून राहणार आहे, तें त्यानें दुरूनच दाखवलें.

आम्हीं चौघींही दुकानांत शिरलों. त्यावेळीं तिथं गिऱ्हाईकांची साधारण गर्दीच होती. दुकानांत नोकर नसल्यामुळें जिनसांच्या पुड्या बांधून देणें किंवा माप घालण्याचें काम यमूच्या बापालाच करावें लागत होतें. त्या गडबडींत पहिल्यानें त्याचें लक्ष आमच्याकडे गेलें नाहीं. यमूनें हांक मारली त्यावेळीं त्यानें आमच्याकडे वळून पाहिलें आणि त्या आश्चर्याच्या धक्क्यानें बांधित असलेली हातांतील जिनसांची पुडी नकळत त्याच्या हातून गळून पडली.

तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, " यमे, आज सगळीच शाळा गोळा करून आणली आहेस वाटतं घरीं ? दुसरा कांहीं उद्योगच नाहीं या पोरींना ! कशाला आल्या आहेत इथं ?"

यमू पहिल्यानें थोडीशी बावरली. पण मनाचा तोल सांवरून जरा धीटाईनें म्हणाली, ' ही आमची गोदू आली आहे पेपरमिंट विकत घ्यायला ! '

' असं का ? ' तात्याशेटचा स्वर जरा खालीं आला, ' काय पाहिजे आहे तिला ? '

मी शांतपणें पुढें होऊन म्हटलें, ' चार पैशाचं पेपरमिंट—अगदीं जीभ मिरमिरतं तसलं पाहिजे. परवां मी पेठेंत घेतलं, पण मेली नुस्ती साखरेची वडी. तसलं पेपरमिंट घेण्यापेक्षां नुसती पिठीसाखर खाल्लेली काय वाईट ? "

" खरं आहे तें, " तात्याशेट म्हणाला, " पेठेंतील दुकानदार सारे चोर आहेत. पेठेंत येणारा सहज दुकानीं येतो त्यामुळें मिळेल तसा माल डोळे झांकून घेऊन जातो. त्याचा ते चोर फायदा घेतात. पैशाचा माल चार पैशांत गिऱ्हाईकाच्या गळ्यांत बांधतात. तेवढयाचसाठीं मी इकडे गांवांत दुकान काढलं आहे. म्हटलं, ती पेठ कांहीं आपल्याला नको. चार पैसे कमी फायदा झाला तरी आपलं हें गांवांतलं दुकान बरं. आधीं हें दुकानचं निराळं भाडं भरायला नको. घरांतल्या घरांत दुकान असल्यामुळें तेवढीच भाड्याची बचत होते. त्याचा फायदा गिऱ्हाईकांनां मिळतो. पेठेपेक्षां म्हणूनच मला माझा माल पैपैशानें कमी भावांत देतां येतो. तेवढयासाठींच जवळचीं पेठेंतली दुकानं टाकून खेडींतलीं गिऱ्हाइकं इतक्या दूर इथं येतात ना ! माझी कांहीं उपटसुंभ गिऱ्हाईकी नव्हे. माझी गिऱ्हाईकी अगदीं बांधलेली आहे बरं का मुली ! तूं दर ताडून पहा म्हणजे तुझी खात्री होईल. " असें म्हणून त्यानें पेपरमिंटचा डबा आणून माझ्यापुढें ठेवला.

हें जें भाषण चाललें होतें त्यावेळीं तात्याशेट एकामागून एक डबे धुंडाळीत होता. त्यामुळें त्याचें लक्ष आमच्याकडे गेलें नव्हतें. डबा पुढें आणून ठेवतांच त्यानें माझ्याकडे चांगलें निरखून पाहिलें. माझ्या अंगावर भरगच्च दागिने होते. त्या दागिन्यावरून त्याची नजर सारखी फिरत होती. ' भलं गिऱ्हाईक मिळालं आहे ! ' असें त्याच्या मनांत आलें असावें. मी सङ्कृद्दर्शनीं अगदीं भीत भीत विचारलें, " एक वडी चाखून पाहूं का ? "

शेटजी मोठ्यानें हंसले आणि म्हणाले, " हो हो ! पहा तर ! एका वडीनं कांहीं माझं दरिद्र जात नाहीं ! "

मी एक वडी घेऊन तोंडांत टाकली. यमू त्याचा हात धरून म्हणाली, " त्या दोघींनाही द्या ना एकएक वडी ! "

तिच्या हाताला हिसडा देऊन तात्याशेट ओरडला, "एक एक वडी म्हणे ! इथं कांहीं पेपरमिटाचं अन्नछत्र घातलं आहे ! गिऱ्हाईकाला माल दाखवला पाहिजे म्हणून तिला एक वडी दिली—तर आली मोठी कर्णाची मावशी ! म्हणे त्यांनाहीं एक एक वडी द्या ! जशी कांहीं बाजोरावीणच ! "

यापूर्वींच मी एक वडी तोंडांत टाकली होती. मी डब्यांतील दुसऱ्या दोन वड्या काढून एक ठकीला आणि एक बनीला दिली.

तात्याशेट जरा चमकला. पण नवें गिऱ्हाईक गांठण्याच्या आशेनें जरा थंडावून म्हणाला, " बरं. बरं. त्यांनाही दे. त्यांनाही पाहूं दे अनुभव. या बनीचा बाप तो नारू गोडबोला. कधीं चुकूनसुद्धां माझ्या दुकानीं यायचा नाहीं. इथं चार पावलांवर त्याचं घर, पण तंगड्या तोडीत पेठेंत जातो. त्याला नाहीं—तर त्याच्या पोरीला तरी कळूं दे. मला महागरा म्हणतो. पण चांगला माल जर दुकानीं ठेवायचा, तर मातीच्या मोलानं कसा देतां येईल ? पण या बामणांना कळत नाहीं. मोठे शहाणे समजतात आपल्याला आणि शेवटीं पेठेंत जातात आणि दमडीचा माल दुगाणीला घेऊन येतात. तिलाही पाहूं दे—" माझ्याकडे पाहून आढ्यतेनें हंसून तो मोठ्या तोऱ्यानें म्हणाला, " कसं काय आहे पेपरमिट ? "

" चार आण्याच्या वड्या द्या. " मी एकदम म्हटलें.

तेवढ्या उत्तरातच सर्व कांहीं येत होतें. दोन वड्या फुकट गेल्याचें शेटजीला कांहींच वाटलें नाहीं. यमू मात्र अगदीं हिरमुसली झाली. दुकानदारीच्या पायीं दोन वड्या सहज देऊन टाकणें ज्याला कांहींच वाटलें नाहीं, त्याच आपल्या बापानें आपल्या पोटच्या गोळ्याच्या दोन मैत्रिणीसाठीं दोन वड्या देण्याचे नाकारलें, हें तिला फार विलक्षण वाटलें. तिच्या वर्मी डाग बसला. बापाबद्दल आधींच असलेला अनादर या क्षुल्लक गोष्टीमुळें विकोपास गेला. लालबुंद चेहरा करून ती सारखे सुस्कारे सोडीत होती. शेटजींची नजर तिच्या चेहऱ्याकडे गेली आणि एवढा मोठा सौदा केल्याच्या आनंदाच्या भरांत त्यांनीं एक वडी काढून तिच्या हातीं दिली.

दिलेली वडी रागानें दूर भिरकावून यमी म्हणाली, " मी सांगितलं तेव्हा माझ्या मैत्रिणीला दिली नाहींत. आतां ही चार आण्यांतल्या अन्नछत्रांतील वडी नको आहे मला. "

शेटजी नुसते हंसत हंसत वड्यांची पुडी बांधत होते. पुडी माझ्या हातीं देउन त्यांनी पैशासाठीं हात पुढें केला. मी खिसे चापसून पहाण्याचें नुसतें ढोंग केलें—अर्थातच माझ्या खिशांत एक पैसाही नव्हता—आणि चांचरत चांचरत म्हटलें, "पैसे आणायला विसरलें हें माझ्या ध्यानांतच नाहीं कसं ? परत देऊं कां पेपरमिट ? किंवा बाबांना घरीं जाऊन सांगतें, ते पैसे पाठवून देतील."

शेटजी अग्निशर्मा होऊन उठला, "पैसे नव्हते तर कशाला यावं दुकानांत ? फुकट पेपरमिंट खायची चांगली युक्ती काढली ! थोरामोठ्यांची दिसलीस म्हणून फसलों आणि आधीं पुडी बांधून दिली. कशी मला बुद्धी झाली ! आधीं पैसे घेतल्याशिवाय मुलांना कधींच कोणता जिन्नस देत नसतों. तरी बरं झालं—" शेटजी पुढें कांहीं बोलणार होते तोंच पुडी घेऊन मी दुकानाखालीं उतरलें. बनी आणि ठकीही माझ्या मागोमाग उतरल्या.

"पैसे दिल्याशिवाय कुठं चाललीस पुडी घेऊन ?" असें म्हणत शेटजीही आमच्या मागोमाग आले आणि त्यांनीं माझ्या दंडाला हात घातला.

समोरच्या घरांत बसून गणू पटेवाला सारा प्रकार पहात होता. शेटजींनीं माझा दंड धरतांच तो तीरासारखा धांवत आला आणि म्हणाला, "कुणाचा हात धरतोस तात्याशेट ? कांहीं डोळे बिळे आहेत कीं नाहीं तुला ? ती रावसाहेबांची मुलगी आहे, तें दिसत नाहीं का तुला ?"

'रावसाहेबांची मुलगी' हे शब्द ऐकतांच शेटजी तिथल्या तिथेंच थिजले. ते मोठ्यानें ओरडून म्हणाले, "रावसाहेबांची मुलगी ! यमे, कार्टे, मला आधीं सांगू नये ? कुठं गेली होती तुझी वाचा ? आतां कळलं रावसाहेबांना तर बिड्या ठोकतील माझ्या हातांत—"

"बिड्या ठोकतील म्हणजे सोडतील कीं काय ? भर रस्त्यांत रावसाहेबांच्या मुलीचा दंड धरलास—मी आलों नसतों तर कदाचित थोबाडींत देखील लगावली असतीस ! चार आण्याचे पैसे म्हणजे तुला काय वाटलं ? मी शिपाई सुद्धां असे फेंकून देईन—" असें म्हणून त्यानें खिशांतून चार आण्याचा खुर्दा काढून तिथेंच रस्त्यावर फेंकून दिला.

सांडलेलें पैसे निवडून उचलित शेटजी म्हणाले, "माफ करा गणबा, मला माहीत नव्हतं. या माझ्या कार्टीनं देखील सांगितलं नाहीं. नाहीं तर रावसा॰

हेबांच्या मुलीला रस्त्यांत अडवून धरण्याइतका गाढवपणा मी केला नसता. कांहीं सांगूं नका बरं का रावसाहेबांनां. " असें ह्मणत तो दुकानांत चढला. डब्यांत हात घालून मूठभर वड्या काढून गणूच्या हातीं देत ह्मणाला, " हें पहा गणबा, घ्या वड्या तुमच्या मुलांसाठीं न्या. रावसाहेबांना मात्र कांहीं सांगूं नका. हे तुमचे चार आण्याचे पैसेही घ्या. तुमच्या कडोसरीचे पैसे रावसाहेबांसाठीं कां ? मी रावसाहेबांच्या घरीं जाऊन स्वतः पैसे घेऊन येईन. "

गणूनें पैसे घेऊन मुकाट्यानें खिशांत टाकले, वड्याही खिशांत टाकल्या आणि मिस्किलपणे माझ्याकडे पाहिलें. त्याच्या त्या पहाण्यामुळें आलेलें हसें मी दाबून धरलें, तरी ठकी आणि बनी मात्र मोठमोठयानें हंसल्या. गिळून टाकलेल्या रागाची छाया शेटजींच्या चेहेऱ्यावर झळकत होती.

रागाचा आंवडा गिळून शेटजी ह्मणाले, " माफ करा ताईसाहेब. जरा गरिबाच्या दुकानांत पायधूळ झाडा ना ! " यमूकडे वळून ते ह्मणाले, " जा ग यमे, घरातून वाटीभर दूध आणून ताईसाहेबांना दे. "

" एकट्या ताईसाहेबानांच ? " यमू कुचेष्टेनें म्हणाली, " आणि या दोघींना नको का ? " फजित पावलेल्या बापाच्या रागांत आणखी भर टाकण्यासाठीं यमू थोडं थांबून पुन्हां म्हणाली, " आणि मलाही नको का ? असा पंक्तिप्रपंच केला तर ताईसाहेबांनां काय वाटेल ! आणि गणबाला काय वाटेल ! "

रागानें थरारलेला चेहरा दुकानावरील गिऱ्हाईकांना दिसूं नये म्हणून आपल्या छपरी मिशावरून हात फिरवीत शेटजी म्हणाले, "साऱ्यांना दे–गणूला सुद्धां दे–काय व्हायचं कार्टी आहे ! आहे का एवढं दुध घरांत ? इथं म्हैशी नाहींत कांहीं दाराशीं झुलत ! सांगितलेलं ऐकावं. आपली अक्कल चालवूं नये. उगीच वाचाळपणा करून माझी बदनामी करते आहे कार्टी ! " गणबाला उद्देशून ते म्हणाले, " आतां तुह्मीच पहा गणबा, आह्मी गरीब माणसं. कुठं आहे एवढं दूध आमच्या घरांत ? पण ही कार्टी अब्रू घेणारी आहे. जिथं तिथं माझा पाणउतारा करण्यांत तिला गंमत वाटते. बाकीच्यांना मुंबईसारखा चहा प्यायला इथं थोडाच कुणाला चहा करतां येतो आहे ? कुणालाच कांहीं देऊं नको ह्मणावं. "

शेटजींनीं क्षणभर विचार केला, ते आपल्याशींच हंसले आणि शेजारच्या फळीवरून एक डबा काढून त्यांतील दहा बारा बदामाचे गर माझ्या हातांत ठेवीत ह्मणाले, " दुधापेक्षां हे बदामच बरे. फार पौष्टिक असतात. दूध काय, तोंडाला लावलं कीं घटकन् जातं. बदामाचा गर एकएक खातां येतो— चांगले घटकाभर खायला होतील हे बदामगर. फार महागांतले आहेत. पेठेंत नाहीं मिळायचे असले गर. कान्हेरे वकिलांना फार आवडतात ह्मणून त्यांचे- साठीं मुद्दाम आणवतों. बापट वकील देखील केव्हां केव्हां घेऊन जातात. शेलक्या गिऱ्हाईकांवाचून कोण घेणार असला माल ह्या चिपळूणांत ? नाहीं ह्मणायला कडवेकराच्या तालमींतलीं पोरं मात्र नेहमीं घेऊन जातात. तो खिडीतला विचूही केव्हां केव्हां घेऊन जातो. आहे नुसता काडी पहेलवान पण लेकाला बदाम खायला पाहिजेत. नाटकांत स्त्रीपार्ट करतो कीं नाहीं ! " बदा- मांच्या गिऱ्हाईकांची यादी सारखी वाढत जात होती. बदामाला गिऱ्हाईक नाहीं असें आपण ह्मटल्याचें बोलतां बोलतां त्याच्या ध्यानींही राहिलें नाहीं.

बापाचें चऱ्हाट अधिकच वाढत आहे असें पाहून यमू ह्मणाली, "एकट्या ताईसाहेबांनाच का द्यायचे बदामगर ? आणि त्यांच्याबरोबर आलेल्या मैत्रि- णींना काय हात हालवीत परत पाठवायचं ? "

" हो हो तें विसरलोंच, " असें ह्मणत त्यांनीं दुसरा एक डबा उघडला आणि त्यांतील थोडथोडे भुईमुगाचे दाणे ठकीच्या आणि बनीच्या हातीं दिले. त्या दोघीही दाणे खिशांत टाकतांना माझ्याकडे पाहून सूचकतेनें हंसूं लागल्या.

शेटजींचा राग त्या हंसण्यानें वाढला होता खरा, पण त्याला तोंड फुटायची ती संधि नव्हती.

दांभिकपणानें हंसत हंसत शेटजी म्हणाले, " आज मोठा भाग्याचा दिवस. माझ्या मुलीच्या धर्मानं तुमच्यासारख्यांचे पाय आमच्या दुकानाला लागले. नाहींतर कशाला येणार तुम्ही इकडे ? नोकर, चाकर, शिपाईपायकांना काय तुमच्या घरीं तोटा आहे ? पण तुम्ही स्वतः आलांत. रावसाहेबाचा कोठीवाला पेठेंतून जिनसा आणतो तें मला माहीत आहे. लेकाचा दुकानदाराकडून अडत खातो आणि रावसाहेब आणि दुकानदार या दोघांनाही फसवतो. आमचे डोळे उघडे आहेत म्हणून आम्हाला दिसतं. अशी दमडी दुमाणी करणं

करतां सहज रुपया होतो. रुपयाचे शेंकडे आणि शेंकड्याचे हातोहात हजार होतात. पण रावसाहेबांना त्याचा पत्ताही नसेल. आपण कशाला उगीच बोला ? त्यांचे ते समर्थ आहेत आपला व्यवहार पहायला. तुम्ही बोलूं नका बरं ताईसाहेब ! उगीच माझ्या अंगावर किचाट यायचं ! आणि तुम्ही हो गणबा, तुम्हीही यांतलं कांहीं रावसाहेबांकडे बोलूं नका. पुराव्यावर यायचं कदाचित. आणि असल्या गोष्टीचे पुरावे कसे करतां येणार ! पण हे कारकून कोठीवाले म्हणजे मोठे बिलंदर. जिन्नस आणायला कवडी दिली तर उगाळून तिचं गंध लावतील आणि एका पैशांतली निदान एक पै तरी खाल्ल्याशिवाय राहाणार नाहींत. रावसाहेब म्हणजे काय—बोलून सांगताच यायचं नाहीं—ते एक देवमाणूस आहेत—पण बाजूला सारे दैत्य बसले आहेत. रावसाहेबांच्या पाठी-मागें ही कारकूनपेशाची माणसं त्यांच्या नांवावर वाटेल तसे पैसे खातात. पण रावसाहेबांना त्याची दाद कशी लागावी ? मला काय करायचं आहे म्हणा त्याच्याशीं ? ते खाणारे आहेत, तसे ते निस्तरणारे आहेत. आमचा कांहीं कधीं रावसाहेबांशीं संबंध येत नाहीं. आम्ही काय—आपले वाणीउदमी लोक ! आपला धंदा मला कीं आपण मले. परक्यांच्या उठाठेवी केलेल्या मला केव्हांही खपत नाहींत. कुणी कांहीं करीत असला तरी आपण तिकडे पहायचं नाहीं, असा आपला माझा बाणा आहे—"

शेटजींचें हें चऱ्हाट चालत असतां आम्ही चारही मुली आपसांत बोलत होतों. शेटजींच्या भाषणाकडे जरी माझा सारखा कान होता तरी यमू, बनी आणि ठकीच्या खलबतांत मी 'हो–ना करून' उत्तरें देतच होतें. केलेला बेत अगदीं बेमालूम उतरला म्हणून यमूलाही आनंद झाला होता खरा, पण ती पुढल्या कर्माला भीत होती. आम्हीं निघून जातांच आपल्याला मार बसणार, याची तिला जवळ जवळ खात्रीच होती.

तें ऐकून मला थोडेंसें वाईट वाटलें. माझ्या खट्याळपणामुळें यमूला मार मिळाला तर मला त्याचा पश्चात्ताप झाला असता.

पण आतां त्याला उपाय नव्हता. गोष्ट होऊन गेली होती. आतां ती पुसून काढणें शक्य नव्हतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट एवढी, कीं मार बस-णार याचें यमूला कांहींच वाटत नव्हतें. ती म्हणाली, 'दिवसांतून चारदोन चपला या मला मिळतातच—आणखी चार जास्त मिळतील ! दहा तिथें पंध-

वीस, पण एवढं खरं कीं बाबांची भली खोड मोडली. गोदूताईला आमच्या दुकानीं केव्हांसुद्धां बोलवायचं नाहीं, असं ज्या तोंडानं ते रोज मला म्हणत होते, त्याच तोंडानं त्यांनीं आतां तिची क्षमा मागितली! आतां पुन्हां यायला कांहीं हरकत नाहीं बरं गोदूताई!'

मी गेल्याशिवाय शेटजींचें चऱ्हाट थांबणार नाहीं असें वाटून मी म्हटलें, "मी आतां येतें. बाबा इतक्यांत कचेरीतून घरीं आले असतील. मी त्यांना सांगून तुमचे पैसे पाठवून देतें. माझ्यासाठीं तुम्हांला उगीच तसदी पडली मात्र." असें म्हणून आम्हीं दुकानाखालीं उतरलों आणि वाटेला लागलों.

बनी मोठ्या आनंदानें म्हणाली, "भली खोड मोडली गुलामाची. आमच्या बाबांना सदा नांवं ठेवित असतो. आतांच पाहिलंस ? कारण नसतांना कारकूनांना शिव्या देत होता—त्या आमच्या बाबांनाच उद्देशून बरं का? पण बाबा थोडेच त्याला भीक घालणार आहेत! त्याच्या दुकानचा माल आम्ही घेत नाहीं म्हणून त्याचा बाबांवर राग आहे. मेला मुलखाचा महाग आहे. पैशाच्या जिनसेला चार पैसे घेतो. म्हणूनच बाबा त्याच्या दुकानीं जात नाहींत. भली खोड मोडली गुलामाची. आतां बाबांना जाऊन सांगतें सारी हकिकत. तें पहा आमचं घर आलं—"

असें म्हणून ती थांबली आणि मोठ्या अदबीनें मला म्हणाली, "येतेस घरीं गोदूताई ? तूं आलीस तर आमच्या ताईला मोठा आनंद वाटेल. बाबा अजून कचेरीतून आले नसतील. उभ्या उभ्या येऊन जाईनास!"

मी उत्तर दिलें, 'आजच नको—पुन्हां येईन एकाद्या दिवशीं. आई घरीं वाट पहात असेल. उशीर होईल म्हणून मी आधीं तिला सांगितलं नव्हतं—आयत्या वेळीं बेत झाला कीं नाहीं हा ?—पुन्हां येईन केव्हांतरी—अगदीं नक्की येईन."

माझा निरोप घेऊन बनी आपल्या घरीं गेली. ठकीचा रस्ता बराच पुढें होता म्हणून ती माझ्याबरोबर येत होती. ती कांहीं तरी बोलणार होती, तोंच गणू म्हणाला, "मोठा मिजासखोर आहे लेकाचा. गोडबोल्यांच्या बनीनं सांगितलं तें कांहीं खोटें नाहीं. म्हणूनच याचा धंदा चांगला चालत नाहीं. गांवांत दुकान आहे—ज्यांची घरं जवळ आहेत आणि ज्यांना बाजार पेठेत जायला वेळ नसतो, ते नाइलाजानें त्याच्या दुकानीं जातात. तेवढ्याचाच त्याला अभिमान वाटतो—"

ती बोलत असतानांच ठकीचा रस्ता आला. ती आपल्या रस्त्याला वळण्यापूर्वी मला म्हणाली, "पाहिलंस ? आम्ही गरीब माणसंच बरीं. असा पंक्तिप्रपंच तरी करीत नाहीं. हे भुईमुगाचे दाणे काय करायचे आहेत मला ! आमच्या घाण्यावर शेंगदाण्याच्या राशी पडलेल्या असतात पण उचलून एक तोंडांत टाकावा असें कधीं वाटतसुद्धां नाहीं. इतकी शिसारी आली आहे या शेंगदाण्याची. तें ठाऊक का नाहीं ? पण पंक्तीप्रपंच करायला हवा होता ना ? म्हणून मुद्दाम हे दिले त्यानं. फेंकूनच देणार होतें, पण म्हटलं, आम्हां गरीबांना एवढी मिजास कशाला हवी ! ज्या शेंगदाण्याच्या पायीं आमच्या घरीं अन्न येतं त्यांचा अपमान कसा करावा ? आतां उशीर झाला. मी जातें. उद्यां बोलूं सावकाश !" असें म्हणून ती चालती झाली.

मी घरीं येऊन विचार करूं लागलें. चिपळूणांत आल्यानन्तर, मुन्सफांच्या घरीं एकदोन वेळ हळदीकुंकवाला गेलें होतें, तें सोडून तीन माणसांच्या घराला माझा पाय लागला. त्या तीन माणसांची मी तुलना करून पाहिली. त्या तिघांच्या ऐपतींत आणि पायरींत जसा भिन्नपणा होता, तसाच त्यांच्या वागणूकींतही होता.

नागू तेल्याचें प्रेम निस्सीम होतें, गणू पटेवाल्याच्या प्रेमाच्या मुळाशीं स्वार्थाची थोडीशी आंच होती. मी गेलें त्यावेळीं त्यानें माझा जो आदर सत्कार केला तो जरी मोठा प्रेमाचा होता, तरी त्याच्यांत थोड्या अधिकपणाचा वास येत होता. मला खूष करण्यासाठीं तो बुद्धीपुरस्सर प्रयत्न करतो आहे, असें स्पष्ट दिसत होतें. नागू तेल्याच्या आदरसत्कारांतला सोज्वळपणा अगदीं सात्विक होता. त्यांत दांभिकपणाचा लवलेशही नव्हता.

पण तात्याशेटची गोष्ट अगदींच वेगळी. त्याला काय म्हणावें हेंच मला समजेना ! आणखी कांहीं माणसांचा अनुभव घेईपर्यंत त्याच्या या वागणूकीची पायरी ठरविण्याचें मी तहकूब ठेवलें.

दुसऱ्या दिवशीं यमू शाळेंत आली नाहीं. ती आजारी असल्याची चिठ्ठी आली होती. माझ्या हृदयाला चिमटा बसला. माझ्या खट्याळपणामुळें बिचारीला उगीच चोप बसला असेल !

---

## प्रकरण ७ वें

# पाटाचा नवरा



तो रविवारचा दिवस होता. अंगणांत घातलेल्या मंडपांत बाबा आराम-खुर्ची टाकून बसले होते. बाजूला दोन साध्या खुर्च्या होत्या. पण त्यावर कुणीच बसलें नव्हतें. ऑफिसांतील आलेली तीन चार कारकून मंडळी खालीं सतरंजीवर बसली होती.

गोष्टी आफिसच्याच चालल्या होत्या. पायरी जवळच्या लहानशा स्टूलावर बसून मी त्या ऐकत होतें. नित्याच्या संवईप्रमाणें मी भाषणांत मधेंच तोंड घालण्याला उतावीळ होत असें, पण आत्मसंयमन करण्याचा माझा प्रयत्न चालला होता.

माझ्या उर्मटपणाला थोडा थोडा आळा बसल्याचें परक्यांना सुद्धां दिसून येत होतें. एकादा घरोब्याचा कारकून " ताईसाहेब हल्लीं फारच थंडावल्या " असा उद्गार माझ्या आईजवळ काढीत असे. चालत असलेल्या भाषणांत मी मुळींच तोंड घालीत नव्हतें असें पाहून बाबा मधून मधून माझ्याकडे नजर फेंकीत होते. मी अगदीं चूपचाप बसलें होतें.

बोलत असताना एका कारकूनाला उद्देशून बाबांनीं जेव्हां गोडबोले या नावांनीं संबोधिलें, त्यावेळीं चटकन मला आठवण झाली. 'तुम्ही बनीचे बाबा का ?' असा प्रश्न विचारावा असें माझ्या मनांतही आलें. पण मीं पुन्हां मन आवरून धरलें.

बोलतांना चिपळूण तालुक्यांतील खेड्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. त्यांत कोळथरें आणि इभ्रामपूर या गांवाची नांवें येतांच मला मोरूभाऊंच्या भाषणाची आठवण झाली. माझा चोकसपणा अनावर झाला. मी गोडबोल्यांना उद्देशून विचारलें " हें इभ्रामपूर म्हणजे आमचंच गांव ना ? "

गोडबोले चमकून माझ्याकडे वळले आणि म्हणाले, "आपलंच तर काय ! कोळथर इभ्रामपूर म्हणजे गोखल्यांचाच गांव. आतां रावसाहेबांचा तिथं कांहीं लागाबांधा आहे कीं नाहीं हें आज कुणाला सांगता यायचं नाहीं. पण कांहीं तरी संबंध निघाल्यावांचून रहाणार नाहीं असं मला तरी वाटतं."

बाबा मला उदेशून म्हणाले “ तापांतलं इभ्रामपूर अजून तुझ्या डोक्यांत घोळतं आहे वाटतं ! मला वाटलं होतं कीं विसरली असशील म्हणून. इतका वेळ झाला तर बरी गप बसली होतीस पण इभ्रामपूरानं तुला वाचा फोडली ! ”

“ जन्मभूमीचं हें असंच आहे, ” गोडबोले म्हणाले. “ कितीं झालं तरी जें आपलं गांव तें आपलंच गांव. वाडवडिलांच्या पासून रक्तांत जी माती खेळत असते, ती केव्हां ना केव्हां तरी आपल्या वस्तूकडे ओढ घेतल्यावांचून रहाणार नाहीं. आम्ही ऐकत होतों, कीं आपलं घर सातारला म्हणून. मला वाटत होतं, कीं सातारा असो कीं पुणें असो, गोखले तेवढे कोळथर इभ्राम-पूरचे. पण आम्ही जर असं म्हणू लागलों तर नसत्या उठाठेवी केल्याचा आरोप यायचा. ताईसाहेबांनीं कुठून माहिती काढली वाटतं ?—”

“ नाहीं. ” बाबा गंभीरपणें उद्गारले. “ तिनं नाहीं कांहीं ती माहिती काढली—परवां मोरूभाऊ वैद्य तिला औषध द्यायला आले होते त्यावेळीं बोलले. तेव्हांच मला कळलं. म्हटलं, पुढल्या खेपेला फिरती वर जाऊं त्यावेळीं आपलं गांव एकदां पाहून घेऊं. तुम्ही आठवण ठेवा. मी विसरलों तर मला ही सूचना द्या—”

तो विषय बदलला. ऑफिसच्या दुसऱ्या गोष्टींची सुरवात झाली.

इभ्रामपूरला गेल्यावरही विसरायचें तें काय ? बाबांनीं आठवण द्यायला सांगितलें याचेंच मला आश्चर्य वाटलें. आपली ग्रामभूमी—ज्या जागीं आपले वाडवडील नांदलें वाढले असतील—ती आपली भूमी, प्रत्यक्ष तेथें गेल्यावरही कशी विसरली जाईल ? नित्याच्या संवईनें बाबा तसें बोलून गेले असावे, इतर सरकारी कामाची आठवण देण्याबद्दल जशी ते सूचना द्यायची तशीच हीही दिली असेल, असें मी माझ्या मनाचें समाधान करून घेतलें. आपल्या मातृभूमीबद्दल आठवण करून द्यावी लागते, ही भावना एकंदरींत मला कांहीं पटली नाहीं. बाबांचा अधिकारीपणा या उद्गारांनीं दिसून आला, एवढेंच.

बाबा निरनिराळ्या कारकूनांशीं निरनिराळ्या विषयांवर बोलत होते. पण इभ्रामपूरच्या उल्लेखामुळें माझें लक्ष गोडबोल्यांवरच खिळून राहिलें होतें,

त्यामुळें मला गोडबोले एकटेच नजरे समोर दिसूं लागले. धाग्यानें धागा जुळत चालला. इब्राामपूरचा उल्लेख पुसट होऊं लागला आणि बनीची आठवण मला झाली. आत्मसंयमन फुकट गेलें. इतर विषय चालले होते त्याचें भान राहिलें नाहीं आणि माझ्या तोंडून चटकन प्रश्न निघून गेला, " तुमच्या मुलीचं नांव बनी का हो ?"

भाषणांत विक्षेप आला. होकार किंवा नकार न देतां गोडबोले माझ्याकडे पाहूं लागले. कुणाच्याच नांवाचा उल्लेख न करतां मी प्रश्न केला होता त्यामुळें प्रत्येकालाच तो आपल्याला तर केला नाहीं असें वाटलें.

" मला विचारलंत का ? " गोडबोल्यांनीं विचारलें. मी मानेनें नुसतें होय म्हटलें. त्यावेळीं ते पुढें म्हणाले, " हो, माझ्या मुलीचं नांव बनीच. तो तुमच्याच वर्गांत असते—"

माझे विचार कुठें तरीः भटकत होते. कांहीं दिवसापूर्वी माझ्या प्रश्नामुळें आईचें आणि बाबांचे भाषण माझ्या स्मृतिसमोरून जाऊं लागलें. तितक्याच भ्रमिष्टपणानें मी प्रश्न केला, " तुमचं लग्न वैदिक मंत्रांनींच झालं होतं का हो?"

बाबा मोठ्यानें ओरडले, " ताईसाहेब ! "

मी शुद्धीवर आलें पण माझी तिखट चौकस बुद्धी मला आत्मसंयमन करूं देईना. मूळ प्रकृति वर उसळून येऊं लागली. बाबांच्या दटावणीला न जुमानतां मी तो प्रश्न पुन्हां विचारला. तारवटल्यासारखें डोळे करून गोडबोले माझ्याकडे पहात होते. त्यांनीं अगदीं चमत्कारिक आवाजानें मला विचारलें, " वैदिक मंत्रानं ? ब्राम्हणांची लग्नं केव्हांही वैदिक विधिनंच व्हायचीं. त्यांत विचारायचं तें काय ? एखाद्या शूद्राला विचारलं असतंत तर तें शोभलं असतं. ब्राम्हणांची लग्नं केव्हांही वैदिक विधिनंच होतात. पण ताईसाहेब, हा प्रश्न यावेळीं तुम्हांला कां आठवला ? "

माझें तोंड फुटेल आणि त्या दिवसाची चर्चा मी सांगूं लागेन या भीतीनें बाबांनीं तो विषय तोडून काढण्याचा प्रयत्न करण्यासाठीं म्हटलें, " तिचं काय ऐकतां गोडबोले ? भलत्याच वेळीं भलतेच प्रश्न विचारायची तिला मोठी वाईट खोड आहे. "

उभ्या आयुष्यांत बाबांनीं पहिल्यानेच माझी ही अशी निंदा केली. गाव-वाल्यांनाही आश्चर्य वाटलें असावें असें दिसलें. ते माझ्याकडे नुसते टकमक पाहूं लागले.

मी माझ्या स्वाभाविक हट्टखोरपणानें पुन्हां विचारलें, "तुम्ही पाटाचे नवरे आहांत का हो ?"

गोडबोले थक्क झाले. बाबांच्या चेहऱ्यावर हंसण्याची छटा येऊन गेली. बाकीचे कारकून तोंडाला उपरणें लावून बाजूला तोंड करून हंसूं लागले.

"तुमचा प्रश्न मी समजलों नाहीं." गोडबोले मला उद्देशून म्हणाले.

"भलतेच प्रश्न काय करतां ताईसाहेब ?" बाबा मला उद्देशून थोडयाशा दरडावणीच्या स्वरानें म्हणाले.

मी थोडीच ऐकणार होतें ! आत्मसंयमनाची वृत्ति पार मावळून गेली होती. चौकस कुटाळपणा माझ्या मेंदूत सळसळूं लागला होता. मला वाटलें आतां विषयाला तोंड लागलें. आतां जास्त खोल गेलें नाहीं तर अशी संधि पुन्हां येणार नाहीं असं वाटून मी म्हटलें, "यांत भलता प्रश्न कसला ? गण-बाची बायको पाटाची आहे असं म्हणतात. तिचा पहिला नवरा मेल्यावर तिनं नंतर गणबाशी लग्न केलं. गोडबोल्यांचीही पहिली बायको वारली आहे आणि आतां त्यांनीं नव्या बायकोशी लग्न केलं आहे, तेव्हां ते आपल्या बाय-कोचे ' पाटाचे नवरे ' नाहीं का ठरत ? '

बाबा थोडेसे गोंधळल्यासारखे दिसले. "मुलांचे प्रश्न केव्हां केव्हां विल-क्षण असतात." बाबा उद्गारले. "सकृद्दर्शनीं जो शब्द आपल्याला केव्हां सुचतसुद्धां नाहीं, तोच प्रश्न मुलं एवढया चमत्कारिक रीतीनें विचार-तात, कीं उत्तर देणें मुष्कील होऊन बसतं."

"खरं आहे, खरं आहे." गोडबोले तोंडभर हंसत हंसत म्हणाले, "ताई-साहेबांचा प्रश्न दिसतांना जरी विलक्षण दिसला तरी मोठा मार्मिक आहे. पण त्याचं उत्तर देणं मात्र मोठं कठीण आहे."

"कठीण म्हटला तर कठीण आहे, नाहीं म्हटला तर त्यांत विशेषसं तथ्य नाहीं." बाबा गंभीरपणें उद्गारले, "शब्दांची योजना रूढीच्या अनुरोधानं होत असते. कुणब्याच्या पुनर्विवाहाला पाट कां म्हणतात हेंच मला आधीं

समजत नाहीं. त्यांच्या पुनर्लग्नालाही पुनर्विवाह कां म्हणूं नये, हा मोठा प्रश्न आहे—"

" त्यांचीं लग्नें पौराणिक विधीनं होतात ना ? " गोडबोले सरसावून निश्चयात्मक उद्गारले, " ब्राह्मणांच्या पुनर्लग्नांत आणि शूद्रांच्या पुनर्लग्नांत भेद हा दिसलाच पाहिजे. पौराणिक आणि वेदोक्तविधीनं झालेल्या लग्नांत उघड उघड असलेला भेद स्पष्टच दिसून आला पाहिजे—" बाबा कांहीं बोलत नाहींत असें पाहून गोडबोले माझ्याकडे वळून म्हणाले, " पण माझं पुन्हां लग्न झालं आहे तें तुम्हांला सांगितलं कुणी ? "

" कुणी कां असेना ? आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या, " मी थोड्या कुचेष्टेनें म्हटलें.

गोडबोल्यांना उत्तर सुचलें नसावें असें वाटलें.

मीं गोडबोल्यांना नखशिखान्त पहात होतें. गोडबोले जरा वयातीत गृहस्थ होते. त्यांचें वय पंचावन्नावर होऊन गेलें होतें. नोकरीची मुदत संपूनही आणखी एक वर्ष त्यांना मुदतवाढ मिळाली होती.

आणि याचवेळीं त्यांनीं लग्न केलें होतें. त्यांची मुलगी बनी जवळजवळ माझ्याच वयाची असेल. पण त्यांची बायको किती वयाची होती तें मला माहीत नव्हतें. मुलींची लग्नें त्या काळांत फार फार तर बारा तेरा वर्षांपलिकडे रहात नसत. त्या अंदाजानें पहातां त्यांची बायको जास्तींत जास्त तेरा वर्षांची असली पाहिजे होती. बनीनें बोलावलें त्यावेळीं मी गेलें नाहीं ही चूक झाली असें मला वाटलें. माझा प्रश्न थोडासा अडून राहिला.

गोडबोले कांहीं उत्तर देत नाहीत असें पाहून मी विचारलें, " तुमच्या बायकोचें वय काय आहे ? "

बाबा मोठ्यानें ओरडले, " ताईसाहेब ! "

हंसण्याचा खोटा आव आणून आलेला ओशाळेपणा झांकित गोडबोले म्हणाले, " विचारूंदेत—विचारूंदेत. मुलांच्या ठायीं चौकसपणा हा पाहिजेच. त्यातून आपल्या ताईसाहेबांची बुद्धी फार तिखट आहे. प्रश्न करण्याची हातोटी मोठी मार्मिक आहे. माझ्या या वयापावेतों मी शेंकडों मुलं पाहिलीं असतील पण अशी बुद्धी कुठं पाहिली नाहीं. कांहीं कांहीं मुलं लहानपणापासूनच मोठीं

अद्वितीय असतात. त्यांतल्याच एक ताईसाहेब आहेत—" माझ्याकडे वळून ते पुढें म्हणाले, " काय विचारलंत ताईसाहेब ? वय काय म्हणून ? माझ्या या बायकोचें वय बारा वर्षांचं आहे. एवढया मोठया मुली हल्लींच्या काळांत क्वचितच सांपडतात—" शेवटचं वाक्य साधारणपणें बाबाना उद्देशून होतें. कांहींच न बोलतां बाबा स्तब्धपणें ऐकत होते.

" मग ती तुमची पाटाची बायको आहे का ? " मी संथपणें विचारलें.

गोडबोले मोठमोठयानें हंसू लागले. तें इतकें खोटें होतें कीं त्यामुळें त्यांचा चेहरा रडल्याइतका विद्रूप दिसत होता. बाकीचे कारकून मात्र प्रामाणिकपणें हंसत होते.

" काय वाटलं ताईसाहेब तुम्हाला ? " तें खोटें हंसें आवरीत गोडबोले म्हणाले, " मी गणू पटेवाला आहे असं वाटलं ? त्या दिवशीं तुम्ही त्याच्या घरीं गेलां होतां तें मला माहीत आहे !—पण असं पहा ताईसाहेब, तो शूद्र आहे. मीं ब्राम्हण आहें. ब्राम्हणाची बायको केव्हांही पाटाची बायको नव्हते. चांगली बारा वर्षे वाढलेली मुलगी शोधून काढली, ही एवढयासाठींच."

या उत्तरानें त्यांचें त्यांनाच समाधान वाटलें नसावें असें दिसलें.

बाबा म्हणाले, " ताईसाहेब आतां आंत जाऊन आपला अभ्यास करा पाहूं—" मी उठत नाहीं असें पाहून बहूवचनार्थी वाक्यप्रयोग सोडून ते म्हणाले, " एकूण तूं गणूच्या घरीं गेली होतीस ? "

" म्हणजे जाऊं नये कीं काय ?

" जाऊं नये असें कांहीं माझं म्हणणं नाहीं. पण तें मला कळलं नाहीं हें बरं झालं नाहीं. आतां आला तो संबन्ध माझ्या ध्यानांत. तुझ्याच प्रश्नामुळें ही चर्चा निघाली वाटतं ? "

' हो ' म्हणून मी स्वस्थ राहिलें. बाबांना वाटलें कीं विषय संपला. ते दुसऱ्या एका कारकूनाला उद्देशून दुसरा कांहींतरी विषय काढून बोलण्यास सुरवात करीत होते, तों मी मधेंच उद्गारलें, " अहो गोडबोले, माझा प्रश्न तेवढाच राहिला. तुमची बायको पाटाची नसेल पण तुम्ही पाटाचे नवरे असतांच कीं नाहीं ? "

" छेः ! छेः ! असं कसं म्हणतां येईल ? " गोडबोले म्हणाले.

" तर काय म्हणतां येईल आणि कसं म्हणता येईल, तें सांगा ना मला स्पष्ट करून. एक नवरा मरून जी बायको दुसरा नवरा करते तिला जर पाटाची बायको म्हणायचं, तर एक बायको मरून दुसरी बायको करतो त्याला 'पाटाचा नवरा' कां म्हणू नये ! "

" पण तसं म्हणत नाहींत ना " गोडबोले गोंधळून म्हणाले.

" तर काय म्हणतात ? " मी हट्टाहट्टानें विचारलें.

" अशा नवऱ्याला आपल्या मार्षेत स्वतंत्र शब्द नाहीं ! " गोडबोले म्हणाले.

बाबा वसकन् ओरडून म्हणाले, " आतां मुकाट्यानें जा पाहूं घरांत ! "

मी उठून उभी राहिलें आणि म्हणालें, " एकूण काय, कीं माझ्या प्रश्नाचं उत्तर इथं कुणालाच देतां येत नाहीं. "

मी झटकन् आंत निघून गेलें. बाबांसकट सर्वांना मी चांगलाच टोला हाणला, असें मला वाटलं. या गोष्टीचा मला बराच अभिमान वाटला.

पण पुन्हां असा विचार आला, कीं यांत विशेष तें काय झालें ? प्रचारांत तसें स्वतंत्र विशेषण नसलेंच तर !

तसें कांहीं विशेषण नसतें तर कुणी ना कुणी सरळ तसें कां सांगू नये ! मला वाटलें, इथें कांहीं तरी व्यंग आहे. कांहींतरी उणेपणा आहे. बाबांसकट सर्वांना तो उणेपणा पटतो आहे पण उघड उघड एका लहानशा मुलीदेखत तो उणेपणा कबूल करायला सारेच मीत आहेत. असें कां !

या प्रसंगामुळें माझी जिज्ञासा वाढली. बनीला पूर्वी कबूल केलेंच होतें. केव्हां तरी तिच्या घरीं जायचें तर याच वेळीं कां जाऊं नये ?

तडक आंत जाऊन मी परकर चोळी बदलली आणि गणूला हांक मारली.

मी बाहेर जाण्याच्या तयारीनें त्याला हांक मारलेली पहातांच गणू थोडासा आश्चर्यचकीत झाला आणि म्हणाला, " या मलत्याच वेळीं कुणीकडे जायचं आहे ताईसाहेब ! "

' बनीच्या घरीं ' असें मीं सांगतांच त्यानें विचारलें, " बाईसाहेबांची परवानगी घेतली का ! "

' तुम्हीच सांगून या आईला ' असें म्हणून मी बाजूच्या दारानें घराबाहेर निघालें. कंपाऊंडाबाहेर निघून मी क्षणभर गणूची वाट पाहिली. तो आला. त्याचें तोंड गोरेंमोरें झालें होतें. मी थोडा वेळ त्याच्याकडे पहात उभी राहिलें असें पाहून तो म्हणाला, " बाईसाहेब म्हणतात कीं यावेळीं बाहेर जायचं नाहीं. "

मी थोड्याशा रागानेंच सांगितलें, " बाईसाहेबांना सांगा कीं ताईसाहेब जायला निघाल्या आहेत—त्या आतां जाणारच—मागं फिरणार नाहींत. फार वेळ रहाणार नाहींत म्हणावं ! " असें म्हणून मी रस्ता चालूं लागलें.

बरीच पुढें गेल्यावर गणू धांवत धांवत मागाहून येत असतांना दिसला मी जरी धांवत नव्हतें तरी माझीं पावलं जोराजोरानें पडत होतीं.

गणूनें मला येऊन गांठतांच मी त्याला विचारलें, " काय म्हणाली आई ?"

" एवढं सांगितल्यावर पुढें काय म्हणणार ? " गणूनें उत्तर दिलें.

माझा हट्ट पचत चाललेला पाहून मला समाधान वाटलें. आम्ही बनीच्या घरीं आलों. मी दाराशीं आलेली पहातांच बनी आश्चर्यचकित झाली आणि ओरडली, " ताई, ताई, आधीं बाहेर ये. रावसाहेबांच्या ताईसाहेब आल्या आहेत. "

आंतून एखाद्या लहान मुलीच्या आवाजासारखा आवाज आला, "खरंच का ? आलें हो ! "

मला प्रश्न पडला हें उत्तर कुणी दिलें ? तिच्या आईनें कीं बहिणीनें ? तो आवाज बारा वर्षांच्या मुलीला शोभण्याजोगा होता. आणि गोडबोल्यांनीं आपल्या बायकोचें वय तेवढेंच सांगितलें होतें.

पण इथें मात्र माझ्या चाणाक्षपणाला धक्का बसला. बाहेर आलेली बाई बरीच वयातींत होती. ती विधवा होती. प्रचलित भाषेत सांगावयाचें म्हणजे ती सोंवळी झालेली होती. तिच्या चेहऱ्याकडे पहातांच मला समाधान वाटलें. तिची मुद्रा जितकी गंभीर होती तितकाच तिचा चेहरा प्रेमळपणानें ओथंबलेला होता. तिच्या डोळ्यांत आईची नजर होती.

माझ्याकडे पहातांच ती इतक्या प्रेमळपणानें हंसली, कीं त्यामुळें माझ्या अंगावर रोमांच आले. धांवत जाऊन तिच्या गळ्याला मिठी मारावी असें मला वाटण्याइतकी हृदयांतील स्फूर्ति भरून आली.

" या का तुझ्या ताईसाहेब ? " त्याच बालआवाजांत शब्द आले.

आतां संशयच राहिला नाहीं. गोडबोल्यांच्या बायकोचा तो आवाज नव्हता. मीही हंसत हंसतच ह्मटलें, " ताईसाहेब नव्हे बरं, माझं नांव गोदू. "

" असं कधीं कुणी ह्मटलं आहे ? रावसाहेबांच्या मुलीला ताईसाहेबच ह्मणायचं. पायरीप्रमाणेंच सर्व कांहीं झालं पाहिजे."

अतिशय प्रेमळपणानें उच्चारलेल्या या भाषणाचाही मला राग आला. " कां ह्मणून मला ताईसाहेब ह्मणायचं ? " मी कुर्ग्यानें ह्मटलें. " अगदीं कंटाळलें आहें या ताईसाहेबीला ! तुह्मी ह्मणतां का हिला बनीसाहेब ह्मणून ? बनी ह्मणते का तुह्मांला ताईसाहेब ह्मणून ? कशाला उगीच हीं ढोंगं ? माझं नांव गोदू ! पुन्हां सांगतें माझं नांव गोदू. "

बनीची ताई हंसत सुटली आणि ह्मणाली, " एकूण बनी ह्मणते तें कांहीं खोटं नव्हे. "

" काय म्हणते बनी ? काय केल्या माझ्या चहाड्या तिनें तुमच्यापाशीं ?"

" चहाड्या ? वाः ! " ती तशीच हंसत म्हणाली, "चहाड्या नव्हेत हो. तुमची तारीफ करतां करतां तिचं तोंड अगदीं फाटत असतं. " असें ह्मणून तिनें पुन्हा एकवार माझ्याकडे डोळे भरून पाहिलें.

" काय केली माझी तारीफ तिनं ? " मी विचारलें.

" असं उभं राहूनच किती वेळ बोलायचं ? या ना आंत. "

आह्मीं सर्व माजघरांतून सैंपाकघरच्या बाहेरच्या खोलींत गेलों. बनीनें मला बसायला पाट दिला आणि ती स्वतः उभीच राहिली. बनीची ताईही उभीच होती.

आंत येतांच माझी निराशा झाली. गोडबोल्यांची बारा वर्षांची बायको मी आंत येतांच मला दिसेल, अशी माझी अपेक्षा होती.

मी विचारलें " बनीची आई कुठं आहे ? "

एक मोठा सुस्कारा टाकून ती ह्मणाली " कुठं आहे ? आमचं नशिबच खोटं. ती असती तर आज मी कशाला आलें असतें या असल्या तोंडानं समोर—"

" ती नव्हे " मी म्हटलें, " तुमची हल्लींची आइ. "

तिची मुद्रा पालटली. ती आपल्याशींच पुटपुटली " हल्लींची आई ! "

मानावर आल्यासारखें करून ती म्हणाली, " आमची माई होय ? विहीरीवर गेली आहे. आतांच येइल पाणी घेऊन. बाबा यायच्या पूर्वी पूजेची तयारी करून ठेवली पाहिजे ना ! "

मला समाधान वाटलें. एकूण बनोची आई–म्हाताऱ्या गोडबोल्यांची हल्लींची बायको–मला पहायला मिळणार ! आईला न जुमानतां आल्याचें सार्थक होणार !

किती क्षुल्लक गोष्ट, पण मला निष्कारण तिचें महत्त्व वाटत होतें. बनी कोण, तिची सावत्र आई कोण, त्यांचा माझा संबंध काय आणि तिला पहाण्यासाठीं मला एवढी उत्कंठा कां वाटावी ? माझ्या या विक्षिप्त चौकसपणाबद्दल माझें मलाच आश्चर्य वाटलें.

माझी जिज्ञासा तृप्त करण्याकरतां बनीची आई एकदाची आली. ती बनीपेक्षा चार वर्षांनीं मोठी होती तरीही दोघींच्यांत मोठेपणाच्या नात्यानें फारच थोडें अन्तर दिसत होतें. तिच्या देहाच्या मानानें बरीचशी अवघड वाटणारी पाण्यानें भरलेली कळशी तिच्या कंबरेवर होती आणि तितकीच अवजड वाटणारी हिरवी साडी तिच्या अंगावर होती. पायांतल्या शिंदेशाही सांखळ्या जितक्या अवजड होत्या तितक्याच कानांतल्या सांखळीवाल्या बुगड्याही बोजड दिसत होत्या. नाकांतली नथ जरी फारशी मोठी नव्हती तरीही तिच्या त्या कोंवळ्या वयाला हा सगळा अवजड बोजा कंबरेवरील पाण्यानें भरलेल्या कळशी इतकाच डोईजड झालेला दिसत होता.

समोर येताच तिनें कंबरेवरील कळशी खाली उतरली—उतरली म्हणण्यापेक्षां खालीं टाकली म्हणणेंच जास्त शोमेल—आणि तसें करतांना त्यांतील पाणी चोहोंकडे उडालें. तें पाहून ताई नुसती हंसली आणि म्हणाली, " हें काय बरं ? आतां इथं सगळी राड झाली ना ? तीं मोठी कळशी नेऊं नकोस—ती तुला उचलत नाहीं म्हणून मी किती वेळां सांगितलं, तरी तें ऐकायचंच नाहीं वाटतं ! त्रास कुणाला होईल ? तुला कीं मला ? आणि एखाद्या वेळीं पायावर पडली तर ? या आतां रावसाहेबांच्या ताईसाहेबच काय म्हणाल्या असतील ? "

मधेंच तोंड घालण्याच्या संधीचा फायदा घेऊन मी म्हटलें, " खरंच मलाही तेंच वाटलं."

" पाहिलंस ? आतां ही तुझी फजिती रावसाहेबांच्या पर्यंत जाईल." बनी हंसत हंसत म्हणाली.

बनीच्या आईनें कुऱ्यानें उत्तर दिलें, " होऊंदे आपली माझी फजिती ! आणि म्हणे रावसाहेबांच्या घरापर्यंत फजिती जाईल ! जाऊं दे गेली तर. मी कांहीं रावसाहेबांचे तीन चव्वल लागत नाहीं !" असें म्हणून हातांत कळशी लोंबकळत घेऊन ती तशीच स्वयंपाकघरांत गेली. ताईच्या तोंडून निघून गेलेला सुस्कारा मला स्पष्ट ऐकूं आला.

ताईनें विचारलें, " बाबा तुमच्या तिकडेच गेले आहेत ना ? कदाचित उशीर होईल म्हणून मला म्हणाले होते म्हणुन मीही जरा स्वस्थ होतें. पण तुम्ही कशा आलांत इकडे यावेळीं ? जेवणाखाणाची वेळ ही-अंगधुणं देखील झालं नाहीं वाटतं ! बाईसाहेबांनीं कसं जाऊं दिलं तुम्हांला ? "

" मी कुठं विचारलं आईला ! " मी बेपर्वाईनें उत्तर दिलें.

" खरंच ? " ताई माझ्याकडे रोंखून पहात म्हणाली, "पण हे बरं का ?" तिच्या भेदक नजरेपुढें मी गांगरून गेलें. अगदीं प्रेमळपणानें उच्चारलेले दोनच शब्द-पण त्याचा कोंवळेपणाच माझ्या हृदयाला झोंबला. कुणी ताडताड बोललें असतें तरी देखील तें मला इतकें लागलें नसतें. मी लाजेनें खालीं मान घातली.

ताई येऊन माझ्याजवळ बसली आणि माझ्या हनुवटीखालीं हात घालून माझें तोंड वर उचलून म्हणाली, " या पुढ असं करायचं नाहीं. हा गणू देखील मेला वेंधळा आहे. त्यानं तरी नाहीं का सांगायचं—? "

मी ताडकन् उभी राहिलें आणि म्हटलें, " मी जातें तर आतां."

तितक्याच प्रेमळपणानें ताई म्हणाली. " असं कधीं झालं आहे? जरा गोड तोंड केल्याशिवाय गृहस्थाच्या घरांतून जायचं नसतं."

मी गोंधळून गेल्यासारखी झालें. या बाईचा प्रेमळपणाच मोठा दुःसह होता. शांत शब्दानें पण भेदक वाणीनें उच्चारलेलें तिचें प्रत्येक वाक्य ऐकतांच जीव कसा कासावीस होत असे. जावें कीं रहावें, ह्याचाच मला निश्चय करतां येईना.

तिनें दोन्ही हातांनीं धरून मला पुन्हां पाटावर बसवलें. ती आत जाताच बनी माझ्या कानाजवळ येऊन म्हणाली, " पाहिलीस आमची माई ! एक दिवटी आहे बरं दिवटी ! तूं येऊन बसलेली पण विचारपूस तरी करते आहे का पहा ! "

बाहेरून गोडबोल्यांचा आवाज आला, "बने अंग धुवायला पाणी काढ." तितक्यांतच पुन्हां पुढील शब्द ऐकूं आले, " कोण गणू ? यावेळीं तूं इथं कां ? उसने पैसे मागायला आला आहेस वाटतं ? तुला बजावून सांगतो, कीं यापुढं तुला मी एक कवडीसुद्धां देणार नाहीं. "

गणूनें काय उत्तर दिलें तें ऐकू आलें नाहीं. पण नुसतें ' खरंच ' असें अगदीं आश्चर्याच्या स्वरानें म्हटलेलं ऐकू आलं आणि मागोमाग गोडबोलेही माझ्यासमोर येऊन उभे राहिले.

" हें काय ताईसाहेब ? " गोडबोले म्हणाले, "यावेळीं तुम्ही इकडे कुणीकडे ? "

मी दुष्टपणानें हंसलें, त्यांच्याकडे अगदीं रोखून पाहिलें आणि शक्य तितक्या कुत्सित स्वरानें बोललें, " तुमची पाटाची बायको पहायला आलें होतें. "

समोरून येत असलेल्या ताईच्या हातांतील पितळी, आंतील दोन लाडवां-सकट खालीं पडली आणि त्यांतील एक लाडू घडघडत माझ्या पायाशीं येऊन थांबला.

---

प्रकरण ८ वें.

# नवरेशाहीचा तडाखा

ताई अगदीं स्तंमित होऊन उमी होती. गोडबोले हंसण्याचा प्रयत्न करीत होते पण त्यामुळें त्यांचा चेहरा रडवाच दिसत होता.

सैंपाक घरांतून आवाज ऐकूं आला, " पाटाची बायको का ! मामलेदाराची मुलगी झाली, म्हणून वाटेल त्याला वाटेल तसं टाकून बोलायचं, हा कुठल्या गांवचा कायदा ? " माईसाहेब अगदीं खवळून गेल्या होत्या.

बारा वर्षांच्या मुलीला इतकें बोलण्याची बुद्धी कशी व्हावी, असें माझ्या मनांत आलें. पण पुन्हां लगेच वाटलें, कीं मी आठ वर्षांच्या मुलीनंच पहिली कुचाळी केली होती ना ? मला वाईट वाटलें तें एवढयांसाठींच, कीं त्या बारा वर्षांच्या लग्न झालेल्या मुलीला ' पाटाची बायको ' या शब्दांतली खोंच कळली ! गणूच्या घरीं मी गेलें नसतें तर बारा वर्षांच्याच का—बावीस वर्षांच्या वयापर्यंतही मला या शब्दांतला मथितार्थ कळला नसता. खेड्यांतल्या मुलींना व्यवहारांतील बारीक सारीक गोष्टींचें जेवढें ज्ञान असतें, तेवढें अधिकाराच्या कुंपणाच्या मर्यादेत वावरणाऱ्या माझ्यासारख्या मुन्सफमामलेदारांच्या मुलांना नसतें, हें पुढील आयुष्यांत देखील मला दिसून आलें होतें. त्यावेळीं या कारणांचा विचार करण्यापेक्षां माझा चिमटा सर्वांनाच झणझणला, यानेंच मला समाधान वाटलें.

हंसण्याचा रडवा प्रयत्न करीत गोडबोले म्हणाले, "ताईसाहेब, या विषयाची चर्चा एकदां होऊन गेली आहे. ही बायको कांहीं ' पाटाची बायको ' नव्हे. मलाच 'पाटाचा नवरा ' म्हटलात तर शूद्राच्या नजरेने तें बरोबर होईल. तुम्हीं कांहीं शूद्र नाहीं—तुम्हीं ब्राह्मण आहांत. मामलेदारांसारख्या बड्या अधिकाऱ्याच्या पोटीं तुम्हांला जन्म मिळालेला आहे. शिपाईपाईकांच्या तोंडचे शब्द ऐकून तेंच पुन्हां वापरणं ब्राह्मणांना शोमत नाहीं. "

माझी वादवृत्ति जागी झाली. तो शब्द गोडबोल्यांनीं घांसला नसता, तर मी त्याची विशेष वाच्यताही केली नसती. पण आपल्या कृतीचें आडमार्गानें

समर्थन करून ह्या गोष्टीवर पांघरूण घालण्यासाठीं गोडबोल्यांनीं माझ्या जातकुळीवर आघात केला याची मला चीड आली. चिरडीनें बोललें असतां प्रत्युत्तराला धक्का बसतो याची आठवण धरून मी अगदीं शांतपणें म्हटलें, " खरं आहे गोडबोले. शूद्राचे शब्द ऐकूनच मी तसं म्हटलं खरं. पण शूद्र तसं का म्हणतात ? एक नवरा मरून दुसऱ्या नवऱ्याशीं लग्न लावणाऱ्या शूद्राच्या बायकोला 'पाटाची बायको' कां म्हणतात, आणि एक बायको मरून दुसऱ्या बायकोशीं लग्न लावणाऱ्या ब्राह्मणाला 'पाटाचा नवरा' का म्हणूं नये ? याचा मला अजून उलगडा झाला नाहीं. म्हणून मुद्दाम विचारतें, कीं शूद्राला एक नियम कां आणि ब्राम्हणाला दुसरा कां ! "

" अहो ब्राम्हण ते ब्राम्हण आणि शूद्र ते शूद्र ! ब्राम्हणांतल्या कुणी बाईनं जर असा एक नवरा मरून दुसर लग्न केलं—तसं करायला शास्त्राधार नाहींच म्हणा—पण पुण्यामुंबईच्या सुधारकांनीं हल्लीं तशी सुरुवात केली आहे म्हणतात—तर त्याला पुनर्विवाह असं म्हणतात. "

" त्याला पुनर्विवाह कां म्हणतात ? त्याला पाट कां म्हणू नये ? "

" तशी रूढी आहे—तसा शास्त्राधार आहे. तुम्हांला मी एकदां सांगितलं ना, कीं ब्राम्हण ते ब्राम्हण आणि शूद्र ते शूद्र. शूद्रांची जात कमी आहे. त्यांना ब्राम्हणांचे नियम लावतां येत नाहींत." असें म्हणून गोडबोले मोठमोठयानें हंसले आणि मी पुनः प्रश्न करण्यास सरसावत आहें असें पाहून म्हणाले, "आणि असं पहा ताईसाहेब, हा वाद कशाला उगीच ? या शास्त्राधाराच्या गोष्टी आहेत. मोठमोठया माणसांनासुद्धां कळायला बिकट आहेत. या वयांत त्या तुम्हांला कशा कळणार ? उद्यां तुम्हीं मोठया झालांत, चांगल्या बी- ए. एम. ए. झालांत—तुम्हांला बी. ए. करायचं रावसाहेबांनीं ठरवलंच आहे—मग तें तुम्हांला आपोआपच कळेल. आतां उशीर झाला आहे. ताई दुसरा लाडू आणून त्यांना दे पाहूं. "

मला आनंद झाला. मी गोडबोल्यांना निरुत्तर केलें अशी माझ्या मनाची खात्री झाली. लाडवाचा लांच देऊन ते माझं तोंड बंद करण्याचा प्रयत्न करीत आहेत असें उघड उघड मला दिसून आलें.

पण हा लाडवाचा लांच तरी कसा म्हणूं ? ताईनें तर आधींच माझ्यासाठीं लाडू आणले होते. माझ्या उद्गारामुळें तिच्या हातून थाळी पडली, त्यावेळचा

माझ्या पायाशीं आलेला लाडू उचलून मी म्हटलें, " दुसरा लाडू कशाला आणतां? हा आहे ना इथं?"

इतका वेळ एक शब्दही न बोलतां स्वस्थ राहिलेली ताई म्हणाली, " छे छेः तो लाडू जमिनीवर पडला होता. तो असा खायचा नाहीं. बाहेर गणू आला आहे त्याला नेऊन देतें तो."

कुत्सितपणानें मी विचारलें, " जो लाडू मी खायचा नाहीं, तो गणूनं तरी को खावा?"

मोठमोठ्यानें हंसत गोडबोले म्हणाले, "ताईसाहेबांचे प्रश्नच मोठे विलक्षण! ताईसाहेब, तुम्हांला माहित नाहीं. शूद्रांना ब्राह्मणांचं उष्टंसुद्धां चालतं. मग नुसताच जमिनीवर पडलेला लाडू त्यांना खायला काय हरकत आहे?"

ताई घरांत गेली होती ही संधी साधून मी विचारलें, " शूद्रांना ब्राह्मणांचं उष्ट कां चालतं?"

" तशी रूढी आहे. आम्ही त्यांना आमचं उष्ट देतों, ते बिनतक्रार खातात, म्हणून चालतं. तशी रूढीच आहे."

" आणि त्यानीं तक्रार केली तर? ब्राह्मणांचं उष्ट खाणार नाहीं असं म्हटलं तर?"

" तर त्यांना उपाशी मरावं लागेल. शूद्रांच्या बायका ब्राह्मणांच्या घरीं रुपया आठ आण्यासाठीं मोलकरणींचं काम करतात, त्याच्या राहोल्यासाहिल्या अन्नावर उदरनिर्वाह करतात, उष्टं खातात, म्हणून त्यांचा चरितार्थ चालतो."

तितक्यांत ताई लाडू घेऊन आली. आणि माझ्या ओंठावर येत असलेला पुढला प्रश्न मला तसाच ठेवावा लागला. ताईचें मन दुखवूं नये असें उगीचच मला वाटूं लागलें.

लाडू खात असतांना तो प्रश्न माझ्या मनांत सळसळत होता. मी लाडू खाल्ला, पाणी प्यालें आणि बनीचा आणि ताईचा निरोप घेऊन जायला निघालें, तरी ताईबनीची चिमुकली आई कांहीं बाहेर आली नाहीं.

मी जायला निघालें असें पाहून ताई सैपाकघराच्या दारांत डोकावून म्हणाली, "एकलंस का माई, ताईसाहेब जायला निघाल्या आहेत. त्यांना कुंकू लावायचं ना?"

आंतून फणफणत आवाज आला, " बनीला सांगा कुंकू लावायला. नाहीं तर तुम्हींच लावा. "

गोडबोले रागानें ओरडून म्हणाले " कांहीं अकल आहे का तुला ? घरीं आलेल्या सवाष्ण—कुंवारणीला तिला जर कुंकूं लावतां आलं असतं, तर तुला कशाला आणली असती ?"

पुन्हां आंतून आवाज आला, " ही अशी 'पाटाची बायको' म्हणून घ्यायला ! "

वाद तोडून टाकण्यासाठीं ताई म्हणाली, "ताईसाहेबांना करंडा दे पाहूं !"

रागानें बसकन् ओरडून गोडबोले म्हणाले, " नाहीं. ताईसाहेबांना तिनंच कुंकूं लावलं पाहिजे. माझ्याकडे असले हट्ट चालायचे नाहींत. ती घरची मालकीण आहे, तिनंच आपला अधिकार गाजविला पाहिजे. आज रावसाहेबांच्या मुलीला कुंकू लावायचं नाहीं म्हणेल, उद्यां खुद्द बाईसाहेबांनादेखील नाहीं म्हणेल ! तें कांहीं नाहीं ! घरची शिस्त मी अशी बिघडूं द्यायचा नाहीं. शिस्तीप्रमाणंच सर्व कांहीं झालं पाहिजे. "

हातपाय आपटीत माईसाहेब बाहेर आल्या आणि कुंकवाचा करंडा माझ्या समोर आपटून निघून जाऊं लागल्या.

ताई म्हणाली " असं करूं नये. करंडा असा आदळूं नये. ताईसाहेब कांहीं शूद्र नाहींत. त्यांना आपल्या हातानं कुंकू लावलं पाहिजे. "

सैंपाकघरांत जात जात माईसाहेब म्हणाल्या, " ती शूद्र नव्हे आणि मीही शूद्र नव्हे. पण मी कांही त्यांना कुंकू लावायची नाहीं. त्यांच्यालेखीं मी शूद्रच आहे. त्यांनीं मला पाटाची बायको म्हणावं, आणि मी मात्र तें मुकाट्यानं ऐकून घ्यावं ! "

" तें कांहीं नाहीं. तूं ताईसाहेबांना कुंकू लावलंच पाहिजेस. " गोडबोले ओरडून म्हणाले.

अगदीं शांतपणें ताई म्हणाली, " बने, ताइसाहेबांना कुंकू लाव पाहूं !"

गोडबोले रागानें फणफणत होते. ते ओरडले, " तें कांहीं नाहीं. बने, मागें हट. तिनंच ताईसाहेबांना कुंकूं लावलं पाहिजे. "

पुन्हां आंतून आवाज आला " प्राण गेला तरी मी त्यांना कुंकूं लावणार नाहीं. "

तिच्या या उत्तरामुळें मलासुद्धां पराकाष्ठेची चीड आली होती. पण ताई अगदीं संथपणानें ह्मणाली, " असं ह्मणायचं नाहीं. तें अवलक्षण आहे. "

" आतां काय पुढं सुलक्षणं होणार आहेत तीं दिसतातच आहेत. असलीं अवलक्षणं संभाळून कपाळींचं विधवापण चुकणार नाहीं. ते टिचलंच आहे माझ्या नशिबाला—"

माईसाहेबांचे ते उद्गार ऐकून गोडबोल्यांचा राग अनावर झाला. ते धांवतच सैंपाकघरांत गेले आणि तिच्या दंडाला धरून फरफटत ओढीत आणून माझ्यासमोर तिला उभी करून ह्मणाले, " लाव, आतांच्या आतां माझ्यासमोर ताईसाहेबांना कुंकू लाव. "

ती ओक्साबोक्शी रडत होती पण करंडा उचलण्यासाठीं कांहीं केल्या वांकेना. ' कुंकूं लाव, कुंकूं लाव ' ह्मणत गोडबोले सारखे ओरडतच होते.

प्रकरण विकोपाला गेलें. ती कांहीं ऐकत नाहीं असें पाहून गोडबोल्यांनीं तिच्या पाठींत एक रपाटा दिला. मोठमोठ्यानें रडत ती ह्मणाली, " मारा, मारा, आणखीं मारा. एकदां जीव घ्या माझा ह्मणजे तरी अहेवपणानं मरेन. स्वतःच्या मुलीला ह्मातान्याला देऊन तिच्या डोक्यावरून वस्तरा फिरवलात ! मला एकदां मारून टाका ह्मणजे माझ्या कपाळचं तेवढं तरी चुकेल. नाहींतर माझ्या नशिबीं काय आहे ते दिसतंच आहे. प्राण गेला तरी मी कांहीं हिला कुंकु लावणार नाहीं. मेली ' पाटाची बायको' म्हणते मला !"

ताईनें बनीला खूण केली. बनी मुकाट्यानें पुढें सरसावली आणि करंडा उघडून कुंकूं लावण्यासाठीं हात पुढें करणार तोंच गोडबोल्यांनीं तिच्या हातून करंडा काढून घेतला आणि आपल्या हातानें बायकोचा हात धरून तिचें बोट करंड्यांत बुडविलें. तसाच तिचा हात धरून तिच्या बोटानें कुंकूं त्यांनीं माझ्या डोक्याला लावलं. माझ्या डोक्याचें सारें कुंकूं विसरून गेलें.

तिनें रागानें खालीं फतकल मारली आणि मोकाड पसरून मोठमोठ्यानें रडण्यास सुरवात केली.

ताईनें मला खूण केली आणि मी तशीच बाहेर निघालें.

घराच्या बाहेर पडलें त्यावेळीं बनी मागोमाग धांवत आली आणि माझे कानाशीं लागून ह्मणाली, " यांतलें कांहीं घरीं बोलायचं नाहीं बरं ! " मी मानेनेंच होय ह्मटलें.

मी निघण्यासाठीं वळतांच तिनें पुन्हां मला हात धरून थांबविलें आणि परकराच्या ओच्यांनीं माझ्या कपाळाचें कुंकू तिनें रेखून सरळ केलें. मी तिच्या चेहऱ्याकडे पाहिलें, तों तिच्या डोळ्यांतून टिपें गळत होतीं. मी ह्मटलें, " बने तूं रडते आहेस ? "

" रडूं नको तर काय करूं ? रोज हें असंच चालत असतं आणि आह्मां दोघींना रोज गळ्यांत गळा घालून असंच रडावं लागतं. "

मनगटानं डोळ्यांतील टिपें पुशीत ती झटकन् निघून गेली आणि मीही रस्त्याला लागलें.

घरी जात असतां माझ्या मनांत सारखे विचार येत होते. खाजवून खरूज काढण्याची ही बुद्धी मला कां झाली ? पण पुन्हा असें वाटलें, कीं त्यांत बिघडलें काय ? गणू पटेवाल्याच्या बायकोला पाटाची बायको ह्मटलें तर राग येत नाहीं आणि गोडबोल्याच्या बायकोला त्याच शब्दांचा राग का यावा ? एक अर्थी तिला पाटाची बायको ह्मणण्यांत माझी चूक झाली होती. पण गोडबोल्यांना मी पाटाचा नवरा म्हटलें त्यांत वास्तविक चुकलें कुठें ? ब्राम्हणासाठीं एक नियम कां आणि शूद्रासाठीं दुसरा कां ? मुळीं ब्राह्मण आणि शूद्र हाच भेद कां उत्पन्न झाला ?

मी घरीं आलें त्यावेळीं आई माझी वाट पहात होती.

आईला पहातांच मला पूर्वस्मृति झाली. नागू तेल्याच्या घाण्यावरून मी ज्या दिवशीं परत आलें होतें त्या दिवशींचा प्रकार आठवला. माझ्या या भेटींच्या प्रसंगांत कांहीं ना कांही तरी अनर्थ घडल्यावांचून रहात नव्हता. मी ठकीकडे गेलें होतें त्यावेळीं मला मार मिळाला, यमू सारदळच्या घरीं मी गेलें त्यावेळीं तिला मार मिळाला, आतां आज बनीच्या घरीं गेलें त्यावेळीं तो तसा प्रकार झाला. वेळ चुकली एकच—तीं फक्त गणू पटेवाल्याच्या घरीं गेलें तेव्हांची. आज आतां काय होणार याचा विचार दारांत पाऊल ठेवतांच पहिल्यानें आला.

मला पहातांच आई ह्मणाली, " हें बरं का गोदे ! व्रात्यपणा देखील किती तो सहन करायचा ? ऐन जेवणाच्या वेळीं तूं निघून गेलीस ! काय अडलं होतं या वेळीं ? तुझ्यासाठीं थांबून रहाणं होत होतं पण मी बळेंबळेंच जेवायला बसवलं. चल लवकर, आग धू आणि जेवायला बैस माझ्याबरोबर" असें ह्मणून आई घरांत गेली.

शब्दांचा उद्देश कठोर होता पण उच्चाराची भाषा अगदीं मायाळूपणाची होती, त्यामुळें आईच्या ह्या भाषणानें मी ओशाळून गेलें. कसेंबसें अंग धुऊन मी घरात येतें त्यापूर्वीच बाबा आणि दादा जेवून गेले होते.

मी जेवायला बसलें, आईही जेवायला बसली. नित्याचा क्रम ह्मणजे आह्मी सर्वच एका पंक्तीला बसत असं. वास्तविक बाबा जेवून उठल्यावर आईनें त्यांच्या ताटांत जेवणें अवश्य होतें. पण आमच्या घरीं ती चाल नव्हती. गांवचे भटजी येत असत, ते या प्रकाराबद्दल आईला दोष देत असत, पण आई ती गोष्ट हंसण्यावारी नेत असे. आज ती माझ्यासाठीं मुद्दाम मागें राहिली खरी, पण नित्याप्रमाणें स्वतंत्र ताटांत जेवायला बसली.

जेवायला बसल्यावर कांहीं वेळपर्यंत कुणीच कांहीं बोललें नाहीं. पण बडबडत राहिल्याशिवाय मला जेवण कधींच गोड लागत नसे. मुकाट्यानें जेवावें लागल्यामुळें घांस सुखानें घशाखालीं उतरेना.

मनाचा हिय्या केला आणि मी बोलायला सुरुवात केली. अंगणांतल्या मंडपांत बसल्यापासून गोडबोल्यांच्या घराकडून परतेपर्यंतची सर्व हकीकत मी तिला सांगितली. माझ्या तोंडची हकीकत ती अगदीं लक्षपूर्वक ऐकत होती खरी, पण 'हां' 'हूं' करण्यापलीकडे माझ्या भाषणाला फारशी साथ देत नव्हती.

विरोध नसल्यामुळें बोलण्याला रंग येईना, याची मला चीड आली आणि मी ह्मटलें, " मी भिंतीपुढें बोलत नाहीं आई ! "

जिवणीच्या कोपऱ्यांत येणारें हंसें आवरून आई ह्मणाली, " मी भिंतच आहें ह्मणेनास ! "

" तर मग आतां या भिंतीला टेंकून मीं झोंपी जातें. " असें ह्मणून मी जेवायला बसल्या जागेवरूनच खरकटे हात दूर धरून तिच्या मांडीवर डोकें टेकलें.

आईचा राग एका क्षणांत पार मावळून गेला. “ काय ळघळ पोरगी आहे ! ” आई म्हणाली. डाव्या हातानें माझें मस्तक कुरवाळीत माझ्या डोळ्यांशीं डोळे भिडवून ती सारखी पहात होती.

दचकल्यासारखें करून ती पुढें म्हणाली, “ आतां जरा नीट बैस पाहूं. ”

पडल्या जागेवरूनच मी म्हटलें, “ मी काय सांगितलं तें ऐकलंस का ! ” तिनें नुसतें मानेनें होय म्हणतांच मी पुन्हां विचारलें, “ या बाबतींत तुझं काय मत आहे तें सांग. त्याशिवाय मीं इथनं उठणार नाहीं. ”

“ बरं, बरं ” असें म्हणून आई तोंडभर हंसली आणि उद्गारली, “ मला काय वाटतें तें मी सांगतें, पण आधीं उठून बैस पाहूं. ” मी उठून बसतांच तिनें बोलायला सुरुवात केली.

“असं पहा गोदे, हा विषय मोठा कठीण आहे. कुणीच याचा विचार केलेला नाहीं, त्यांतून आम्हीं बायकांनीं तर नाहींच नाहीं. जुना किस्सा गिरवित बसायचं, हेंच आम्हां बायकांचं काम आहे. कधीं काहीं विचारलं तर जाणतीं माणसं कसं उत्तर देतात, तें तूं परवांच ऐकलंस. अगदीं तुझ्या वयाची असल्यापासुन मी पहातें आहें, हें असंच चाललं आहे. वडीलांना विचारलं तर तें असंच तोंड बांधून टाकीत असत. माझी आई बिचारी अगदीं साधी भोळी होती. घरसंसार, देवदेवस्थान, व्रतंवैकल्यं याच्यापलिकडे तिला कांहींच माहीत नसे. या घरीं आलें त्यावेळीं वाटलें, कीं आतां कांहीं प्रश्नांची उत्तरं मिळूं लागतील, पण इथंही तेंच. प्रश्नांचीं उत्तरं मिळत नाहींत असं दिसूं लागल्यापासून हळुहळु मनांत प्रश्नच येत नाहींसें होऊं लागले. बुद्धी खुंटत चालली. हळुहळु माझ्या आईसारखीच माझीही वृत्ती वाढूं लागली. पहिल्यापहिल्यानें जिज्ञासा वाढत असे, मनांत प्रश्न येत असत आणि तसेच्या तसेंच विरून जात असत. पुढं पुढं जिज्ञासा मंद होऊं लागली आणि प्रश्नच उत्पन्न होत नाहींसे झाले. मला वाटतं, माझी ती सक्तीनं दाबून टाकलेली चौकसपणाची वृत्ती आतां तुझ्यांत उतरली आहे. माझे प्रश्न जसे उत्तरें मिळाल्याशिवाय रहात असत, तसेंच तुलाही वागवावं असं आजपर्यंत वाटत होतं—नव्हे—नकळून मी माझ्या वडिलांचं अनुकरण करीत होतें. पण परवां माझ्या मनाला धक्का बसला. मी चूक करतें आहें असं मला वाटूं

लागलं. ज्या कारणामुळं मी नाराज होत असें तेंच मीही करतें आहें, असं पाहून माझी मलाच लाज वाटली." असें म्हणून आई क्षणभर स्तब्ध बसली. नकळत माझ्या हृदयांतून एक मोठा सुस्कारा निघून गेला.

आईचा शब्दन् शब्द माझ्या अन्तःकरणाला पटत होता. माझ्या अन्तःकरणीं इतका फाजील चौकसपणा कां, माझ्या वर्तनांत इतका फाजील बेफाम-पणा कां, इतर लोकांशी होणाऱ्या माझ्या वर्तनांत मर्यादेचें उल्लंघन करण्याची वृत्ति कां, ह्याचा आईच्या भाषणानें मला उलगडा झाला.

आईचें भाषण पुन्हां सुरू झालें, "मी प्रश्न केले म्हणजे माझ्या वडील माणसांनीं जर मला उत्तर दिलीं असतीं तर आज तुझ्या प्रश्नामुळें मला जी मान खालीं घालावी लागते, तो प्रसंग टळला असता. मलाच जिथं माहिती नाहीं तिथं मी तुला काय सांगणार ? मला लिहितांवाचतां येत आहे पण लिहिण्याचा आतां सरावच सुटला आहे. नोकरीच्या पहिल्या अमदानींत मी सासरींमाहेरीं असें आणि तिकडनं नोकरीच्या गांवीं असणं होत असे, त्या वेळीं चोरूनमारून पत्रें लिहित होतें ! माहेरीं काय किंवा सासरीं काय—उघड उघड पत्र लिहिण्याचीं मुळीं सोयच नव्हती. त्यावेळीं लिहिण्याचा थोडासा सराव होता, नोकरी वाढत चालली तसतशी ही तुटलीकडी थांबली. उभयतांच एके ठिकाणी रहात होतों, मग पत्र लिहायचं कुणाला ? ज्या माहेरीं पत्र लिहायची मला बंदी होती त्या माहेरच्या माणसांना माझीं पत्रं थोडींच जाणार होतीं ? तेव्हां लिहिण्याचा सराव तर गेलाच. आतां वाचन—तें नुसतं पोथ्यापुराणांपुरतंच. बायकांनीं दुसरं कांहीं वाचायचंच नाहीं तिथं पोथ्यापुराणाशिवाय दुसरं काय वाचणार ? पुराणं वाचायचीं ती देखील नुसत्या गोष्टीपुरतीं. इतर बायका पुराणं वाचतात त्या भाविकपणामुळं वाचवात—अगदीं अर्थ कळल्याशिवाय वाचतात—तसं माझं नव्हतं. तरी देखील पुराणं स्वतः समजून देण्याइतकं मार्गदर्शक मला कुणीच नव्हतं—म्हणूनच मी म्हटलं, कीं गोष्टी कळण्यापुरतींच मी पुराणं वाचीत होतें—आतांच्या मुलींना गोष्टी कादंबऱ्या वाचून जितकी करमणूक होते तितकीच माझी :पुराणं वाचल्यानं होत असे, यापेक्षां जास्त कांहीं नाहीं. तूं मला विचारशील, कीं माझी अतंवेकस्यं चालत असतात तीं ही पुराणं वाचल्यामुळंच काय

पण मी तुला अगदीं स्पष्टपणें सांगतें, कीं जुनें आचार व्यवहार चालवण्या-पलीकडे त्यांच्यावर माझी काडीमरही श्रद्धा नाहीं. त्यातून ही रावसाहेबी ! व्रतंवैकल्यं, दानधर्म जर कांहीं केलं नाहीं तर गांवांत लौकिक होतो, लोकं नावं ठेवतात, म्हणून तेवढं सर्व कांहीं करावं लागतं. हे आमचे उपाध्ये पुराणिक म्हणजे चालतीं बोलतीं वर्तमानपत्रं आहेत. त्यांचं तोंड बांधून टाकण्यासाठीं हा व्रतावैकल्यांचा लांच द्यावा लागतो. लौकिक वाढविण्यासाठीं ही सारीं ढोंगं मी कळून सवरून करतें. पण त्यांत माझं अन्तःकरण मुळींच नाहीं. या कीर्तीमुखांच्या तोंडांवर चार दाणे टाकले नाहींत तर गांवांत बदनामी करतात, म्हणून सारं कांहीं मनाविरुद्ध असलं तरी करावं लागतं. पण मला हें कां पटत नाहीं, ह्याचं कारण कांहीं मला सांगता यायचं नाहीं. नुसतं मनाला पटत नाहीं एवढंच ! पण संसारांत वागायचं म्हणजे कितीतरी गोष्टी मनाविरुद्ध कराव्या लागतात, त्यातल्याच या पूर्वी जशी वडील माणसं करीत तसंच गेल्या वर्षाप्रमाणें या वर्षी करीत यायचं एवढंच ! विचारलं कधीं, तर तूं पहा-तेच आहेस, धड सरळ उत्तर मिळायचं नाहीं. त्यामुळं विचारणंच खुंटलं. आतां तूं पदोपदीं विचारूं लागलीस—पण मुळीं जिथं मलाच माहीत नाहीं तिथं तुला सांगूं कुठून ? आतां हा तुझा दादा, तुझ्यापेक्षा एवढा मोठा, पण त्यानं कधींच काहीं मला विचारलं नाही. आतां तूं विचारूं लागलीस म्हणून कळून घेण्याची मला बुद्धी होऊं लागली. वेळ निघून गेली आणि आतां जरूरी भासूं लागली. तुझ्या प्रश्नाला कुठलीं उत्तरं देऊं—" असें म्हणून आई पुन्हां क्षणभर थांबली.

माझ्या आठवणींत माझ्याशीं इतकें मन मोकळें करून आई कधींच बोलली नव्हती. आपल्या दुःखाच्या कहाणीचा पाढा माझ्यासारख्या लहान मुलीसमोर वाचतांना तिचें अंतःकरण तिला टोंचत होतें, हें उघड उघड तिच्या मुद्रेवरून दिसत होतें. माझें वय तें काय व तिनें एवढया मोठया महत्वाच्या गोष्टी मला कां सांगाव्या, याचें मला आश्चर्य वाटलें, तसाच अभिमानही वाटला. मनोमन साक्षीनें माझा अभिप्राय तिला कळला असावा. ती म्हणाली, "तुला आश्चर्य वाटेल गोदे, कीं मी आज एवढं तुझ्यासमोर कां बोलतें ? पण अगदीं स्पष्ट सांगतें, अंतःकरणांतलं हें दुःख कुठं ना कुठं आणि केव्हां ना

केव्हां तरी उघड केलं पाहिजे होतं. तुझ्या प्रश्नांनीं त्याला वाचा फुटली. आतां तूं तरी किती दिवस माझ्या सहवासांत रहाणार आहेस ? चार दोन वर्षांनीं तुझं लग्न होईल आणि तूं आपल्या सासरीं जाशील. माझ्या लहानपणांत जो माझा कोंडमारा झाला तो पुढं तुझ्याही बाबतींत होऊं नये, म्हणून एव्हां-पासूनच मी तुला माझी कहाणी सांगायला सुरवात केली आहे. बाई ग, हें बायकांचं जिणं मोठं वाईट आहे. बायकांचा त्राता कुणीच नाहीं. बापाला अधिकार नाहीं आणि नवरा पर्वा करीत नाहीं. तूं लहान आहेस खरी पण ईश्वरानं तुला बुद्धी दिली आहे. एव्हांपासून विचार करूं लागशील, थोडं शिकशील, डोळे उघडून इकडे तिकडे पहाशील, तर पुढल्या आयुष्यांत आमच्या पिढींतल्या बायकांसारखी दुःखी रहाणार नाहींस. वाचतां आलं पाहिजे. अगदी खूप वाचलं पाहिजे. काय मिळेल तें वाचलं पाहिजे. नुसत्या पोथ्या, पुराणांवर तहान मागवून तृप्ति होणार नाहीं. तुझ्याकडून वर्तमानपत्रं वाचून घेतात, तें पाहून मला समाधान वाटतं. अशीच वाचित रहा. अगदीं जें मिळेल तें वाचित रहा. लहानपणीं वाचलेलं पुढल्या आयुष्यांत कायम टिकतं. मोठे-पणचं वाचन तात्पुरतं असतं. त्याला पाळमुळं धरत नाहींत. लहानपणींच्या वाचनांनन्तर विचाराला खूप अवकाश असतो. वाचल्याचा विचार कर-ण्याची बुद्धी असली तर वाचनामुळं विचाराला वळण लागतं. आतां तूं हें विचारलंस, कीं शूद्राच्या पुनर्लग्नाला पाट कां म्हणतात आणि ब्राम्हणाच्या पुनर्लग्नाला पुनर्विवाह कां म्हणतात, हें मला काय पण तिकडे देखील सांगतां यायचं नाहीं. तिकडे विचारायचं असेल तर कायद्याचं कलम विचार, वाटेल तें राजकारण विचार, तुला तासभर चांगलंच भाषण ऐकायला मिळेल. पण हें असलं कांहीं विचारलंस तर तिकडचं आणि माझं अज्ञान सारखंच आहे. म्हणून म्हणतें, बाई ग, आमच्यावर अवलंबून राहूं नकोस. आम्ही वडील माणसं अगदीं कुचकामाचीं आहोंत. शिकलींसवरलेलीं खरीं पण करतों त्या व्यवहारापलीकडच्या व्यवहारांत आम्हीं अगदीं अडाणी आहोंत. आमच्या-पेक्षां कुणबी बरे. त्यांना शिक्षण मिळालेलं नसतं. तृप्ति आलेली नसते. त्यामुळं ते चौकस असतात. पुष्कळांना पुष्कळ गोष्टी विचारतात. शिक्षण नसल्यामुळें प्रश्न विचारायला त्यांना लाज वाटत नाहीं. कुणाला तरी विचारतात.

एकानं उत्तर दिलं नाहीं तरी एकविसाव्याकडून तरी उत्तर मिळतं. त्यामुळं त्यांचं ज्ञान वाढत असतं आणि आम्हीं शिकूनसवरून अडाणी रहातों. गोदे, आज माझी पुरी फजिती झाली आहे. तूं विचारलल्या प्रश्नाचं मला उत्तर देतां आलं नाहीं. पण तुला सांगतें, एकदा प्रयत्न करून पहा—तिकडे विचारायचा प्रयत्न करूं नकोस—प्रयत्न करायचा असला तर गणबाला विचार, त्याच्या बायकोला विचार, त्या कुठल्या त्या तुझ्या तेल्याला विचार, तो तुला उत्तर देईल. तुझ्या शंकेचं निराकरण हींच माणसं करतील. आम्ही उच्च वर्णाचीं आहोंत—सुशिक्षित आहोंत—म्हणून अज्ञानी राहिलों आहोंत. दुसऱ्याला कांहीं विचारायचं म्हणजे आम्हाला कमीपणा वाटतो, म्हणूनच आम्हीं अशीं अडाणी राहिलों आहोंत. तें बंधन त्याना नाहीं, म्हणून कुणब्याचीं माणसं खरीं जाणतीं माणसं असतात. त्यांनांच विचार—तींच तुझं समाधान करतील."

आम्हीं दोघीही अंचवायला उठलों.

माझ्या हृदयांत नवी भावना उत्पन्न झाली. नवा प्रकाश मिळाला. त्या प्रकाशामुळें माझी नजर दूरवर जाऊं लागली. आईच्या त्या दिवसाच्या या उपदेशामुळें माझ्या आयुष्याला नवें वळण लागलें.

---

# प्रकरण ९ वें.

## मुन्सफीणबाई

यानन्तर मधें दरेच दिवस गेले. त्या मुदतींत ह्मणण्याजोगें कांहीं झालें नाहीं.

त्या दिवशींचें आईचें भाषण मात्र मला पुन्हा पुन्हा आठवत असे— अजूनही तें माझ्या हृदयावर कोरलेलें आहे.—त्या एकाच भाषणानें माझ्या पुढिल चरित्रात पालट झाला. इतर मुलींपेक्षां माझा इतिहास स्पष्टपणें भिन्न प्रकारचा झाला, याला कारण तेंच भाषण.

त्या भाषणामुळें आयुष्याची गुरुकिल्ली मला सापडली. इतर मुलींसारखी—नुसत्या मुलींच कां—इतर मुलामुलींसारखी माझी वृत्ति त्यानन्तर राहिली नाहीं. माझ्या चौकसपणाला तेव्हांपासून ऊत आला. माझा पूर्वीचा चौकसपणा नुसता पोरकटपणाचा होता, पण नन्तरचा चौकसपणा ज्या जिज्ञासु वृत्तिचा होता—ज्ञान मिळवण्याच्या लालसेचा होता.

लहानपणापासून उच्च वर्णाच्या मुलाच्या ठायीं वडील माणसाच्या अनुकरणानें कमी वर्णाच्या लोकांबद्दल अनादर उत्पन्न झालेला असतो. त्यामुळें कुणबीमाळी लोकांकडे तुच्छतेनें पाहण्याची आह्मां लोकांना संवय लागलेली असते. अशिक्षित आणि सुशिक्षित असा जातिचा एक होणारा प्रकारही त्या भेदाला जोड देत असतो.

आह्मीं कुणबी ह्मणजे कमी दर्जाचे—त्यांतून अशिक्षित कुणबी ह्मणजे अगदींच हीन दर्जाचे, असा एक ठाम समज झालेला असतो. सुशिक्षित पांढरपेशा आणि अशिक्षित पांढरपेशा हा भेदही जातिभेदाइतकाच तीव्रतेनें बहुजनसमाजांत रूढ होत असल्यामुळें कुणबी तेवढा अशिक्षित—पांढरपेशाहूनही कमी दर्जाचा—असें समजण्यांत येत असतें. त्यांतूनही तो कुणबी अशिक्षित असला ह्मणजे त्याचा दर्जा जवळ जवळ पशू इतका केलला जातो.

ही सर्वसाधारण वृत्ति आहे. कुणबी सुशिक्षित झाला तरीही त्याच्याकडे आह्मी कमदर्जाच्याच दृष्टीनें पहात असतों, तिथें अशिक्षित कुणब्याची काय कथा !

मी ह्मटलेंच आहे, कीं आईच्या उपदेशानें मला नवी दृष्टी मिळाली. मी कुणब्याकडे निराळ्या नजरेनें पाहूं लागलें. जसजशी ही दृष्टी फैलावत गेली तसतशी भेदाभेदाची वृत्ति मावळूं लागली. घरीं मला कोणतेंच बंधन नव्हतें. माझे बाबाही साधारणपक्षीं सुधारकांच्या वर्गांत मोडत असल्यामुळें नित्याच्या व्यवहारांत फारसा भेदाभेद मानणारे नव्हते. आई जरी मोठी धार्मिक ह्मणून समजली जात असे, तरी तिचें वर्तनही बहुतांशीं उदार असे.

त्याकाळच्या इतर ब्राम्हणांच्या घरांतून पाहिलें तर शूद्रांचा स्पर्श झाल्यास कपडे बदलावे लागत असत. आमच्या घरांत सोंवळयाओंवळयाचीं बंधनें, देवधर्म आणि जेवणखाण यांच्या बाबतींत साधारण कडकपणानें जरी पाळलीं जात असत, तरी शूद्राच्या स्पर्शानें कपडे बदलण्याइतकी त्या सोंवळयाची मजल गेली नव्हती.

घरांत पटेवाला मोकळेपणानें वावरत असे. मोलकरणीला देवघरांत किंवा सैंपाकघरांत जाण्याचा जरी मज्जाव होता तरी हें स्पर्शास्पर्शाचें बंधन इतर व्यवहारांत पाळण्याइतकीं तिच्यावर सक्ती केली जात नव्हती.

या सर्व आचारामुळें ब्राम्हण आणि कुणबी असा भेद तीव्रतेनें माझ्या नजरेला येत नव्हता. आईच्या उपदेशापासून हा भेद समूळ नष्ट झाला, इतकेंच नव्हे, तर कुणब्याबद्दल मला आदर उत्पन्न होऊं लागला.

शाळेंत सुद्धां ब्राह्मण नसलेल्या मुली मुद्दाम शोधून काढून मी त्यांच्याशी स्नेहसंबंध जोडूं लागलें. त्यांच्याशीं वागण्यांत उच्चनीच भेद मी बाजूला ठेवित असल्याचें दिसल्यामुळें ब्राम्हणांच्या मुली माझ्यावर बहुधा नाराज होऊं लागल्या.

या नाराज होणाऱ्या मुलींत फक्त एक अपवाद होता. गोडबोल्यांच्या घरीं गेल्या दिवसापासून माझ्या विषयींचा बनीचा स्नेह दिवसेंदिवस अकृत्रिम होऊं लागला होता. इतर मुलींना—ब्राम्हण मुलींना—त्याचें वैषम्य वाटे. मामलेदाराच्या मुलीचा त्याच मामलेदाराच्या हातांखालील एका यःकश्चित कारकूनाच्या मुलीशीं स्नेह वाढत असल्याचें पाहून इतर कारकूनांच्या मुलींना त्याचें वैषम्य वाटत होतें. त्या वैषम्याचें हळुहळू द्वेषांत रूपान्तर होत असल्याचा मला भास होई.

ठकूच्या बाबतींत मुळीं प्रश्नच नव्हता. आठवड्यांतून निदान दोन वेळां तरी नागू तेल्याच्या घाण्यावर जाऊन बसल्या खेरीज मला चैन पडत नसे. सर्व मुलींचा तो एक थट्टेचा विषय होऊन बसला होता. गणू पटेवाल्याच्या घरीं देखील मी मधून मधून जात असें. त्याबद्दल नुसत्या मुलींतच काय–पण साऱ्या गांवांत चर्चा होत असे.

या चर्चेमुळेंच साऱ्या चिपळूणांत मी एक प्रख्यात व्यक्ती होऊं लागलें होतें. कुठेंही जा, माझ्याबद्दल चर्चा चाललेली असायचीच. मग ती माड्याच्या वखारींत असो, वाण्याच्या दुकानीं असो किंवा वकिलांच्या अड्ड्यांत असो किंवा खुद्द कोर्टकचेरींत असो, शिळोप्याच्या गप्पा सुरू झाल्या, कीं माझी चर्चा त्यांत हटकून असायचीच.

या चर्चेमुळें मला जें अकारण महत्त्व प्राप्त होत होतें त्याचा दिवसेंदिवस मला अभिमान वाटूं लागला होता. माझ्याबद्दलच्या चर्चेची हकिकत शाळेंतील कुठल्या ना कुठल्या तरी मुलीनें जर एकाद्या दिवशीं सांगितली नाहीं तर त्या दिवशीं मला चैन पडत नसे. गांवांत माझी निंदा होत आहे याचें माझें मलाच कौतुक वाटूं लागलें होतें.

गांवांतल्या प्रमुख व्यक्तींत मामलेदाराइतकाच मुन्सफाचा दर्जा असतो. मुन्सफांना मुलगी नव्हती. त्यामुळें मुन्सफाच्या घरीं माझ्याबद्दल काय चर्चा चालते हें कळण्यास मला कांहीच मार्ग नव्हता आणि त्यांच्या घरीं माझ्या विषयीं चर्चा होते कीं नाहीं हें जाणण्या विषयीं मी तर फार उत्कंठित होतें.

एके दिवशी एकदाची तशी संधि आली. मुन्सफीणबाई आमच्या घरीं आल्या होत्या. त्या अगदीं सहज म्हणून आल्या होत्या. दिवस रविवारचा असल्यामुळें मी घरींच होतें, पण परीक्षेचे दिवस आल्यामुळें खोलींत अभ्यास करीत होतें. माजघरात आई मुन्सफीणबाईशी बोलत होती. त्यांचें भाषण मला स्पष्टपणें ऐकूं येत होतें. मी घरांत नाहीं अशा समजानें मुन्सफीणबाई बोलत होत्या. आणि तसें त्यांना वाटत असल्याचें ध्यानांत येऊनही आईनें त्यांचा तो गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यामुळेंच त्या बऱ्याचशा मोकळेपणानें बोलत होत्या.

पहिल्यानें हवापाण्याच्या इकडल्या तिकडल्या गोष्टी झाल्यावर मुन्सफीण-बाई म्हणाल्या, " असं पहा बाईसाहेब, तुम्ही मुलीवर जरा चांगली नजर

ठेवा. कांहीं जरी झालं तरी मुन्सफ–मामलेदारांना गावांत एक दर्जा असतो. याची मुलांना आठवण झाली पाहिजे. त्यांना आठवण राहिली नाहीं तर वडील माणसांनीं ती करून दिली पाहिजे.

आईनें विचारलें, " काय झालं ! माझ्या मुलीच्या हातून आमच्या दर्जाला न शोभण्याजोगं कांहीं वर्तन झालं का ? "

" कांहीं ! नुसतं कांहीं ? " मुन्सफीणबाई आवेशानें ह्मणाल्या, " तिचं सारंच वर्तन मोठं चमत्कारिक झालं आहे. गावांत त्याचा फार बोभाटा झाला आहे. आमचीं मुलं तर रोज सांगत असतातच पण शिपाई कारकुनसुद्धां कधीं घरीं आले, तर नुसत्या तिच्याच गोष्टी सांगतात. "

" असं काय केलं माझ्या मुलीनं ? " आई गंभीरपणें ह्मणाली.

मुन्सफीणबाई क्षणभर आईकडे नुसतीच पहात राहिली आणि ह्मणाली, " सारं चिपळूण बोलत सुटलं आहे आणि तुह्मांला तेवढं कळूं नये ! मोठं आश्चर्य आहे ! "

" सारं चिपळूण बोलतं आहे ? " आईनें विचारलें, " सारं चिपळूण माझ्या मुलीबद्दल बोलण्याइतकी माझी मुलगी कांहीं मोठी नाहीं. आठनऊ वर्षांची मुलगी ती काय आणि तिच्याबद्दल सारं चिपळूण बोलत सुटलं आहे तें काय ? "

" धन्य आहे तुमची बाईसाहेब ! " मुन्सफीणबाई ह्मणाल्या, " माझ्या मुलीचं असं वर्तन दिसलं असतं तर मी तिला शाळेतसुद्धां पाठवली नसती. आठ वर्षांची मुलगी झाली ह्मणून काय झालं ? लहान मुलींनींसुद्धां कसं वागावं याला कांहीं मर्यादा आहे. कुणाही गृहस्थाच्या मुलीला वागणुकीची मर्यादा राहिली पाहिजे. पण इथं—ही तर मामलेदाराची मुलगी—अधिकाऱ्याची मुलगी ह्मणून सर्वांचं लक्ष तिच्या वर्तनावर असतं. मुलांच्या वर्तनावरून लोक आईबापांचा अंदाज करतात. तिथं ही जर अशी वाटेल त्या वेळीं वाटेल त्याच्या घरीं जाऊं लागली, तर लोकांनीं तरी नांवं कां ठेवूं नयेत ? "

अगदीं शांतपणें आई ह्मणाली, " अं: एवढंच ! मला वाटलं कांहीं तरी फार भयंकर आहे ह्मणून ?

मुन्सफीणबाई क्षणभर तिच्या तोंडाकडे पहात राहिल्या. आईच्या बेपर्वाईबद्दल त्यांना भयंकर आश्चर्य वाटलें असावें. अगदीं थंडावल्या स्वरानें त्या म्हणाल्या, "तुम्हांला जिथं कांहीं वाटत नाहीं तिथं आठ वर्षांच्या मुलीला दोष कसला द्यायचा? मामलेदाराची मुलगी-आठ वर्षांची का होईना—पण मुलगी मामलेदाराची ना?—आठ वर्षांची मुलगी जर तेल्यातांबोळ्याच्या घरींदुकानीं हिंडूं लागली तर लोकांनीं नांवं कां ठेवूं नयेत? अगदीं उघड उघड तेल्याच्या घाण्यावर जाऊन बसते, हें योग्य दिसतं का? आपल्या योग्यतेला तें शोभतं का? तें एक राहूं दे. तेली म्हणजे एक गांवचा माणूस आहे. त्याची एक मुलगी शाळेंत येतें. झाली असेल तिची दोस्ती—म्हणून जात असेल तिच्या बरोबर घाण्यावर. एक वेळ या गोष्टीकडे कानाडोळा करतां येईल. पण पटेवाल्याच्या घरीं? तुम्हांला माहित आहे का? तुमची मुलगी तुमच्या पटेवाल्याच्या घरीं जात असते. तासाचे तास तिथं बोलत बसते—कसली मेली ती वस्ती-आर्घी शूद्रांची वस्ती, त्यांतून पटेवाला—त्यांतून खुद्द तो तुमचाच पटेवाला. मामलेदाराच्या मुलीनं पटेवाल्याच्या घरीं जाणं कुणाला तरी योग्य दिसेल का? त्या दिवशीं देवदर्शनाहून परत येत होतें, सहज नजर गेली, पाहिलं तर तुमची मुलगी पटेवाल्याच्या घरीं जात होती. पन्नास कोंबडी तिथ दारांत होतीं. त्यांना ती हांकून दूर करीत होती. अगदीं बेधडक कोंबड्यांना शिवत होती! कोंबड्याची शीट पायाखालीं तुडवून सरळ पुढं जात होती! मी अगदीं थक्क झालें. म्हटलं काय हें? ही मुलगी आहे कीं म्हसोबा आहे?—रागावूं नका बाईसाहेब, पण त्यावेळीं अगदीं हेच शब्द माझ्या तोंडी आले. शेजारच्या वकिलीणबाई माझ्याबरोबर होत्या, त्यांना मी अगदीं हेच शब्द बोललें. तो भ्रष्टाकार पाहून वकिलीणबाईनाही माझ्या इतकंच वाईट वाटलं. त्यांनींच मला सांगितलं, म्हणून आज ही गोष्ट काढली. म्हटलं, तुम्हांला माहीत नसेल—नसलं माहीत तर जें आपल्या नजरेला आलें तें तुमच्या कानीं घालावं! मी असं विचारतें, हें बरं का? मामलेदाराच्या मुलीनं पटेवाल्याच्या घरीं जाऊन त्याच्या कोंबड्या हांकवित बसणं हें दुसऱ्या कुणी सांगितलं असतं, तर मी खोटं म्हटलं असतं, पण प्रत्यक्ष मी माझ्या डोळ्यांनीं पाहिलें—"

निरनिराळ्या शब्दांत तीच हकिकत निरनिराळ्या रीतीनें मांडून मुन्शफीण-बाई पुन्हां पुन्हां सांगत होत्या. आई अगदीं स्तब्धपणें ऐकत होती. बोलणें तर सारखें सुरू असलेलें—आई कांहीं उत्तर देत नाहीं—असें पाहून त्या निर्वाणीला येऊन ह्मणाल्या, "आतां सांगावं तरी किती प्रकारांनीं ? सारं गांव बोलतं आहे, आणि तुम्हांला मात्र कळूं नये, हें मोठंच आश्चर्य आहे. मघापासून मी सारखी बोलतें आहें. पण तुह्मीं कांहीं म्हटल्या काहींसुद्धां उद्गार काढीत नाहीं. माझं बोलणं तुह्मांला खोटं का वाटलं ? अहो, मी म्हणतें, जी तुमची ती माझीच मुलगी. या नजरेनें तिच्याकडे पहातें. माझी मुलगी अशी वागली असती तर मी काय केलं असतं, याचा मनाशीं पड-ताळा पहातें. आणि म्हणूनच म्हणतें, कीं सारं गाव बोलत असतां तुम्हीं कांहींच कानीं कसं घेत नाहीं ! तुम्हांला कांहीं कळत नाहीं म्हणावं तर मुलगी अगदीं भलत्याच वेळीं अशी दारोदार हिंडत असते. शाळेतून निघते, ती तडक तेल्याच्या घाण्यावर किंवा पटेवाल्याच्या घरीं बेधडक जात असते. मी पुन्हां म्हणतें—राग मानूं नका—पण ही मुलगी आहे कीं म्हसोबा आहे ? गांवांत ब्राह्मणांचीं कुणी मुलं का नाहींत ? मग सारीं मुलं सोडून ही शूद्रांच्या घरींच का धांवत असते ? चांगले वकील आहेत थोरमोठे, त्यांच्या मुली आहेत शाळेंत, त्यांच्या घरी गेलं तर एवढं गैर दिसणार नाहीं. वकील झाले तरी आमच्या समोर उभे राहून काम करणारे. एक परीनं दुय्यम दर्जाचे, पण म्हटलं तरी ते वकील आहेत, शिकलेले आहेत, त्यांच्या घरीं गेलं असतां लोक कांहीं नांव ठेवणार नाहींत. पण या तुमच्या मुलीची मुलखावेगळी रीत. पण म्हटलं तुम्हांला माहीत नसेल ! मुलं खोटं बोलतात—असं कुणाच्या घरीं जायचं असलं कीं हटकून दुसऱ्या कुणाचं तरी नांव सांगतात. हाताखालच्या नोकराच्या नजरेला आलं तर तुम्हांला येऊन सांगायचं धाडस कोण करणार ! जो तो आपल्या कर्माला भीतो. तेव्हां म्हटलं, आपण होऊन तुम्हांला सांगावं म्हणजे तुम्हीं काहीं तरी तिला आळा घालाल. पुरुषापुरुषांतून गोष्टी जाण्यापूर्वीं म्हटलं आपलं बायकाबायकांचं बोलणं झालेलं बरं. काय ? मी म्हणतें हें खरं ना ?"

आई अगदीं संथपणानें म्हणाली, "मला सर्व कांहीं माहित आहे. माझी

मुलगी कशीही असली—लोकांच्या दृष्टीनं फाजिल असली—तरी प्राण गेला तरी खोट बोलायची नाहीं."

माझ्यानें रहावेना. मी दप्तर गुंडाळून ठेवलें आणि खोली बाहेर येऊन आईजवळ बसलें. मला पहातांच मुन्सफीणबाई एकदम चमकल्या आणि ह्मणाल्या "घरांतच होती वाटतं मुलगी!"

आई कांहीं बोलणार होती पण मधेंच तोंड घालून मी ह्मटलें "हो. या जवळच्याच खोलींत होतें. परीक्षा आहे ना परवां? अभ्यास करीत होतें पण तुमचं बोलणं ऐकलं तेव्हां अभ्यासाकडे लक्ष लागेना, ह्मणून तशीच उठून बाहेर आलें."

मुन्सफीणबाई माझ्याकडे नुसत्या पहातच राहिल्या. मी ह्मटलें, "पहातां काय माझ्याकडे! मी सारं कांहीं ऐकलं. मी पटेवाल्याच्या घरी जातें, नागू तेल्याच्या घाण्यावर जातें, आणखी ओळखीच्या शाळेंतल्या सर्व मुलींच्या घरीं येत नाहीं, ह्मणून तुह्माला चमत्कारिक वाटलं असेल, पण तुह्मालाही मुलगी असती, माझ्या बरोबर ती शाळेंत असती आणि तिचा स्नेह झाला असता, तर नागू तेल्याच्या घाण्यावर जातें तशीच तुमच्याही घरीं आलें असतें"

एवढाले डोळे करून मुन्सफीण बाई म्हणाल्या, "ह्मणजे? नागूतेली आणि आम्हीं सारखेच का? बरं झालं मला मुलगी नाहीं तें!" मी नुसती हंसलें आणि स्वस्थ राहिलें.

मला जवळ घेऊन कुरवाळीत आई म्हणाली, "माझी गोदू मोठी हुषार आहे. कसं चोख उत्तर दिलं?"

"आणि तें तुम्हांला पटलं?" मुन्सफीणबाई जरा तोऱ्यानें म्हणाल्या, "नागू तेल्याची आणि आमची तिनं सरोबरी केली तीही तुम्हांला पटली का?"

आई नित्याच्या संथपणानें म्हणाली, "त्यात सरोबरी कसली झाली? शाळेंतल्या मुली एकमेकींच्या घरीं जातात. नागूतेल्याची ठकीही इथं येत असते. आणखीही दहा बारा मुली दर रविवारीं इथं येतात. परीक्षेचा अभ्यास म्हणून आज कुणी आल्या नाहींत. तुमची मुलगी तिच्या जोडीला असती तर या साऱ्याच मुली तुमच्या घरीं आल्या असत्या. तुमच्या मुलांबरोबर

त्याचे शाळा सोबती नाहीं का येत तुमच्या घरीं ? त्या दिवशीं मी आलें होतें त्यावेळीं पाहिलं, सारे शाळेतल्या मुलांचा घोळका जमला होता. ते सारेच मुलगे काय वकीलांचे होते ? त्यांत देखील कुणब्यामाळ्यांची मुलं असतील ! आमचा दादाही होताच तिथं— ”

मुन्सफीण बाई स्तंभित होऊन म्हणाल्या, “ थक्क झालें तुमच्यापुढं ! तुम्हीच जर असं म्हणूं लागलात तर मुलीला तरी कसला दोष द्यावा ? बरं मुलींचं एक असो तुमच्या पटेवाल्याच्या मुली शाळेंत का येत असतात ? ”

आई मोठ्यानें हंसून म्हणाली, “ अहो, गणू पटेवाला म्हणजे घरचा माणूस. अष्टौप्रहार घरांत वावरत असतो. त्याच्या विषयीं आपलेपणा नाहीं का वाटायचा ? आणि जिथं आपलेपणा वाटतो तिथं कुणाच्या घरीं कुणीही जायला काय हरकत आहे ? आपलेपणा वाटला, कीं ब्राम्हण आणि कुणबी हा भेदच मनांत रहात नाहीं. दुजा भाव मनांत येतो तो दुराव्यामुळं. घळी-मेळीचा सहवास झाला कीं भेदाभेद कसला तो रहात नाहीं. ”

आंबट तोंड करून मुन्सफीण बाई म्हणाल्या, “ तुम्हालांच आवडलं तिथं आम्हीं काय बोलायचं ? पण वाटलं म्हणून सांगितलं. जसे मुन्सफ तसेच मामलेदार ! दोघेही गांवचे अधिकारी. दोघेही एका परीनं गांवचे राजेच. लोकांनीं अधिकाऱ्यांनां नांवं ठेवलीं, कीं वाईट हें वाटायचंच. तुम्हांला नांव ठेवलं काय, कीं आम्हांला ठेवलं काय, माझ्या दृष्टीनं दोन्हीं सारखींच ! म्हणून एवढा वेळ बोललें. आम्हीं आपलीं जुन्या काळचीं माणसं, अजून सुधारकी थाट आमच्यांत शिरले नाहींत. वाडवडिलांनीं घालून दिलेला कित्ता पुढं गिर-वायचा हीच आमची नजर. लोकांनीं तुम्हांला नांवं ठेवलीं तर आपुलकीच्या दृष्टीनं आम्हांलाही वाईट वाटतं, म्हणून बोललें. नाहीं पटलं तर सोडून द्या. पण सांगायचें म्हणून सांगतें, एकंदरींत हें कांहीं बरं नव्हे. लोकलाज म्हणून कांहीं आहे ना ? चौघांत रहायचं म्हणजे चौघांसारखं वागावं लागतं. मुलखा-वेगळे आचार मोठ्या माणसांनांही शोभत नाहींत—”

आई क्षणभर आपल्याशींच हंसली आणि म्हणाली, “ कोण मोठं आणि कोण लहान हें कुणी ठरवायचं ? तालुक्यातले सारे लोक मामलेदारापुढं मान वांकवतात, पण तेच मामलेदार जिल्ह्याला गेले म्हणजे तितक्याच अदबीनं

कलेक्टरसाहेबांना मुजरा करतातच कीं नाहीं ! कसला लहान आणि मोठेपणा घेऊन बसलां आहांत ? उद्यां पेन्शन घेतलं, कीं गांवचा कुत्रासुद्धां आम्हां लोकांना विचारायचा नाहीं. पूर्वीची ओळख धरली असली तर हे कुणबीमाळीच पेन्शन घेतल्यावरही उद्या थोडी विचारपूस करतील. पण कारकून आणि वकील पेन्शन घेतलेल्या मामलेदारमुन्सफाकडे ढुंकून सुद्धां पहायचे नाहींत !"

" देवदर्शनाची वेळ झाली. आतां निरोप घेतें." असें म्हणून मुन्सफीण बाई एकदम उठल्या. पेन्शन घेतल्यामुळें निस्तेज झालेल्या मुन्सफाचें दुबळें चित्र तिच्या डोळयासमोर उभें राहिलें काय ?

तिला कुंकू लावून आई दारापर्यंत पोहोंचवायला गेली. मी माजघरांतच उभी होतें. इतक्यांत दादा आंत आला. दाराबाहेरच्या मंडपांतून आई मुन्सफीणबाई बरोबर बोलत बोलत रस्त्यापर्यंत जात होती.

मी दादाला विचारलं, " कायरे दादा, मुन्सफांच्या घरीं गेला होतास का ? तिथं कोण कोण आले होते ? "

माझ्या अंगावर वस्कन येऊन दादा म्हणाला, " तुला कशाला ती पंचाईत ? तूं आपली जा नागू तेल्याच्या घाण्यावर. "

त्याच्या बोलण्याचा कसलाच राग न धरतां मी शांतपणानें विचारलें, " असं रे काय दादा ! मी सरळ विचारलं, त्याला सरळ उत्तर नाहीं का द्यायचं ? म्हटलं, तुझे दोस्त जमतात मुन्सफांच्या घरीं. त्यांत कुणी मराठ्यांचीं मुलं असतात का रे ? "

माझ्या शांतपणानें ओशाळून दादा थोडासा कुत्सितपणानें म्हणाला, " हो, असतात तर काय झालं. मराठ्यांचीं मुलं असतात पण ते सरदार आहेत. वाण्यांचीं मुलं असतात पण ते व्यापारी आहेत. कुणब्यांची मुलं असतात पण त्यांचे बाप पेन्शनर सुभेदार आहेत. तेल्यांचीं आणि पटेवाल्यांची मुलं मात्र मुळींच नसतात. "

" तुमच्या शाळेंत तेल्यांचीं मुलं आहेत का रे ? "

" नाहीं बुवा कुणी दिसत. तेल्यांचीं मुलं इंग्रजी शाळेपर्यंत थोडीच मजल गांठणार आहेत ? थोडं रटफ येऊं लागलं, कीं घाण्यावर बसूं लागतात. असलीं तेलीतांबोळ्याचीं मुलं इंग्रजी शाळेंत नसतातच मुळीं. "

" बरं, तूं मराठी शाळेंत होतास तेव्हां तिथं तेलीतांबोळ्याचीं मुलं होतीं का ? "

" होतीं थोडीबहुत. पण फारशी नसावीं असं वाटतं. पण आम्हीं त्यावेळीं होतों बेळगांवांत. तिथले लोक आहेत बहुतेक व्यापारी. चांगली पांढरपेशांची मुलं जिथं शाळेंत येत नाहींत, तिथं तेलीतांबोळयांची कुठून येणार ! होतीं कांहीं, नाहीं असं नाहीं. पण त्यांचो माझो फारशी कधीं ओळख झाली नाहीं. आधीं फारशा ओळखी करायची तुझ्यासारखी मला संवयच नाहीं. कुणाची ओळख ठेवली, तर तो अभ्यासासाठीं. गांवच्या चौकशा करीत गल्लोगल्लींतून हिंडणारी तुझ्यासारखी नगरभवानी तूंच ! आपल्याला नाहीं तसलं काहीं आवडत. सारं चिपळूण तुझ्याबद्दल बोलत असतं पण तुझ्या लांब कानांत तें काहीं शिरत नाहीं. तूंच विचारलंस म्हणून बोलतों. नांहीं तर कधीं शब्द सुद्धां काढला नसता. पण गोदे, तुला एकदां सांगतों, हे चाळे बरे नव्हेत ! आई तुझे चोचले चालवते म्हणून आज तूं अशी चेकाळली आहेस. पण उद्यां सासरीं गेलास म्हणजे तिथं आईचा पाठिंबा तुला मिळायचा नाहीं. " असें बोलून दादा तडक माडीवर निघून गेला.

त्याच्या भाषणानें माझ्या अंतःकरणांत गुदगुल्या झाल्या. एकूण दादा देखील असाच ना !

आई परत फिरली आणि मी एकटीच उभी राहिलें आहें असें पाहून म्हणाली, " ऐकलंस गोदे, ही सुरुवात झाली बरं का ! आज तूं जशी वागते आहेस तशीच मोठेपणापर्यंत रहाशील, तर असलीं कुचकीं बोलणीं तुला रोज पचवावीं लागतील. कुणी कांहीं बोललं तरी मनाला लावून घेऊं नकोस आणि कुणाला एवढ्या बाबतींत तरी उलटून उत्तर देऊं नकोस. " असें बोलून आई सैंपाकघरांत निघून गेली. मी दप्तर सोडून पुन्हां अभ्यासाचें पुस्तक घेऊन बसलें. पण—

### प्रकरण १० वें

# मला पानसुपारी

मनांत सारखे विचार घोळत होते. मुन्सफीणबाईशीं पुरेसा वादविवाद करायला मिळाला नाहीं, याचें मला असमाधान वाटत होतें. कांहीं ना कांहीं तरी कुरापत काढून वादविवादाला जोर आणायचा, दुसऱ्याला खिजवायचें आणि त्यांतून कांहीं तरी निष्कर्ष निघेल कीं नाहीं तें पहायचें, असा माझा स्वभावच होऊं लागला होता.

मुन्सफीणबाईशीं वादविवाद करायचा तो त्यांच्या घरीं मुद्दाम जाऊन करावा कीं सहज येईल ती संधी साधावी, हें ठरविण्यांत बरेच दिवस निघून गेले.

तितक्यांत बाबांची बदली झाल्याचा हुकूम आला. त्यांना प्रमोशन झालें होतें आणि त्यांची नेमणूक रत्नागिरी येथें डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टरच्या जागीं झाली होती. त्या भागांत या हुद्द्याच्या अधिकाऱ्याला 'प्रान्तसाहेब' म्हणण्याचा परिपाठ आहे.

प्रांतसाहेब होणार या कल्पनेनें बाबा मोठ्या खुषींत होते. कचेरींतील मंडळीही त्यांचीं सारखीं अभिनंदनें करीत होती. पानसुपाऱ्या सुरू झाल्या होत्या आणि मेजवान्यांचीं आमंत्रणांवर आमंत्रणें येत होतीं. गांवांतील बहुतेक वकिलांकडे आणि ब्राह्मण असलेल्या व्यापाऱ्यांकडे आम्ही मेजवानीसाठीं गेलों होतों.

अशा वेळीं जी बहुतेक चर्चा चालत असे त्यांत प्रांतसाहेबांचीच वाखाणणी होत असे. दुसरा कोणताच विषय निघत नसल्यामुळें मला माझी जिभली चालवण्याची संधीच मिळेना. चितळे व्यापाऱ्यांच्या घरीं आम्ही गेलों त्यावेळीं कांहीं तरी वादविवाद काढतां येईल असें मला वाटलें होतें पण सर्व मंडळी इथून तिथून प्रांतसाहेबी घोळवूं लागल्यामुळें कुचाळी काढण्याला मला वावच मिळाला नाहीं.

मी जाणार असें पाहून शाळेतील सर्व मुलींना-विशेषतः माझ्या मैत्रिणींना वाईट वाटत होतें. ज्या मुलींची ओळख नव्हती किंवा ज्यांच्याशीं प्रत्यक्ष येण्या-जाण्याचा संबंध नव्हता त्या मुलीदेखील आमच्या बदलीनें दुःखी झाल्या.

शाळेंत मला एक प्रकारचें महत्व आलें होतें. पदोपदीं मास्तरांचा पाण-उतारा करण्यांत मी पुढाकार घेत असें. माझ्या चिथावणीनें किंवा पाठिंब्यानें कांहीं मुली या कामीं माझें अनुकरण करीत असत. त्या कामीं त्यांना माझ्या-इतकें यश येत नसे. बापाच्या अधिकाराच्या आधारावर माझी अरेरावी खपत असे-तरीही मी अशा दंगेखोर मुलींची तरफदारी करून शक्य तो मास्तराचा पाणउतारा करण्यास मदत करीत असें.

मी जाणार हें पाहून त्याचमुळें माझ्या मैत्रिणी व इतर मुली यांना वाईट वाटलें.

सर्व मुलींनीं संगनमत करून मला एक मेजवानी देण्याचें ठरविलें. इतर बाबतींत मास्तर जरी माझ्यावर नाराज असत तरी-मामलेदाराची मुलगी म्हणून म्हणा किंवा जात्याच मी बुद्धिवान होतें म्हणून म्हणा-तरीही माझ्या जाण्यानें मास्तरांना तितकेंच वाईट वाटलें होतें.

मुलींच्या या कटांत मास्तरही सामिल झाले होते. या मेजवानींत मास्तर लोक जरी प्रत्यक्ष भाग घेत नव्हते, तरी त्यांनीं पैशाच्या दृष्टीनें थोडाबहुत हातभार लावला असावा, असें बनीच्या बोलण्यावरून मला कळून आलें.

मेजवानी जेवणाची नव्हती. कोरड्या फराळाची होती. माझ्या वर्गांतील सर्व मुली आल्या होत्या, तशाच इतर वर्गांतीलही मुख्य मुख्य मुली हजर होत्या. खाण्याचे जिन्नस बाजारांतूनच तयार करून आणले होते. पण पन्हें मात्र मुलींनीं स्वतः केलें होतें.

वाढायला सुरवात झाली त्यावेळीं मीही मदत करण्यास सरसावलें पण बाकीच्या मुलींनीं मला गप्प बसवून ठेवलें.

फराळ झाला, जागा साफ करण्यांत आली-फराळाची व्यवस्था शाळेंतच करण्यांत आली होती-आणि नंतर बैठका घालण्यांत आल्या.

यावेळीं मात्र सर्व मास्तर मंडळी हजर राहिली. माझ्या वर्गाचे मास्तर मला घरीं शिकवायला येत असत हें मी पूर्वी सांगितलेंच आहे. माझ्या

शाळेंतल्या वागणुकीप्रमाणेंच माझी घरची वागणूकही त्यांच्या अवलोकनांत होती.

बेत मोठा विलक्षण होता. बाबांना जशीं मेजवानीचीं आमंत्रणें होतीं, तशाच निरनिराळ्या संस्थांतर्फे अभिनंदनपर सभाही भडत होत्या, त्याच अनुकरणानें मुलींनीं हा घाट जुळवून आणला होता. मोठया लोकांच्या सभेच्या अनुकरणानें मला निरोप देण्यासाठीं सभा भरविण्यांत आली.

हा बेत अगदीं आयत्या वेळीं झाल्यामुळें भाषणें कुणीं करावीं याचा मोठा प्रश्न पडला. ठकी, बनी आणि यमू यांनीं या बेतांत प्रामुख्यानें भाग घेतला असल्यामुळे वरच्या वर्गांतील कांहीं मुलींना घेऊन शाळेच्या बाहेरच्या व्हरांड्यावर त्या आपआपसांत कुजबुजूं लागल्या.

त्या वेळींच या प्रसंगाची थोडीशी जाणीव मला उत्पन्न झाली. माझ्या मैत्रिणी मला वगळून कसलें तरी खलबत करीत आहेत हें पाहून पहिल्यानें मला थोडें चमत्कारिक वाटलें. पण ज्यावेळीं त्यांनीं आमच्या मास्तरांना बोलावून बाहेर नेलें त्यावेळींच मला पुढील प्रसंगाची बरोबरशी कल्पना आली.

सभेचा घाट घडवून आणला आणि मुलींनीं अगर मास्तरांनीं माझ्या बद्दल भाषणें केलीं तर मला कांहीं तरीं उत्तर द्यावें लागेल अशी जाणीव मला झाली. बाबांच्यासाठीं अभिनंदनपर सभा होत असत त्यावेळीं त्या सभांना मी बाबांबरोबर हजर रहात असें, त्या वेळच्या कार्यक्रमावरून मला असें वाटलें. मुलीं किंवा मास्तर काय भाषण करणार याची अर्थात मला कल्पना नव्हती. काय बोलणार हेंच जर माहीत नाहीं, तर त्यावर काय उत्तर द्यावें हें तरी मला कसें कळावें ?

साधारणपणें मी कल्पना करीत गेलें आणि अशीं अशीं भाषणें झालीं तर अशा अशा प्रकारें आपण उत्तर द्यायचें असं मनाशीं योजूं लागलें. माझे विचार कुठें तरी भटकत चालले होते. त्या विचारांच्या भरकटण्यांत मी माझ्या भाषणाचा मसुदा ठरवित होतें.

शेवटीं व्हरांड्यावरचीं खलबतें एकदांचीं आटोपलीं. बाहेर असलेल्या मुली भराभर आंत येऊन जागा धरून बसूं लागल्या. शाळेंतील मास्तरांपैकीं तीनच

मास्तर आले होते. त्यांत हेडमास्तरही होते. त्यांच्यासाठीं मुलींनीं तीन खुर्च्या आणून ठेवल्या.

एक क्षणभरच हेडमास्तर खुर्चीवर बसले, पण लगेच उठून म्हणाले, " ठके, या खुर्च्या नेऊन पलीकडे ठेव. आम्हीं खुर्च्यांवर बसलों आणि तुम्हीं बैठकीवर बसलांत म्हणजे त्याला रोजच्या वर्गाचं स्वरूप येईल. तुम्हांला बसायला जर निदान बाकं असतीं तर आम्हीं खुर्च्यांवर बसलों तरी हरकत नव्हती. पण आपल्याकडे कुठं आलीं आहेत बाकं ? उद्यां तुम्हीं इंग्रजी शाळेंत गेलां कीं बाकावरच बसावं लागेल. आज आपण आपले या बैठकी-वरच बसूं या म्हणजे तेवढाच घरगुतीपणा वाटेल. "

मध्यमार्गी हेडमास्तर बसले आणि थोडयाशा अंतरावर अदबीनें दुसरे दोन्हीही मास्तर बसले. हेड मास्तरनीं मला हांक मारून आपल्या जवळ बस-वून घेतलें, तोंपर्यंत मी चोरासारखी उभी होतें.

मास्तरांच्या जवळ एकटेंच बसणें मला थोडें चमत्कारिक वाटलें. सर्व मुली वर्गातल्या मुलीसारख्या बसल्या असतां आपण शिष्टासारखें बाजूला बसणें मला संकोचास्पद झालें. मी मास्तरांना म्हटलें, " मी मुलींतच तिकडे बसलें तर चालेल का ? "

मोठयानें हंसत मास्तर म्हणाले, " छेः ! छेः ! असं कसं होईल ? हा सगळा समारंभ तुमच्यासाठीं आहे. आज तुम्हीं अग्रस्थानींच बसलं पाहिजे. खरं पाहिलं तर आम्हीं देखील या इतर समासद मंडळींतच मिसळलं पाहिजे होतं, पण त्यांतल्यात्यांत वडिलकीचा मान राखण्यासाठीं बाजूला बसलों एवढंच. "

आमच्या वर्गाच्या मास्तरांनीं प्रास्ताविक भाषण करून सभेला सुरुवात केली. भाषण अगदीं ठराविक सांच्याचें होतें. बाबांच्यासाठीं म्हणून ज्या सभा भरत असत त्यावेळीं ज्या प्रकारचीं भाषणें होत, त्याच नमुन्याचें हें भाषण होतें.

नंतर हेडमास्तर बोलायला उठले. त्यांनीं दहापांच वाक्यांत माझ्या हुषा-रीची वगैरे तारीफ करून बाबांच्याच बद्दल बोलायला सुरुवात केली. बाबांची चिपळूणांतील कारकीर्द, त्यांनीं शाळेला दिलेल्या भेटी, त्यावेळीं मारलेले शेरे,

लोकल बोर्डाचे प्रेसिडेंट या नात्यानें त्यांनी शाळेसाठीं केलेली कामगिरी, गावां-तील त्यांचें वजन, व्यापारी मंडळींशीं असलेलें त्यांचे सलोख्याचें नातें, मागिल मामलेदारांच्या कारकीर्दीशीं त्यांच्या कारकीर्दीची केलेली तुलना वगैरे माझ्याशीं कांहींच संबंध नसलेल्या गोष्टीवर त्यांनीं चांगलें पाऊण तास भाषण केलें.

सर्व मुली अगदीं भाविकपणें त्यांचें भाषण ऐकत होत्या, पण माझ्या बाल-बुद्धीलासुद्धां तें अप्रस्तुत वाटलें. बाबांसाठीं झालेल्या पूर्वीच्या एका सभेंत त्यांनीं अगदीं असेंच भाषण—फक्त माझ्या संबंधाचा उल्लेख तेवढा वगळून—केलेलें मला चांगलें आठवलें. त्यांनीं हें भाषण पाठ तर केलें नसेल ना, असें क्षणभर माझ्या मनांत आलें !

त्यानंतर गोडबोल्यांची बनो बोलायला उठली. कांहीं वेळ तिच्या तोंडून शब्दच निघेना. हाताचे चाळे सारखे सुरू होते, जसें कांहीं हात चालवल्यानें भाषणाला स्फूर्ति येणार होती ! क्षणभर तिचा चेहरा अगदीं गोरामोरा झाला. पण आमच्या वर्गाच्या मास्तरांनीं न मीण्याविषयीं चार दोन शब्द बोल-ल्यावर तिला एकदम वाचा फुटली आणि ती म्हणाली, “ मैत्रिणींनो—नव्हे—परमपूज्य गुरुवर्य आणि मैत्रिणींनो, आज आपल्या गोदूसाहेब—नव्हे—ताईसाहेब—नव्हे—गोदू गोखले आपलें आवडतें चिपळूण सोडून रत्नागिरीस जात आहेत–”

एका दमांत तीन वेळ दुरुस्त केलेलें हें एक वाक्य संपताच तिनें एक मोठा सुस्कारा टाकला. पुढील वाक्य आठवेना. खिशांतील कागद काढून ती उघडून वाचून पाहूं लागली. त्यावेळीं जमलेल्या मुलींच्या घोळक्यांतून हंस-ण्याची लहानशी दाबलेली लकेर निघून गेली.

वाचूनही चांगलेसें साधेना. त्यावेळीं, “ असं म्हणून मी त्यांचं अभि-नंदन करतें आणि खालीं बसतें. ” एवढेच शब्द कसेबसे उच्चारून ती खालीं बसली. हें ‘असं’ काय तें शेवटपर्यंत कुणालाच कळलें नाहीं.

सर्व मुलींनीं जोरजोरानें टाळ्या पिटल्या, त्यासरशी ती शरमेनें अगदीं तांबडी झाली. मलाही हंसूं येत होतें, पण मोठ्या परिश्रमानें चेहऱ्यावरचा गंभीरपणा मी कायम ठेवला होता.

बनीनंतर वरच्या वर्गांतल्या एका मुलीचें भाषण झालें. तें तिनें पाठ करून आणलेलें असावें असें वाटलें. मिशींतल्या मिशींत हंसत हेडमास्तर बाजूला वळून मला म्हणाले, " आतां काय सांगावं या पोरीला ? उद्यां रावसाहेबां-साठीं शाळेंत सभा होणार आहे. त्यावेळचें भाषण यावेळीं बोलून गेली ! तुम च्यासाठीं लिहून दिलेलें भाषण विसरली वाटतं ! "

अर्थात याही भाषणाचा हंशा पिकला असता पण सर्व भाषण माझ्या बाबांच्या स्तुतीनें भरलेलें असल्यामुळें तें हंसण्यावारी नेण्याचें कुणालाच धैर्य झालें नाहीं.

सारदळांच्या यमूला भाषण करण्याविषयीं काहीं मुली डिवचीत होत्या पण ती अगदीं हूं कीं चूं न करतां सर्वांचीं बोलणीं ऐकून घेत अगदीं स्वस्थ बसली होती.

शेवटीं ठकी बोलायला उठली. तिचें भाषण पाठ केलेलें नसावें असें मला वाटलें. कारण त्या भाषणांत अत्यंत घरगुतीपणा होता. आम्ही चार मुली एका ठिकाणीं बसतों आणि बोलतों तसेंच ती बोलली. मात्र आरंभाला आणि शेव-टाला औपचारिक जे चार शब्द बोलायचे तेवढेंच घरगुती वाटले नाहींत. तिची आणि माझी ओळख कशी झाली, आम्हीं पहिल्या दिवशीं घाण्यावर कशा गेलों, त्यानंतर मी आजारी पडल्यावर गणू पट्टेवाल्यानें तिला कसें वाग-विलें आणि पुन्हां वेळोंवेळीं तिच्या दुकानावर गेल्यावेळीं काय काय हकी-कती घडल्या, याचें सविस्तर वर्णन तिनें आपल्या भाषणांत अगदीं न अडख-ळतां केलें. ती अगदीं अस्खलितपणें बोलत होती. भाषणांतील कोणताच भाग बनावट नसल्यामुळें जुळवून भाषण करण्याची तिला जरूरीच पडली नाहीं.

तिचें भाषण संपतांच हेडमास्तर म्हणाले, " वाः ठकू ! तूं इतकं सुंदर भाषण करशील असं मला मुळींच वाटलं नव्हतं. मला आधीं कळलं असतं तर रावसाहेबांसाठीं होणाऱ्या सभेचं भाषण गंगू घाणेकरच्या ऐवजीं मी तुलाच सांगितलं असतं. " हेडमास्तरांचा शेरा ऐकून ठकी नुसती हंसली.

शेवटीं उत्तर देण्याची माझ्यावर पाळी आली. काय उत्तरें द्यायचीं याबद्दल मी पूर्वीपासून मनाशीं जें ठरविलें होतें त्यांतील कोणताच भाग माझ्या भाषणांत आला नाहीं. मी बोलायला उभी राहिलें आणि तोंडाला येईल तें बोलत सुटलें.

तरीही तें भाषण मला अजून आठवत आहे. सर्वत्रांचे औपचारिक आभार मानून मी म्हटलें, " मैत्रिणींनो, मी आज तुम्हाला सोडून जात आहें. कुणी सांगावं, पुढल्या उभ्या आयुष्यांत आपल्या गाठीमेटीसुद्धां होणार नाहींत. पण चिपळूणच्या शाळेला मी केव्हांही विसरणार नाहीं. इथं मला नवी दृष्टी मिळाली. या कामीं ठकीच मला गुरू झाली. तिच्यामुळेंच निरनिराळ्या मुलींशीं माझा स्नेह जमला. मी तिच्या घरादारापासून पाहूं लागलें, आचार विचारांचा अभ्यास करूं लागलें, त्यामुळें माझ्या बुद्धीला नवें वळण लागलें. या स्नेहसंबंधामुळेंच माझ्या आईनं मला नवा मार्ग दाखविला. पण त्याचें सर्व श्रेय ठकूलाच आहे. पुढल्या आयुष्यांत आपण कधींकाळीं भेटलों तर आपल्या आयुष्याचा मेळ घालून पाहूं. आणि तसें करण्याची संधि आम्हांला मिळो, एवढेंच मी ईश्वरापाशीं मागतें. " असें म्हणून मी खालीं बसतांच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.

आज मीं मोठी झालें आहें, विद्वान झालें आहे, पण त्या वेळचें हें भाषण वाचतांच माझें मलाच आश्चर्य वाटतें. मी त्यावेळीं नुसती आठनऊ वर्षांची होतें. आठ नऊ वर्षांच्या मुलीला एवढें मुद्देसूद भाषण कसें करतां आलें, याचें माझें मलाच आश्चर्य वाटतें. ती अंतकरणाची स्फूर्ती होती. अधिकाराच्या किंवा विद्वत्तेच्या जोरावर घडवलेला बनावटपणा त्या भाषणांत यत्किंतही नव्हता. आजही कुणाला तें भाषण आठनऊ वर्षांच्या मुलीनें सहज स्फूर्तीनें केलें असेल असें वाटणार नाहीं. पण होतें तें असें होतें. यांत बढाई नाहीं किंवा बनावटपणाही नाहीं. माझें भाषण ऐकून हेडमास्तर म्हणाले, " गोदूताई, पुढल्या आयुष्यांत तुम्ही मोठ्या व्याख्यात्या होणार यांत शंका नाहीं. थोडकंसंच खरं, पण भाषण मोठं गोड झालं. माझी खात्री पटली. मोठ्या माणसाचे पाय लहानपणीं पाळण्यांत दिसतात असं म्हणतात, तें कांहीं खोटं नव्हे. जगलों वांचलों तर तुमचं नांव वर्तमानपत्रांतून गाजलेलं प्रत्यक्ष पाहीन, अशी मला खात्री आहे. "

मास्तरांचे हे शब्द ऐकतांच माझ्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें—नव्हे मला अनावर हुंदका आला. मी ओक्साबोक्शीं रडूं लागलें. ठकी, बनी आणि यमी याही तोंड फिरवून फिरवून रडूं लागल्या. मास्तरांनींसुद्धां उपरण्यानें आपले डोळे पुसले.

हेडमास्तर माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाले, " उगी, उगी, रडूं नको. देवाची दया होईल आणि तुम्हीं साऱ्या मुली पुन्हा भेटाल. ही चार दिवसांची चूकभूल आहे. या आयुष्याच्या वादळांत फुटक्या गलबताच्या तुकड्यासारखे चार तुकडे चार बाजूला गेले तरी केव्हां तरी ते पुन्हां एकत्र येणारच. " असें म्हणून ते उपरण्यानें डोळे पुशित बाहेर निघून गेले.

आमच्या वर्गाचे मास्तर आणि दुसरे मास्तरही आधींच निघून गेले होते. ठकी, बनी, यमीच्या चेहऱ्यांकडे पहाण्याचें मला धैर्य होईना. नजरेला नजर भिडतांच एकदम हुदका येत असे. रडणें अनावर होत असे. तशा स्थितींत एकमेकींच्या हातांत हात घालून डोळे पुशित पुशित कांहींच न बोलतां आम्हीं शाळेबाहेर पडलों. पायरीजवळ मास्तर होते त्यांनीं लीव्हिंग सर्टफिकेट माझ्या हातीं दिलें.

कंपौंडच्या बाहेर जातांना पुन्हां एकदां शाळेच्या इमारतीकडे डोळे भरून पाहिलें. माझा पाय उचलेना. कितीतरी वेळ वेड्यासारखी मी त्या इमारतीकडे पहात राहिलें होतें.

शेवटीं ठकीनें दोन्हीं हातानीं धरून मला फिरविलें आणि आम्हीं चौघीही मागं चालूं लागलों.

इतर मुलींचीं पांगापांग झाली होती. तिघीही माझ्याबरोबरच येत होत्या. " तुम्हीं घरीं नाहीं का जात ? " असें त्याना विचारावें असे माझ्या मनांत आलें. पण तोंडांतून शब्दच फुटेना.

कांहींच न बोलतां आम्हीं चौघीही आमच्या घरीं आलों. मी तडक माजघरांत गेलें. त्याही माझ्या बरोबरच होत्या.

त्यांना पहाताच आई म्हणाली, " एकूण तुम्हीं आज गोदूताईला पानसुपारी केलीत वाटतं ! "

ठकी हंसण्याचा प्रयत्न करीत होती. पण तिला एकदम रडें कोसळलें.

आई एकदम पुढें झाली आणि तिला कवटाळून म्हणाली, " उगी उगी पोरी, रडूं नकोस. अग हें असंच चालायचं. अशा किती मुली येतील आणि किती जातील. कितीजणीसाठीं अशी रडणार आहेस ? "

हुंदके देत देत ठकी म्हणाली, " असं व्हायचंच नाहीं मुळीं. गोदूताईची गोष्टच वेगळी. प्राण गेला तरी तिला मी विसरणार नाहीं—"बोलतां बोलतां तिला पुन्हां हुंदक्यावर हुंदके येऊं लागले.

गोडगोड शब्द बोलून आईनें मोठया प्रेमळपणाने त्या तिघींचेही समाधान केले आणि गणू पटेवाल्याला बोलावून आणून त्याजबरोबर त्यांची रवानगी करून दिली.

त्या निघून जातांच पुन्हां मला रडण्याचा अनावर हुंदका आला. आई म्हणाली, " गोदे, कितीजणांसाठीं अशी रडणार आहेस ? आयुष्यांत पुढं हें रोजच चालायचं आहे. आज नुसती ही कांहीं दिवसांची ओळखदेख पण उद्यां जिव्हाळ्याच्या माणसांना कायम अंतरावं लागणार आहे. एक जायचा, दुसरा यायचा असं रोज चालायचं आहे. माणसाच्या आयुष्यांतल्या याच बदल्या आहेत. सरकारी नोकरांसारख्या प्रत्येक माणसाच्या आयुष्यांत अशाच बदल्या चालायच्या. त्याच्यासाठीं वरिष्ठांचे हुकूम लागत नाहींत. नवी जागा मिळाली, कीं नवा उद्योग सुरू होतो. नव्या जागीं गेलं, कीं नवे स्नेहसंबंध सुरू होतात. जुन्यांची आठवणसुद्धां रहात नाही. किती माणसांच्या अशा गांठीमेटी होणार आहेत आणि किती माणसांना विसरून जावं लाग- णार आहे, त्याची गणतीसुद्धां करतां यायची नाही. हा पहिलाच प्रसंग आहे, पहिलेंच लागेबांधे आहेत, म्हणून तुला एवढं वाईट वाटलं. पण उद्यां हें अगदीं अंगवळणीं पडून जाईल. कुठली जागा सोडतांना किंवा कुठले संबंध तोडतांना पुढं कांहींच वाईट वाटेनासं होईल ! " आईचें भाषण ऐकत असतां हळुहळू माझे उसासे आपोआप थांबले.

आई घरांत गेली आणि मीही माझ्या खोलींत विचार करीत स्वस्थ पडलें. एवढ्याशा मुलीला विचार तो कसला ! पण विचार चालला होता यांत मात्र शंका नाहीं. प्रियविरहाची पहिली जाणिव मला त्या दिवशीं झाली. कुठली कोण एक तेल्याची, एक वाण्याची, एक कारकूनाची मुलगी—पण त्यांचा विरह मला अनावर झाला. त्या पुन्हां केव्हां कशा भेटतील या विचारानें प्राण कंठाशीं येऊं लागला. मुळींच पुढें कधीं भेटल्या नाहींत तर ?

ती कल्पना मला दुःसह झाली. अगदीं भेटल्याच पाहिजेत—भेटल्याशिवाय माझा जीव रहाणार नाहीं, त्या कुठं असतील तिथून त्यांना शोधून काढून भेटेनच, कध्धीं कध्धीं त्यांना विसणार नाहीं, असें मी आपल्या मनाशीं ठरवूं लागलें.

पुन्हां आईच्या शब्दांची आठवण झाली. नव्या ओळखी जोडायच्या आहेत ! रत्नागिरीला गेल्यावर नव्या ओळखी नाहीं का व्हायच्या ? त्या

ओळखी कशा प्रकारच्या होतील ? ठकी, यमी, बनीपेक्षांही जास्त जिव्हाळ्याच्या ओळखी होतील का ? तशा ओळखी झाल्यामुळें या तिघींची आठवण बुजेल का ?

मला ती कल्पना सहन होईना. पण पुन्हां मनांत आलें, अशा ओळखी वाढणार तरी किती ? कितीजणींबद्दल असा जिव्हाळा वाटणार ? का या एवढ्याच लोमाच्या ओळखी राहाणार ? जर ओळखी वाढल्या तर त्या सर्वांची आठवण ठेवण्यासाठीं प्रयास पडणार कीं काय ? हा सगळा पसारा आवरणें अशक्य तर होणार नाहीं ना ?

हजार विचार मनांत येऊं लागले, त्यामुळें मी अगदीं कासाविस झालें. तशा स्थितींत पडल्या पडल्याच माझा डोळा लागला. जागी होऊन पहातें तों बाहेर बराच गलबला सुरू होता. दादाचे स्नेहीसोबती त्याला भेटायला आले होते. सर्वजण मारे हांसत खिदळत होते.

पुन्हां माझ्या मनांत प्रश्न उभा राहिला. मुलींच्या आणि मुलांच्या मनोवृत्तींत हा जन्मजातच फरक आहे का? दुरावण्याच्या कल्पनेनें आम्हीं मुली रडत होतों आणि हे मुलगे तर हंसतात खिदळतात ! कां ? वियोगाची कल्पना यांना दुःसहच होत नाहीं कीं काय ? कीं पुन्हां भेटायची त्यांना आपली खात्रीच आहे मुळीं ? पुन्हां भेटलों न भेटलों तरी सारखेंच असें त्यांना वाटतें का ?

मी आईपाशीं गेलें आणि तिला विचारूं लागलें, " हें असं कसं आई ? मी चिपळूण सोडून जाणार ह्मणून ठकी रडली, बनी रडली, यमीही रडली. मला माझें रडूं अनावर होत होतं. पण मुलांचें हें असं कसं ? दादा चिपळूण सोडून जाणार म्हणून कुणीच मुलगा कसा रडत नाहीं ? उलट चांगले हंसत खिदळत आहेत. त्यांना दादाच्या जाण्याबद्दल कांहींच वाटत नाहीं ! दादाही कुठं रडलेला दिसत नाहीं. तोही तसाच का ? कीं आम्हीच वेड्या ह्मणून रडतों ? कीं लहान ह्मणून रडतों ? "

आई अगदीं उदासवाण्यारीतीनें हंसली आणि ह्मणाली, "काय देऊं याचं उत्तर ! गोदे, पुरुषांत आणि बायकांत हाच भेद आहे. अगदीं लहानपणापासून हा भेद उघड उघड दिसतो. पुरुषांची वृत्ति पहिल्यापासूनच बेपर्वाईची असते. त्यांना कसलीच खिजगणति वाटत नाहीं. भेटलों कदाचित्—न भेटलों

तरी कुठं बिघडतं आहे?—हे नाहीं तर दुसरे कुणी भेटतील, असंच त्यांचं चाललेलं असतं. ह्मणूनच मला वाटतं एक बायको मेली तरी पुरुष दुसरं लग्न चटकन् करतात—पण एक नवरा मेला तर बायका मात्र जन्मभर रडत बसतात. मला वाटतं, रडणं हें आह्मां बायकांच्या कपाळीं कायमचंच टिचलेलं आहे. प्रत्येक गोष्ट आह्मी अगदीं मनाला लावून घेत असतों. त्यांचं तसं नाहीं. त्यांचा व्यवहार ज्या त्या मैदानावर चाललेला असतो. वाटेल तसं वावरायला त्यांनां मोकळीक असते. पण बायकांचं तसं नाहीं. त्यांचं राज्य चार भिंतींच्या चौकांत असतं. तेवढ्यांतच त्यांनीं असायचं, तेवढ्यांतच त्यांनीं वावरायचं, तेवढ्यांतच त्यांनीं सारा पसारा मांडायचा आणि शेवटीं त्या चार भिंतीच्या चौकाआड एक दिवस हा देह ठेवायचा. आजचा व्यवहार असा आहे. पुढं काय होईल कुणी सांगावं? कदाचित् हे दिवस बदलतील! तूं माझ्या वयाची होशील तेव्हां कदाचित् हीं बंधनें रहाणारही नाहींत आणि राहिलींच तर जी स्थिति आमची तीच तुझी होईल. पण हें तुम्हां मुलींच्या हातीं आहे. आमच्यासारख्या राहूं नका. स्वतःला घरांतच कोंडून घेऊं नका. जरा उघड्या जगाकडे पहा. उघड्या जागेंत वावरा. आह्मीं जन्माच्या दुःखी राहिलों तशा राहूं नका. तूं लहान आहेस पण आमच्या लहाणपणीं तुझ्या वयाच्या मुलींचीसुद्धां लग्नं होत होतीं. मी लग्नापर्यंत बारावर्षांची राहिलें ह्मणून आमचे शेजारीपाजारी माझ्या आईबापांनां किती टाकून बोलत असत! आज बारावर्षं झाल्याशिवाय मुलींचीं लग्नं होत नाहींशी झालीं. हेही दिवस जातील. तूं बारा वर्षांची होशील त्यावेळीं कदाचित् तुझ्या लग्नाची गोष्टही निघणार नाहीं. त्या वेळीं—"

बोलतां बोलतां आई मध्येंच थांबली आणि आपल्याशींच बोलल्यासारखें करून ह्मणाली, "काय वेडी मी! एवढ्याशा पोरीसमोर कसलं हें चऱ्हाट वळतें आहें! चल गोदे, कपडे बदल. आज मुन्सफांच्या घरीं जेवायला जायचं आहे." असें ह्मणून आई झटकन् निघून गेली.

माझ्या मनांतले विचार तिथल्या तिथेंच थिजले. मुन्सफांच्या घरीं जायचा—अगदीं शेवटच्या दिवशीं कां होईना—पण योग येणार, याचाच मला आनंद झाला. संधि आली आणि ती मी साधूनही घेतली.

---

*

# प्रकरण ११ वें

# आजीबाईची हजामत.

आम्ही मुन्सफांच्या घरीं गेलों, त्यावेळीं तेथें सर्वच मंडळीचीं गडबड उडाली होती. खरें पाहिलें असतां मी आईबरोबर आंत घरांत गेलें पाहिजे होतें. पण माझ्या संवयीप्रमाणें मी सरळ बाबाबरोबर पुरुष मंडळींत जाऊन बसलें.

दिवाणखान्यांत गांवांतील बरीच प्रतिष्ठित मंडळी गोळा झाली होती. त्यांत वकील लोक प्रामुख्यानें होते. व्यापारी आणि मास्तर मंडळी इतर गांवच्या सभ्य गृहस्थांबरोबर आपापल्या अदबीनें एका बाजूला बसले होते. दिवाणखान्याच्या पलिकडल्या खोलींत मुलें गोळा झालीं होतीं. त्यांत अर्थातच आमचा दादाही होता. तो आमच्या आधींच आला होता.

आम्ही दिवाणखान्यांत आलों त्यावेळीं जमलेली मंडळी आपापसांत मोठमोठ्यानें बोलत होती. आम्ही येतांच सर्व मंडळी उठून उभी राहिली आणि आम्ही बसतांच सर्व मंडळी खालीं बसली. त्यांच्या या वर्तनाचें मला हंसूं आलें.

आम्ही खालीं बसतांच सर्व मंडळींत पुन्हां बोलणी सुरू झालीं. पण ती नुसती कुजबुज होती. दोघेही रावसाहेब मात्र मोठमोठ्यानें बोलत होते.

मुन्सफसाहेब पूर्वी कांहीं दिवस रत्नागिरीस असल्यामुळें त्यांनीं आपल्या अनुभवाचा फायदा आमच्या बाबांना द्यावयास सुरवात केली. रत्नागिरीचें हवापाणी, राहाण्याचे बंगले, संध्याकाळीं फिरायला जाण्याचीं ठिकाणें, तिथल्या लोकांची सर्वसाधारण वृत्ती वगैरे विषयांवर ते सारखे चऱ्हाट वळीत होते. ते पाजीत असलेलें बोधामृत बाबा अगदीं भिमेपणानें आपल्या अंतःकरणांत सांठवीत होते.

अधिकारी माणसाची ही साहजिक प्रवृत्ति असते. कोणत्याही जागीं कोणताही अधिकारी पहिल्यानें पाऊल ठेवतो, त्यावेळीं त्याच्या अंतःकरणांत तें स्थळ आणि तेथील लोक यांच्याविषयीं आधींपासूनच अशा रीतीनें कलुषित-

पणा उद्भवलेला असतो. ज्या गांवांतून जायचें त्या गांवांतील लोक आधींच त्या दुसऱ्या गांवाविषयीं त्या अधिकाऱ्यांचीं मतें बनविण्याचा प्रयत्न करतात. त्या गांवीं प्रत्यक्ष गेल्यावर चार्ज सोडून जाणारा अधिकारी चार्ज घेणाऱ्या अधिकाऱ्यावर स्वानुभवाचीं मतें लादायला चुकत नाहीं. यानंतर त्या अधिकाऱ्याचे स्वतःचे अनुभव सर्व प्रकारच्या आणि सर्व बाजूनें मिळालेल्या अशा पूर्वग्रहांनीं दूषित होऊन नंतर तो अधिकारी आपला कारभार चालवीत असतो. म्हणूनच प्रत्येक जाणाऱ्या अधिकाऱ्याला माहितगार अधिकाऱ्यानें कांहीं ना कांहीं तरी माहिती दिलीच पाहिजे, असा जो एक अधिकारी सांप्रदाय आहे त्याला अनुसरून मुन्सफसाहेब आमच्या बाबांना आपल्या संग्रहांतलें बोधामृत पाजीत होते.

दोन रावसाहेबांचा हा संवाद चालला असतांना इतर मंडळी अगदींच स्वस्थ बसून राहिली नव्हती. जरी कांहीं जण—विशेषतः मास्तर लोक—हें भाषण अगदीं भाविकपणें ऐकत होते, तरीही बाकीचे लोक निराळ्याच व्यवसायांत गुंतले होते.

मी येऊन बाबांजवळ बसलें होतें, ही गोष्ट सर्वांच्या डोळ्यांत सलत होती. आधीच माझ्याबद्दल सर्वत्र बोभाटा झालेला, त्यांतून उद्धटपणानें मी पुरुष मंडळींत बसल्याचें प्रत्यक्ष दिसलेलें पाहून माझ्याकडे नेत्रविक्षेप करीत प्रत्येक जण माझ्याविषयीं कांहीं ना कांहीं तरी बोलत होते.

मला असें नुसतें वाटतच होतें असें नाहीं किंवा हा माझा नुसता संशयच होता असें नाहीं. साधारण ऐकण्याच्या टापूंत असलेल्या एका वकिलसाहेबांनीं मला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें म्हटलें, " पाहिलंत गणपतराव, हीच ती रावसाहेबांची प्रख्यात मुलगी. रावसाहेबांना एक मुलगा आहे. चांगला इंग्रजी शाळेंत जाण्याइतका मोठा आहे. पण तो कांहीं इथं येऊन बसला नाहीं. आपल्या शिस्तीप्रमाणें तिकडे पलिकडच्या खोलींत आपल्या शाळासोबत्यांबरोबर बसला आहे. पण ही पहा, मुद्दाम होऊन इथं आली. पुरुषांच्या बैठकींत काय जरुर होती या मुलीनं येण्याची? पण नाहीं—शहाणपणा दाखवला पाहिजे आहे ना? म्हणून मुद्दाम इथं येऊन बसली. रावसाहेबांनाही अशा वागण्याचं कांहीं वाटत नाहीं. आज चढवून ठेवताहेत, पण उद्यां कुणा तरी बिचाऱ्याला डोईजड होऊन बसेल! "

माझ्यानें रहावेना. मी त्या वकिलाकडे वळलें आणि म्हटलें, "तो बिचार कुणीही असला, तरी तुम्ही असणार नाहीं किंवा तुमचा मुलगाही असणार नाहीं."

माझ्या अनपेक्षित उत्तरानें वकीलसाहेब जरा चमकले, पण आपली फजिती उडवून देण्यासाठीं मोठमोठ्यानें हंसले. आजूबाजूची मंडळीही आपापल्या दर्जाप्रमाणें हळू किंवा मोठ्यानें हंसली. ती वकीलसाहेबांची फजिती झाला म्हणून त्यांना हंसली, कीं माझ्या फाजीलपणाबद्दल मला हंसली, हें कुणालाच सांगतां आलें नसतें.

मात्र या हंसण्यामुळें बाबांचें लक्ष तिकडे वेधलें. त्यांनीं प्रश्न करतांच वकिलसाहेबांनीं हस्तीदंतो उत्तर दिलें, " कांहीं विशेष नाहीं. थोडीशी गोदूबाईची थट्टा केली. "

पुन्हां माझ्यानें राहवेना. ताडकन् उत्तर देण्याची आलेली उकळी दाबून मी कुत्सितपणानें उद्गारलें " असं का ! ती थट्टा होती का ! रावसाहेबांनीं मुलीला आज डोक्यावर चढवून ठेवली आहे पण उद्यां ती कुणातरी बिचाऱ्याला डोईजड होईल, असं म्हणणं म्हणजे थट्टा का ! हो कुठल्या गांवची थट्टा ! ही चिपळुणीथट्टा की वकिलीथट्टा ! "

बाबांनीं सर्व गोष्टी हंसण्यावारी नेल्या. ते म्हणाले, "तुला समजायचं नाहीं गोदे ! ही थट्टा चिपळूणी नव्हे आणि वकिलीहि नव्हे; हा सभ्य माणसांचा विनोद आहे. हा काव्यशास्त्रविनोद आहे. ही बुद्धिमंतांची करमणूक आहे. "

मोठमोठे शब्द वापरून बाबा माझें तोंड बंद करीत आहेत हें मला कळून चुकलें. पण एकंदर प्रसंगामुळें वकिलसाहेब गार झाल्याचें पाहून मीही थोडी माघार घेतली.

पुन्हां गोष्टी सुरू झाल्या. व्यापारी मंडळी व्यापारी दृष्टीनें, वकिल लोक वकिली दृष्टीनें, गांवकरी लोक कोर्टबाजीच्या दृष्टीनें, आणि मास्तर लोक आपल्या नित्याच्या संकुचित दृष्टीनें रत्नागिरी गांवाबद्दल चर्चा करीत होते. मध्यें तोंड न घालता बाबा शांतपणें सर्वांचीं भाषणें ऐकून घेत होते.

इतर मंडळी मात्र एकमेकांच्या भाषणाला परोपरीनें दुजोरा किंवा विरोध करीत होती. सर्वांच्या भाषणाचा माझ्या मनाशीं मी पडताळा घालून पाहिला त्यावेळीं मला असें दिसून येत होतें, कीं कुणाचेंच मत कुणाशींच जमलें नाहीं. या सर्व भाषणांपासून बाबांना काय फायदा होणार होता याचा मला मुळींच अंदाज झाला नाहीं.

माझ्या वयाच्या मानानें या गोष्टींवर मत देण्यास जरी मी पूर्णपणें समर्थ नव्हतें, तरीही मला एवढें वाटलें, कीं या नुसत्या शिळोप्याच्या गप्पा होत्या. जेवणाच्या पंक्तीला वेळ होता, तोपर्यंत कसातरी वेळ काढला पाहिजे म्हणून प्रत्येकजण जें कांही तोंडाला येईल तें बोलत होता. परगांवीं 'प्रांतसाहेब' होऊन जाणाऱ्या माझ्या बाबांना कांहींना कांहीं तरी आपल्या अनुभवाचा फायदा द्यावा, बदली झालेल्या मामलेदारावर आपण अंशतः तरी उपकार केल्याचें श्रेय मिळवावें, ह्या दांभिक वृत्तीनेंच प्रत्येकजण आपले शब्द खर्ची घालीत होता.

शेवटीं एकदांची जेवणाची वर्दी आली. सर्व मंडळी भराभर कपडे काढूं लागली आणि प्रत्येकजण आळीपाळीनें अंगणांतील सहाण्यावर हातपाय धुऊं लागला.

मी खालीं माजघरांत गेलें त्यावेळीं आईनें मला बोलावून घेतलें. जागेच्या आकुंचितपणामुळें पुरुषांची पंगत पहिल्याने होणार होती. त्यांतून पंक्तिप्रपंच. आधींच जागा आकुंचित, त्यांत निरनिराळ्या जातींच्या निरनिराळ्या पंक्ती पाडलेल्या ! त्यामुळें कारण नसतांना उगीच अडचण झाली होती. मुलांच्या पंक्तींतही हा पंक्तिप्रपंच टळला नव्हता.

या पंक्तिप्रपंचाबद्दल कुणालाच कांहीं वाटत नव्हतें, याचें मला आज आश्चर्य वाटतें. जो तो आपआपल्यापरीनें आपल्या पक्तींत बसायला खूष होता. 'सर्वांनी एकच पंक्तीला कां बसूं नये ?' असा प्रश्न करण्याचें किंवा अशीं सत्ता गाजविण्याचें कुणीही मनांत आणलें नाहीं.

हे माझे आजचे विचार आहेत. त्यावेळीं मलाही या पंक्तिप्रपंचाबद्दल कांहीं वाटलें नाहीं.

पुरुषांचीं जेवणें होईपर्यंत मी आईबरोबर आजोबाईच्या खोलींत जाऊन बसलें. आजीबाई ह्मणजे मुन्सफसाहेबांची आई.

तिथें बऱ्याच बायका गोळा झाल्या होत्या. माझ्या आईचा आणि त्यांचा आधींचा परिचय झालेला असावा ! पुरुष मंडळींत जरी कारकून किंवा व्यापारी लोक आले होते, तरी आमंत्रित बायकांत पंक्तिप्रपंचाचें प्राबल्य विशेषानें दिसून येत होतें. गणू पट्टेवाल्याची बायको किंवा नागू तेल्याची बायको यांची गोष्ट तर दूरच राहो, पण बनीच्या सावत्र आईला—एका यःकश्चित कारकूनाच्या बायकोलासुद्धां आमंत्रण देण्यांत आलें नव्हतें. वकिलांच्या आणि व्यापाऱ्यांच्या

बायकाच—त्यांतूनही विशेषतः ब्राह्मण वर्गांतल्या बायका तेवढ्याच गोळा झाल्या होत्या—म्हणजे आमंत्रण दिल्यावरून आल्या होत्या.

मला पहातांच आजीबाईनीं माझ्या आईला विचारलें, " हीच वाटतं ती तुमची मुलगी ! "

आईनें खाचून उत्तर दिलें, " ती माझी मुलगी म्हणजे ! "

पेन्शन घेतलेल्या अर्ध्या दांतानें शोभायमान दिसणारें तोंड आकर्ण वांसून आजीबाई म्हणाल्या, " ती म्हणजे तीच. सारं गांव जिच्याबद्दल बोलत असतं ती ! आतां काय म्हणावं तुम्हाला ? आम्हां म्हाताऱ्यांना राहावत नाहीं म्हणून बोलतें, या मुलीचं आतां पुढं कसं होणार ! तुम्ही आतां रत्नागिरीला जातां आहांत. तिथं चिपळूणसारखी कांहीं परिस्थिती नाहीं. मोठमोठीं माणसं आहेत. कलेक्टर आहेत—तेही म्हणे ब्राह्मणच आहेत. जज्ज आहेत. तुमच्यासारखेच आणखी दोन प्रांत साहेब आहेत. इंग्रजी शाळांचे मास्तर आहेत. वकिल तर शेंकड्यानं आहेत ! डिष्ट्रिक्टाचं ठाणं तें, तिथं ही मुलगी आतां जाणार आणि इथल्या सारखेंच गूण पाघळूं लागली तर पुढं काय होणार तें दिसतंच आहे!"

मी चटकन विचारलें, " काय होणार आहे पुढं ? "

" आतां काय म्हणावं या पोरीला ? " आजीबाई आश्चर्यचकित होऊन म्हणाल्या, " एकदम मला विचारते ! पोरीच्या जातीला हें शोभत नाहीं ! "

" तर मग कुठल्या जातीला शोभतं ? " मी विचारलें, " मुलांच्या जातीला शोभतं कां ! पण तीं मुळीं प्रश्नच विचारीत नाहींत ! सारे अभ्यासांत चूर झालेले !—"

" सुनबाईनीं म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं ! " आजीबाई स्तंभित होऊन उद्गारल्या. " ही मुलगी नव्हे, म्हसोबा आहे !—"

असें म्हणून आजीबाईनें रत्नागिरीच्या गोष्टींना सुरवात केली. आजीबाईच्या गोष्टी म्हणजे वर दिवाणखान्यांत झालेल्या पुरुषांच्या भाषणांची बायकी आवृत्तीच होती. मला त्या पुनरावृत्तीचा कंटाळा आला. पुरुषांचीं जेवणें सुरू होतीं. मला वाटलें, बुद्धिपुरःसरच मला त्या पंक्तीला बसू दिलें नव्हतें. मी बाबांच्या बरोबर आलें होतें, बाबांच्या बरोबरच दिवाणखान्यांत बसलें होतें. त्या अर्थीं बाबांच्या बरोबरच मला बसूं देणें सकृद्दर्शनी योग्य होतें. पण ज्या-अर्थीं माझ्या आईच्याकरवीं मला मुद्दाम बायका मंडळींत ओढून न्यावयास लावलें, त्याअर्थीं मलाही त्याची चीड आली.

आजीबाईंची टकळी सुरू होती, पण कोणत्या मार्गानें कुचाळी काढावी याचा मी विचार करीत असल्यामुळें त्यांचें भाषण माझ्या कानीं आलें नाहीं. शेवटी एकदांची मला कल्पना आली.

मी आजीबाईंना ह्मटलें, " काय हो आजीबाई, तुह्मांला एकादी मुलगी होतीं का ? "

आजीबाईनीं हंसत हंसत उत्तर दिलें, " होती. नव्हे अजूनही दोनतीन आहेत—दोन गेल्या–आतां दोन आहेत पण त्या साऱ्या मुलींना जग वाखाणीत असे, अजूनही वाखाणतं आहे. माझी शिस्तच तशी कडक होती–"

" त्यावेळीं तुह्मी अशाच होतां का ! " मी विचारलें.

" अशाच ! " आजीबाई आश्चर्यचकित होऊन ह्मणाल्या, " अशाच ह्मणजे कशा ? "

मी एक क्षणभरच थांबून मनाचा हिय्या केला आणि ह्मटलें, " या अशा हजामत केलेल्या ! "

एकदम मोठ्यानें ओरडून आजीबाई ह्मणाल्या, " काय ह्मटलंस पोरी ? तोंड आहे कीं तोबरा आहे ! ही तुमची शिस्त ! मामलेदारीणबाई, ही तुमची शिस्त ! अशानं काय होणार पुढं या पोरीचं ? "

माझा धीर चेपला होता. मी ह्मटलें, " काय बेशिस्त बोललें मी ! "

" बेशिस्त काय ? बेशिस्त काय ? " आजीबाई खेंकसून ओरडल्या. जमलेली बायका मण्डळी हंसावं कीं रडावं कीं गंभीर व्हावं याचा मनाशीं विचार करीत होतीं. माझ्या प्रश्नानें त्यांना हंसू आलें यांत शंका नाहीं. पण मुन्सफसाहेबांच्या आईला तसलें वर्तन आवडलें नसतें या भीतीनें प्रत्येकजण गंभीरपणाचाच भाव आणीत होती.

आजीबाई संतापून बोलूं लागली " काय शब्द बोलते ही कारटी ! हिला कुणी भाषाच शिकवली नाहीं कां ? सोंवळी झालेली ह्मणतां येत नव्हतं का ! तर काय शब्द उच्चारते !—"

" हजामत ! " मी चटकन् म्हटलें.

" पुन्हां तोच शब्द म्हटते ! आग लागो त्या जिभेला ! पुन्हां तोच शब्द म्हणते ही ! "

" काय बिघडलं त्यांत ! बाबा अशीच हजामत करून घेतात. त्यावेळीं ' बाबा हजामत करून अंघोळीला गेले ' असं म्हटलं तर कुणीच कांहीं बोलत

नाहीं! कुणालाच कांहीं वाईट वाटत नाहीं! मुकटा न नेसणारा ओवळा आणि नेसणारा सोंवळा, असंच म्हणायचा आपला प्रघात आहे. हजामत करून कांहीं कुणी सोंवळा होत नाहीं. मग तुम्हालाच सोंवळी कां म्हणायचं?"

मुलीचा विषय तसाच राहून भलत्या विषयाला तोंड लागलें.

" आतां तुम्हीच सांगा आपल्या मुलीला! चांगलं शेण घाला तोंडांत!" आजीबाई चवताळून म्हणाल्या.

" आतां उगी रहा पाहूं गोदे?" आई गंभीरपणें म्हणाली.

मी म्हटलें, " कां उगी रहायचं? त्यांत काय चुकलं माझं? बाबा हजामत करतात त्यावेळीं आपण तसें म्हणतों आणि आजीबाईच्या हजामतीला मात्र हजामत कां म्हणायचं नाहीं? मुकटा नेसून सोंवळ होणं आणि वस्तारा फिरवून सोंवळीं होणं, यांचा एकमेकांशीं संबंध काय?"

आजीबाईचा राग इतका भडकला कीं त्या सरशीं, " असल्या पोरीचं तोंडही पाहूं नये!' असें म्हणून त्या निघून गेल्या. आई कांहींच न बोलता स्वस्थ बसली होती. जमलेल्या सर्व बायका ओशाळल्यासारख्या झाल्या होत्या.

असें कां झालें याची मला कल्पनाच होईना. सारी बैठक विस्कटून गेली. पुरुष मंडळीच्या पंक्तींत हंसणें खिदळणें सुरू होतें. त्यांची पंगत उठली, सर्व मंडळी आंचवून वरच्या दिवाणखान्यांत गेली, बायकांची पंगत बसली, पंगत उठली, पण सर्वत्र अगदी सामसूम झालें होतें. कुणी कुणाशीं काहीं बोलत नव्हतें. साऱ्या पंक्तीवर एक प्रकारची अवकळा आली होती.

घरीं गेल्यावर मी आईला विचारलें, " आई, माझं काय चुकलं? पुरुषांच्या हजामतीला हजामत म्हणतात, तर बायकांच्या हजामतीला हजामत कां म्हणूं नये?"

आईनें स्तब्धपणानें उत्तर दिलें, " वास्तविक कांहींच चुकलं नाहीं—पण शिष्टाचार चुकला! शिष्टाचार म्हणजे काय—शिष्टाचार म्हणजे लबाडी का? दांभिकपणा का? पोरी, पुन्हा माझी फजिती झाली. तुझ्या या दुसऱ्या प्रश्नाचेंही मला उत्तर देतां येत नाहीं."

मला वाटलं, "मी कुणीतरी आहें." पोरकटपणाचें तें समाधान अद्वितीय होतें.

---

## प्रकरण १२ वें

# नवा मित्रलाभ.

आम्ही चिपळूण सोडलें. चिपळूण सोडतांना माझ्या मैत्रिणींचे निरोप घेणें मला दु:सह झालें. आपण पुन्हां भेटणार कीं नाहीं, ही एकच कल्पना मनांत येई. अंत:करणाचे संबंध इतके जिव्हाळ्याचे झाले होते, कीं 'पुन्हां भेट होणार नाहीं' असें कुणी थट्टेनें जरी म्हटलें असतें, तरी त्याचा माझ्या मनाला धक्का बसला असता.

त्यांतून ठकीच्या भेटीबद्दल मी फार आतुर होतें. इतर कुणी भेटो वा न भेटो, पण ठकी मात्र भेटलीच पाहिजे असें मनाला वाटत होतें. 'आतां भेट होईल कीं नाहीं देव जाणे' असें या मैत्रिणींपैकीं कुणी म्हटलें म्हणजे माझ्या हृदयाला बाण लागल्यासारखें होई.

सामानसुमान गाडीरस्त्यानें पाठवून दिलें होतें आणि आम्ही आगबोटीनें जात होतों. चिपळूणहून रत्नागिरीला जायचें, म्हणजे धाकट्या बोटींत बसून पहिल्यानें दाभोळला जावें लागतें. या बोटीची येण्याजाण्याची वेळ खाडीच्या भरती ओहोटीवर अवलंबून असते. त्याला 'सभा' असें म्हणतात.

सभ्यावर बोट निघाली आणि आम्ही दाभोळला गेलों. योगायोगानें सभ्याची वेळ पुढल्या मोठ्या बोटीला जोडून असल्यामुळें दाभोळ येथें आमची फारशी खोटी झाली नाहीं.

आम्ही बोटींत बसलेली वेळ रात्रीची होती. आम्ही सेकंड क्लासांत बसलों होतों. आठवणींत रहाण्याजोगा बोटीच्या प्रवासाचा हा माझा पहिलाच दिवस होता. यापूर्वीं बोटीचा प्रवास कदाचित घडला असेल पण त्याची पुसट कल्पनासुद्धां माझ्या ध्यानांत नव्हती.

या वेळेपासून मात्र पुढल्या सगळ्या प्रवासांच्या हकिकती तपशीलवार माझ्या ध्यानांत आहेत. बोटींत चढतांच शिपायानें बिछाने टाकले होते. बोट जरी फारशी हालत नव्हती, तरी जेवढें डोलणें सुरू होतें, तेवढेंच बाबांना असह्य होत होतें. मला त्याची उलट गंमतच वाटली. आई बिछान्यावर

आडवी झाली होती, पण तिला बोट लागण्याचें भय वाटत नव्हतें. दादाची स्थिती मात्र बाबांच्यापेक्षांही वाईट होती. बोटींत पाऊल ठेवल्यापासून त्याचें ओकणें सुरू झालें होतें. तें दिसून येत असल्यामुळें मला क्वचित मळमळूं लागे, पण त्यांत कांहीं भीति नव्हती.

मी बिछान्यावर बराच वेळ बसून राहिलें होतें. सुटत असलेल्या बंदराची शोभा मला मोठी आकर्षक वाटत होती. बोट बाहेर समुद्रांत गेली असें पाहून आई म्हणाली, "आतां झोंप पाहूं! आतां पहाण्याजोगं कांहीं नाहीं. बंदर मागं पडलं."

आईच्या या उद्गारांनीं मला उगीच मळमळून आलें. मी ओक्साबोक्शीं रडूं लागलें. आतां यापुढें चिपळूण दृष्टीला पडणार नाहीं, मैत्रिणींची पुन्हां भेट होणार नाहीं, या जाणिवेनें माझी तशी स्थिती झाली होती. आईनें विचारलें तेव्हां मीं तिला रडत रडत तसेंच सांगितलें.

आई म्हणाली, " आतां हें चालायचंच. रडण्यांत काय अर्थ आहे? पुन्हांपासून मन घट्ट करायला शिकलं पाहिजे. आला दिवस पुढं गेला, मागला मागंच राहिला. असं हें व्हायचंच! पण गेल्या दिवसाची आठवण मात्र विसरतां कामा नये. चिपळूण सुटलं म्हणून रडायचं नाहीं खरं, पण चिपळूणची आठवण मात्र विसरूं नकोस. चिपळूणचे लोक कांहीं तुला विसरणार नाहींत. उद्यां आपल्या पोराबाळांना देखील ते तुझ्या गोष्टी सांगतील, इतकं तुझं रामायण तिथं झालं आहे. त्यांतून मुन्सफांची आई तर तुला कल्पांतींही विसरणार नाहीं—"

असें म्हणून आई क्षणभर थांबली. माझें रडेंही तितक्यांत थांबलें होतें. बाबांना झोंप लागली होती. दादा ओकून ओकून निपचित पडला होता. दोघांकडे नजर टाकून आई म्हणाली, " मनांत आलं ते बोलून टाकावंसं वाटतं म्हणून बोलतें आहें. त्या दिवशीं तूं मुन्सफांच्या आईला जें बोललीस, ते जरी खरं होतं, तरी तसं बोलायला नको होतं. त्या वेळीं मीं तुझा पाणउतारा केला नाहीं, पण आतां सांगतें. बोलण्याला धाक आला पाहिजे. खरं असलं, तरी किती बोलावं आणि कुठं बोलावें याचा पडताळा पाहिला पाहिजे—"

मीं चटकन म्हटलं, " कां? खरं तें केव्हांहीं खरंच आहे. मग तें बोलून कां दाखवूं नये?"

आई म्हणाली " तेंही खरंच आहे. पण पहिला प्रश्न शिष्टाचाराचा येतो. शिष्टाचार म्हणजे दांभिकपणाखेरीज दुसरें कांहीं नाहीं, हें मलाही पटतें— त्यांतूनही काळ वेळ पहावा लागतो. गोष्ट खरी कां असेना, पण ती आपण बोलून दाखविली तर तिचा कांहीं उपयोग झाला पाहिजे. तोंडांतले शब्द नुसते वाऱ्यावर सोडण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुझ्या उद्गारांचा आजीबाईच्या मनावर तुला किंवा मला पाहिजे तसा परिणाम केव्हांही व्हायचा नाहीं. त्यांचीं मतं अगदीं ठाम झालेली आहेत. बनीच्या ताईला तूं तसं विचारलं असतंस तर ती रडली असती पण आजीबाई चवताळल्या. त्याला कारण एकच ! दोघांवर दोन प्रकारचे परिणाम होतात. म्हणून कुणाजवळ काय बोलायचं याचं थोडं तारतम्य पाहिलं पाहिजे. नाहींतर नुसतं वाचचळ भाषण करण्याची संवय लागत जाईल. आपल्या शब्दाला किंमत आहे, आणि त्या किंमतीचा मोबदला मिळाला पाहिजे, हें ध्यानांत ठेवावं लागतं—"

आईच्या भाषणानें मला अगदीं ओशाळल्यासारखें वाटलें. आई बोलत असतांना मध्येंच थांबली होती, तितक्यांत मीं मनाशीं विचार करून पाहिला. आईच्या म्हणण्यांत खरोखरच तथ्य होतें. मी वाटेल तें बोलत असें व त्यांचें कौतुक होत असे, म्हणून माझ्या भाषणाचा ताळ सुटत चालला होता कीं काय, असा प्रश्न माझ्या मनांतही उभा राहिला.

आई पुन्हां बोलूं लागली, " चिपळुणांत एक मोठं उत्तम झालं ! ठकीची व तुझी दोस्ती जमली. तुझ्या आयुष्यांतला तो महत्त्वाचा दिवस होता. तुझ्या अंतःकरणांत त्या दिवसापासून माणुसकी जागी झाली. जगाकडे पहावं असं तुला वाटूं लागलं. तुझ्या दादासारखी तूं स्वतःवरच खूष होऊन राहिली नाहींस. या माणुसकीचा उपयोग केला पाहिजे. माणुसकीच्या दृष्टीनें गोड-बोल्यांना दिलेलीं उत्तरें अनाठायीं नव्हतीं, पण आजीबाईविषयीं काढलेला उद्गार माणुसकीच्या दृष्टीनं निर्दयपणाचा होता. तिचा बिचारीचा काय अप-राध ? रूढाचाराप्रमाणं ती सोंवळी झाली होती, तिच्या त्या सोंवळेपणाला तूं हजामत म्हटलंस, हें तिच्या मनाला लागलं. तिच्या अंतःकरणांत कुठं तरी अशी जाणीव असेल, कीं हा अन्याय आहे ! पण त्याला उपाय नाहीं. तें बोलणं दुःखावर डागण्या देण्यासारखं झालं. बोलतांना हा विचार

केला पाहिजे. वाणी तिखट असली तरी विषारी असूं नये. गोडबोल्यांना तूं विचारलंस, त्या वेळीं त्या प्रश्नांत नुसता चौकसपणा होता पण आजीबाईला जें बोललीस त्यांत विषारीपणाचा अंश होता. मुद्दाम होऊन खुचपट काढावें आणि तिचा पाणउतारा करावा अशा रीतीनें बोललीस. चौकसपणा असावा, पण त्यांत द्वेषमत्सराचा लवलेशही नसावा. आतां डोळे मीट आणि मी काय बोललें याचा विचार करीत झोंपीं जा." असें म्हणून आईनें डोक्यावर पांवरूण ओढलें.

मी खरोखरीच विचार करीत झोपीं गेलें. मला वाटत होतें, कीं आईचें भाषण मीं पुन्हां पुन्हां आठवतें आहें. पण त्याच वेळीं झोंपेची झांपड डोळ्यांवर येत होती.

मीं जागी झालें त्या वेळीं रत्नागिरी बंदर आलें होतें. मधें जयगड बंदर केव्हां येऊन गेलें तें झोंपेंत मला कळलें नाहीं.

सामानसुमानाची आवराआवर सुरू झाली होती. माझा बिछाना बांधायचा असल्यामुळें मी उठून कठड्याशीं आलें.

बंदरात बोट बरीच हालत होती. रत्नागिरी बंदरांत समुद्र शांत असला तरी बोट अशीच हालते. मला त्याची गंमत वाटत होती. पण दादाला मात्र डोकें वर करणें अशक्य झालें होतें.

दूर अंतरावरून किनाऱ्यावरील दिवे दिसत होते. बंदरांत असलेल्या गलबतावरचे दिवेही सारखे डोलत होते. बोटीजवळ येत असलेल्या पडावांचा आवाज पहांटेच्या त्या शांत वेळीं कानाला मोठा गोड लागत होता.

पडाव बोटीशीं आले, तरी लाटांच्या हेलकाव्यानें क्षणोक्षणीं बोटीपासून दूर जात होते. त्यामुळें वर चढत असलेल्या आंतल्या उतारूंची त्रेधा उडत होती.

रत्नागिरीच्या पडावांवरच्या खलाशांची हुषारीबद्दल फार प्रख्याती आहे. त्यांच्या हातून असल्या त्या द्वाड बंदरांत देखील कधींच अपघात झाला नाहीं. त्यांनीं आम्हाला संभाळून खालीं उतरून घेतलें. दादाला उतरतांना मला मोठी गंमत वाटली. खांद्यावर घोंगडी टाकतात तशा रीतीनं त्याला खांद्यावर घेऊन एका खलाशानें मागें पुढें होणाऱ्या पडावात त्याला

कसें आणि केव्हां उतरलें हें कळूनसुद्धां आलें नाहीं. वेळ रात्रीची असल्या-मुळें कसलाच अंदाज लागत नव्हता.

या पडावांतून त्या पडावांत जात जात तिसऱ्या एका लहान पडावांत आम्हांला जावें लागलें. एवढे मोठे पडाव असतांना आम्ही त्या लहानशा होडींत जाऊन बसलों, याचें कारण मला मागाहून कळलें. ती कस्टम खात्याची होडी होती. तसल्या इतर होडीला ' जॉली बोट ' असें म्हणतात पण या कस्टम खात्याच्या बोटीला मात्र ' छबिना ' असें म्हणतात.

आम्ही छबिन्यांत बसून इतर पडाव सुटण्यापूर्वीच निघालों. इतर पडावां-तील लोक आमच्याकडे मोठ्या मत्सरानें पहात होते. या छबिन्यांतून जाणें हा मोठा मान आहे. बोटीवरची तपासणी करण्यासाठी जो कस्टम खात्याचा अधिकारी बोटीवर रोज येत असतो त्याच्या साठीं जरी हा छबिना आहे, तरीही जिल्ह्याचे लहान मोठे अधिकारी याच छबिन्यावर आपली सत्ता गाजव-तात. मोठेपणाचा धडा पहिल्यानें या छबिन्यांत पाय टाकून मिळत असतो. इतर लोकांसारखे आम्ही नाहीं, आम्ही कुणीतरी विशेष आहोंत, सर्वांच्या पूर्वी बंदरावर जाऊन पोहोंचण्याचा आमचा अधिकार आहे, हें दाखवण्यासाठींच जिल्ह्याचे अधिकारी या छबिन्यांतून जात असतात, किंवा त्यांना तसें नेण्यांत येत असतें. आपल्याबरोबर बोटांतून आलेली बाकीची मंडळी मागेंच राहिली असतां आपण तेवढें शिष्टासारखें एकटेंच पुढें यावें, हें माझ्या पोर बुद्धीला कसेंसेंच वाटलें.

पण त्याला इलाज नव्हता. हा जिल्ह्याचा शिष्टाचार होता. आम्ही प्रांत-साहेब होतों, आणि त्या शिष्टाचाराला अनुसरून हा पंक्तिप्रपंच करणें आम्हांला भाग होतें. बोटीवरून उतरतांच आम्ही आमच्या बंगल्यांत गेलों नाहीं. बाबांचे एक मित्र गांवांत वकील होते, त्यांच्या घरींच आम्ही चारपांच दिवस राहिलों. पूर्वीच्या प्रांतसाहेबांनीं बंगला खालीं केला नव्हता. शिष्टाचाराप्रमाणें आम्ही बंगल्यांतच रहाणार होतों, म्हणून अशी ही व्यवस्था करावी लागली होती.

उजाडल्यापासून किती तरी मंडळी बाबांना भेटायला येत होती. पहिली येणारी मंडळी त्यांच्या आफिसांतलीच होती. त्यानंतर पूर्वीचे प्रांतसाहेब,

गांवचे कांहीं वकील, हायस्कूलचे कांहीं मास्तर वगैरे मंडळी प्रामुख्यानें होती. बाबांना उसासा टाकायलाही फुरसत मिळत नव्हती. जुने प्रांतसाहेब आणि आमचे बाबा यांच्यांत जरी कांहीं भेद नव्हता, तरी सर्वांची तारांबळ बाबांना खूष करण्यासाठीं खर्ची पडत होती. बाबा अधिकारारूढ होणार होते, आणि ते अधिकारावरून उतरणार होते. पूर्वीच्या सर्व शिपायांचा घोळका आमच्या भोंवतीं घोंटाळत होता.

हीच स्थिति मी चिपळूणला पाहिली होती. त्यावेळीं आमचें सामान-सुमानसुद्धां बांधण्याची गैरसोय झाली होती. अशीच गैरसोय आज या जावक-नंबर प्रांतसाहेबांची होत होती. " कसेंही करून तुमचे शिपाई आज सामान बांधण्यासाठीं पाठवून द्या, " असा शेवटीं त्यांच्याकडून बाबांकडे निरोप आला. चिपळूणहून निघतांना आम्हांलाही असाच निरोप नवीन आलेल्या मामलेदाराना पाठवावा लागला होता.

मला या गोष्टीचें फार आश्चर्य वाटलें. हा अगदीं एक ठराविक विधि आहे कीं काय, असा प्रश्न माझ्या मनांत आला. अगदीं ठरल्याप्रमाणें प्रत्येक बदली होणाऱ्याच्या बाबतींत असेच अनुभव येतात, असें मला नंतर आईनें सांगितलें.

आम्ही एकदांचे आमच्या बंगल्यांत गेलों त्या वेळीं आम्हांला हायसें वाटलें. दुसऱ्याच्या घरीं रहाण्याची संवय नसल्यामुळें या चार पांच दिवसांत मला पदोपदीं संकोच वाटत होता. म्हणूनच बंगल्यांत येतांच माझा जीव खालीं पडला.

आमचा बंगला लहानच असला, तरी मोठा सुंदर होता. आजूबाजूला मोठें कंपाऊंड होतें आणि त्या कंपाऊंडात नुसतीं आंब्याचीं कलमें होतीं. आंब्यांना मोहोर आला होता आणि कुठें कुठें लहान लहान कैरीही पडूं लागली होती.

मला ही बाग फार आवडली. चिपळूणच्या सारखा हा गांव रूक्ष नव्हता. जिथें तिथें आंब्याच्या बागा दिसून येत असत. चिपळूणच्या रस्त्यावरील माती पांढरी होती, पण रत्नागिरीच्या रस्त्यावरील माती जवळ जवळ पिंजरीइतकी लाल होती. उन्हाचे किरण त्या मातीवर पडून परावर्तन पावले म्हणजे त्यांचा रखरखितपणा नाहींसा होत असे.

वर हिरवीगार कलमें, खालीं तांबडी लाल माती आणि अगदीं माथ्यावर आकाशाचा निळा रंग, असा हा तांबडा, हिरवा व निळ्याचा संयोग नजरेला मोठा आल्हादकारक वाटत होता.

आम्ही बंगल्यांत आलों, त्याच्या दुसऱ्या दिवशींच सकाळीं एक गंमतीची गोष्ट घडली. मी निराळ्या प्रदेशांत आलें, याची त्याच वेळीं मला जाणीव झाली.

त्या वेळीं साधारण सात वाजले होते. सूर्याचीं कोंवळीं किरणें पडून आंब्याच्या मोहराला एक प्रकारचा मधुर वास येत होता. आमच्या बंगल्यासभोंवार दगडी भिंत होती, आणि रस्त्यापासून बंगल्याच्या पहिल्या पायरीपर्यंत सुमारें तीस चाळीस फुटांचें अंतर होतें. रस्त्याजवळच भिंतीला फाटक होतें.

मी इकडे तिकडे हिंडत असतां फाटकाकडे माझी नजर गेली. फाटकाशीं एक गृहस्थ उभे होते. त्यांच्या डोक्याला पांढरा रुमाल होता. धोतर साधारण गुडघ्यापर्यंतच होतें—म्हणजे पायघोळ नव्हतें. अंगांत एक साधा चेकचा कोट आणि त्यावर खांद्याखालून घेतलेलें उपरणें असलेली ही व्यक्ती माझ्या चटकन नजरेंत भरली. त्यांचा वर्ण काळासांवळाच होता, पण मुद्रेंत एक प्रकारची आपलेपणाची भावना होती. त्यांच्याकडे पहातांच, ते कुणीतरी आपले आप्त आहेत, असें एकाद्या अनोळखी गृहस्थालाही वाटलें असतें. त्यांच्या हातांत जी काठी होती, ती माझ्या विशेष प्रकारें ध्यानांत आली. इतर लोक हातांत ज्या प्रकारची काठी घेतात, तशी ती नव्हती. ही काठी त्यांच्या डोक्यापेक्षांही उंच होती—आणि जुन्या चित्रांतले भालदार चोपदार जशी काठी हातीं घेतात त्याचप्रमाणें त्यांनींही हात वर करून ही काठी धरली होती.

मागाहून मला कळलें कीं या काठीला 'क्राफर्डी काठी' असें म्हणतात. रत्नागिरीला पूर्वी ऑर्थर क्राफर्ड नांवाचे एक कलेक्टर होऊन गेले. त्या प्रान्तांत त्यांची कारकीर्द मोठी गाजली होती आणि तिचे परिणामही मोठे विलक्षण झाले होते. क्राफर्ड प्रकरणाचा इतिहास फार मोठा आहे. पण त्याचा माझ्या कथानकाशीं कांहीं संबंध नाहीं म्हणून तो इथं देत नाहीं.

क्राफर्ड साहेब कारकीर्द गाजवून गेले खरे, पण त्यांची काठी मात्र त्या काळांत लोकप्रिय होऊन बसली होती. त्या काठीमुळेंच ते गृहस्थ माझ्या नज-

रेंत भरले. मी त्यांच्याकडे पहात राहिलें आहें असें पाहून ते माझ्यासमोर येऊन उभे राहिले आणि म्हणाले, " कोण ग तूं पोरी ? नव्या प्रान्तसाहेबांची कार्टी वाटतं ? बरी हुषार दिसतेस ! शाळेंत जातेस कीं नाहीं ? शाळेंत जायचं असेल, तर आमच्या पोरी आहेत सोबतीला. तो पाहिलास पला कडच्या कंपाउंडांतला आमचा बंगला ! येत जा अभ्यासाला. साहेब आहेत का घरांत ? "

आजपर्यंत 'पोरी, कार्टे' अशा संबोधनानें मला कुणीच उल्लेखिलें नव्हतें, त्यामुळें या गृहस्थांचें भाषण मला कसेंसेंच वाटलें. त्यांतही ओळखपाळख कांहींच नसतः अगदीं एका दमांत त्यांनीं जितक्या गोष्टी सांगितल्या तितक्या ऐकूनच मी बावरून गेले. नुसती एक मुलगी दिसते काय, आणि तिच्या पहा-तांच तिची शाळा, तिचा अभ्यास, तिला सोबतीण मिळवून देण्याची हमी वगैरे गोष्टी होतात काय ! मला हा उल्लेख विलक्षणच वाटला.

तरी ते गृहस्थ मला आवडले. शिष्टाचाराला सोडून त्यांचें वर्तन होतें, म्हणूनच मला त्यांच्याबद्दल आदर वाटूं लागला. मीं तितक्याच बेफिकिरीनें विचारलें, " काय हो तुमचं नांव ? "

त्यांचा आवाज मोठा विलक्षण होता. बारीक म्हणावा तर बारीक नव्हे, पण मोठ्यानें ओरडल्याशिवाय त्यांना बोलतांच येत नसे. साधारणपणें त्यांच्या नमुन्याच्या आवाजाचीं माणसें क्वचितच दिसून येतात. त्याचमुळें मला त्यांचा आवाजही आवडला. पहिल्यानें ते मोठ्यानें खो खो करून हंसले, आणि नंतर माझा एक गालगुच्चा घेऊन म्हणाले, " बरीच धीट दिसतेस. नाहींतर मागल्या साहेबांची पोरं ! तोंडावरची माशी हाकवतां येईल तर शपथ. मला वाटतं तुमची आमची दोस्ती जमणार. हो, काय म्हटलंस ? माझं नांव विचार-लंस नव्हे का ! माझं नांव बाबीशेट–कळलं ? बाबीशेट. "

मीं क्षणभर त्यांच्या चेहऱ्याकडे पहात म्हटलें; " बाबीशेट का ? म्हणजे तुम्ही वाणी कीं सोनार ? "

बाबीशेट पुन्हा एकदां मोठमोठ्यानें हंसले आणि म्हणाले, " वाणी बरं !– सोनार नव्हे. बरीच माहिती दिसते तुला ! मी सोनार असं तुला कां वाटलं ? "

ह्या वेळपर्यंत माझा नुसता धीर चेपला होता इतकंच नव्हे, तर मी आतां अवसानांत आलें होतें. मी ह्मटलें, " शेट हें विशेषण माझ्या माहितींत फक्त दोघेच लावतात. एक सोनार किंवा वाणी. "

बाबीशेट हंसत हंसत ह्मणाले, " असं काय ? आणि चिपळूणच्या माटी-याना नाहीं का शेट ह्मणत ?—ते काय सोनार आहेत कीं वाणी आहेत ? "

मीं उत्तर दिलें, " त्यांनाही तिकडे वाणीच म्हणतात. "

बाबीशेट पुन्हां एकदां मोठ्यानें हंसले, "ते वाणी नव्हत बरं पोरी! ती निराळीच जात आहे. तें एव्हां तुला कळायचं नाहीं. मोठी झालीस ह्मणजे कळेल आपोआप. "

मीं त्यांच्या चेहऱ्याकडे रोंखून पहात विचारलें, " तुह्मीं काय करतां ? तुम्हीं मास्तर आहांत का ? "

आतां मात्र त्यांच्या हंसण्याला ताळतंत्र राहिला नाहीं. " इतका का मी बावळा दिसतों ? आतां काय सांगावं या पोरीला ! मला मास्तर समजली ! मी मास्तर नाहीं बरं पोरी, मी मास्तर नाहीं. आपला एक सुखवस्तू गृहस्थ आहें. कांहीं दिवस आगबोटीच्या एजंटाचें काम करीत होतों चैनीखातर. पण आतां सारं सोडून दिलं आहे. मी आतां कसलीच नोकरी करीत नाहीं. सकाळींच उठतों, गांवभर फिरतों व नंतर या वरच्या बंगल्यांतून एकदां हजेऱ्या घेतों. नंतर औषधाच्या बाटल्या घेऊन हॉस्पिटलांत जातों. माझं खरं काम तें आहे. हॉस्पिटलात जागा नाहीं म्हणून कांहीं पेशन्टस आमच्या घरा-तच ठेवले आहेत म्हणेनास ! आतां आलीस उद्यां, म्हणजे दिसेलच आमचं हॉस्पिटल ! " पुन्हां आठवण झाल्यासारखें करून ते म्हणाले, " हो, शाळेंत जातेस का तूं ? काय शिकतेस—कितव्या यत्तेंत आहेस ? किती आहांत तुम्हीं भावंडं ? "

मीं उत्तर दिलें, " तिसरींतून आतां चौथींत जाणार आहें. आमचा दादा इंग्रजी शाळेंत जातो. तो चौथींत आहे वाटतं—मला नक्की माहीत नाहीं. "

" तुझा स्वतःचा भाऊ कितव्या यत्तेंत आहे हें तुला माहीत नाहीं ? मला विचार, गांवांतल्या सगळ्या घरांतलीं सगळीं मुलं कुठकुठल्या शाळेंत

कितव्या कितव्या यत्तेत आहेत याचा पाढा मी बिनचूक वाचीन. पोरी, चौकसपणा पाहीजे. मला वाटतं, तुझं नी तुझ्या भावाचं पटत नाहीं—"

मला आश्चर्य वाटलें. एवढयाशा उद्गारावरून या गृहस्थांनीं एवढा अचूक तर्क बांधला कसा ! मीं म्हटलें, " असं कांहीं नाहीं खरं, पण दादाच्या अभ्यासाची मी चौकशी करीत नाहीं. त्याला तें आवडत नाहीं. "

" असं का ! " बाबोशेट म्हणाले, " लेकाचा बापासारखाच प्रौतसाहेब होणार आहे असं मला दिसतं. बरं, साहेब आहेत कां आंत ? "

मीं होय म्हणतांच ते तडक बंगल्यांत शिरले.

त्या गृहस्थाच्या स्वभावाचें मला मोठें कौतुक वाटलें. चिपळुणांत अशी व्यक्ती मला कुणीच आढळली नव्हती. त्यांच्या भाषणांत आपुलकीची भावना अगदीं भरपूर होती. माझ्या घरचीं माणसेंही इतक्या लोभानें माझ्याशीं कधीं बोललेलीं मला आठवेना. मला त्यांनीं ' पोर, कार्टी ' म्हटलें तेंच फार आवडलें. कुणीच मला तसें म्हणत नसे, त्यांनीं म्हटलें तें पटलें.

माझी खात्री झाली—अगदीं अकारण खात्री झाली कीं, रत्नागिरींत पाऊल ठेवतांच मला एक जिव्हाळ्याच्या मित्र लाभला. हा विचार मनांत येतांच मला ठकीची आठवण झाली, आणि त्यासरशीं माझ्या डोळ्यांतून टचकन् पाणी आलें.

प्रकरण १२ वें

# भंडाऱ्याच्या घरीं

रत्नागिरीला गेल्यापासून चिपळूणची परिस्थिती बदलली. चिपळूणला असतांना तालुक्याचा मामलेदार या नात्यानें बाबांना जें महत्त्व होतें, तें प्रमोशन मिळालें असतांही रत्नागिरींत राहिलें नाहीं. प्रान्तसाहेब या नात्यानें तालुक्याच्या मामलेदारापेक्षां बाबांचा पगार आणि अधिकार हे दोन्हीही जरी मोठे होते, तरी तालुक्याचा एकछत्री अधिकार मामलेदाराला जें महत्त्व देतो, तें महत्त्व चारपांच तालुक्यांचा प्रान्त असलेल्या प्रांताच्या अधिकाऱ्याला रहात नाहीं.

जिल्ह्याच्या ठिकाणीं अधिकारी लोकांची फारच गर्दी असते. जिल्ह्याचा अधिकारी या नात्यानें एकट्या कलेक्टरलाच खरें महत्त्व असतें. इतर अधिकारी कितीही मोठे असले तरी ते दुय्यम प्रतीचे ठरतात. याचमुळें मोठा अधिकार मिळूनही बाबांना पूर्वीचें महत्त्व राहिलें नाहीं आणि त्यामुळेंच गांवांतील लोकांच्या दृष्टीनें चिपळूणच्या इतकी मी रत्नागिरींत लोकांच्या नजरेंत भरलें नाहीं. शाळेतील एक चुणचुणीत मुलगी या नात्यानें मी जरी शाळेंत प्रख्यात होतें तरी गांवच्या लोकाना त्या गोष्टीची कदर नव्हती. अर्थातच माझ्या मैत्रीणींचें क्षेत्र वाढवण्यासाठीं रत्नागिरींत मला चढावाचें धोरण स्वीकारावें लागलें. चिपळूणांत माझी मैत्री संपादन करण्यासाठीं गांवच्या मुलींची चढाओढ लागत असे, पण इथें तो प्रकार अजिबात बदलला.

शाळेंतील बऱ्याच मुलींच्या माझ्याशीं ओळखी झाल्या. पण त्यांत एक गोम होती. ठकोच्या आणि यमीच्या दोस्तीमुळें कमी दर्जाच्या समजल्या जाणाऱ्या जातीकडे माझा ओढा विशेष असे. ती वृत्ति रत्नागिरींत आल्यावरही तशीच कायम राहिली. रत्नागिरींत ही माझी वृत्ति मला पदोपदीं नडूं लागली.

रत्नागिरींत आल्यावर अगदीं थोड्याच महिन्यानीं मी मराठी शाळेची मर्यादा ओलांडली आणि इंग्रजी शाळेंत प्रवेश केला. माझ्या वयाच्या मुली

तर राहोतच पण फार थोडे मुलगे इंग्रजी शाळेंत होतेच असें नाहीं, मुलींची संख्याही फारच थोडी होती. मुलींना इंग्रजी शाळेंत पाठवण्याइतकी सुधारणा अजून त्या गांवीं झाली नव्हती. आज तारखेलाही रत्नागिरींत मुलींचें स्वतंत्र असें एकही हायस्कूल नाहीं.

माझ्या वर्गांत तीनच मुली होत्या. हल्लींच्या शाळेंत महारांच्या चांभारांच्या मुलांना वर्गांत जसें अलग बसविण्यांत येतें, त्याचप्रमाणें मुलींना बसविण्यांत येत असे. नंबराचा प्रश्न आला तर मुलांच्या रांगेत वर गेलेल्या मुलीची जागा तेवढी मोकळी ठेवण्यांत येत असे. मुलींना अशा रीतीनें वागवण्यांत, मुलांचा पाणउतारा होऊं नये कीं मुलीचा निकट सहवास होऊं नये, यापैकीं कोणता उद्देश मास्तरांच्या जातीच्या अंतःकरणांत सळसळत असतो हें सांगतां येणार नाहीं. एकंदरींत या प्रकाराबद्दल त्यावेळींसुद्धां मला चमत्कारिक वाटत असे—आजपर्यंत देखील हाच प्रकार नुसत्या हायस्कुलांतून नव्हे तर कॉलेजांतूनही सुरू आहे, याचें कुणालाच कसें कांहीं वाटत नाहीं ! मुलांमुलींच्या मनांत पापाची कल्पना उत्पन्न करण्याचा पायंडा असा शाळेपासूनच घातला जातो.

वर्गांत आम्हीं तीनच मुली असल्यामुळें आणि तिघीही स्वतंत्र जागीं बसत असल्यामुळें आमची लवकरच गट्टी जमली. सुदैवानें बाकीच्या दोन मुलींपैकीं एक मुलगी भंडारी आणि दुसरी वाणी जातीची होती. ब्राह्मणांच्या मुली इंग्रजी शाळेपर्यंत सहसा पोहोंचत नसत. ज्या भंडारी आणि वाणी मुली शाळेंत येत असत त्याही अगदीं रत्नागिरीच्याच होत्या असें म्हणता येणार नाहीं. त्यांचे बाप मुंबईला असत आणि त्या मुंबईच्या संस्कारांमुळेंच या मुली इंग्रजी शाळेंत येऊं लागल्या होत्या. भंडारी मुलीचें नांव छबी असें होतें आणि वाणी मुलीचें नांव कमला असें होतें. पण तिला बहुधा कमा म्हणत असत. दोन्ही नांवें अर्थातच मुंबईच्या पद्धतीचीं होतीं.

इंग्रजी शाळेंत जाणाऱ्या मुली या नात्यानें आम्हीं सर्वांच्या नजरेंत भरून दिसत असू. शाळेंतील मुलें आमची थट्टा करीत असतच, पण गांवांतील सभ्य म्हणविणारे गृहस्थही 'शाळेंत जाणाऱ्या मुली' म्हणून आमच्यावर शेरे मारण्यास कमी करीत नसत. माझ्या दोघी मैत्रिणी माझ्यापेक्षां वयानें

दोनतीन वर्षांनीं मोठया होत्या. लहानपणीं मुबईंत वागलेल्या असल्यामुळें मनाच्या चांगल्या खंबीर होत्या, पण माझ्या स्वाभाविक चिडखोरपणामुळें मी मात्र असले शेरे सहन करण्यास तयार नसें.

माझ्या नित्याच्या स्वभावाला अनुसरून मीं या मुलींच्या घरीं जाण्या-येण्यास सुरुवात केली होती, त्याचीही बरीच चर्चा होत असे. आमच्या शेजारीं असलेल्या बाबीशेटच्या घरींही माझें जाणेंयेणें फार असे. त्यांच्या घरीं तर मुलांचें खिल्लारच होतें. एकंदर मुली आणि मुलगे किती होते हें मला खात्रीनें सांगता येणार नाहीं. मुलांत मिसळण्यापेक्षां माणसांत बसून लंब्या-चवडया बाता झोंकण्याची मला आवड असल्यामुळें तीं मुलेंही माझ्यापासून दूरच असत.

वर्तमानपत्रें वाचण्याचा माझा क्रम पूर्वीप्रमाणें सुरूच होता. त्यांत मुळींच खंड पडला नाहीं. वर्तमानपत्रें वाचण्याचे जे परिणाम व्हायचे, तेच माझ्यावर होत होते. ज्या गोष्टी साधारणपण मुलांना कळत नाहींत—वर्तमानपत्रांत त्यांची चर्चा वाचल्यामुळें ज्या विषयांची साधारण अंधुक कल्पना येत असते—त्याच विषयांची चर्चा मी सदोदित करीत असें. मुलांना—विशेषतः परक्यांच्या मुलांना वागवतांना वाजवीपेक्षा जास्त प्रेमळपणा दाखवण्याच्या बाबीशेट यांच्या वृत्तीमुळें त्यांनी मला बरीच चढवून ठेवली होती. त्यांच्या घरचीं मुलें त्यांना तात्या म्हणत असत तशीच मीही म्हणत असें. कुणि पाहुणा आला म्हणजे तात्यानीं मुद्दाम एखाद्या वर्तमानपत्रांतील विषयाची चर्चा काढावी, व मला त्यांत भाग घ्यायला भाग पाडावें आणि मीं काहींतरी वास्तव—अवा-स्तव बोललें म्हणचे त्यांचें तोंडभरून कौतुक करावें, असेंच रोज चालत असे. त्यामुळें माझी बैठक बहुधा त्यांच्याच घरीं होत असे. बाबा बहुतेक फिरतीवर, आईचें फारसें बंधन नाहीं—त्यामुळें माझ्या वर्तनातही थोडा स्वैरपणा आला होता.

चिपळूणच्या पेक्षां रत्नागिरीची परिस्थिती निराळी होती असें मीं वर सांगितलेंच आहे. येथील बहुतेक वस्ती सरकारी नोकरांची. व्यापारी फारसे नाहींतच. सुखवस्तु गृहस्थ फार तुरळक. नागरिकांची स्थिती अशी असल्या-मुळें बहुतेक संभाषणाचे विषय साहेब, ऑफिस, फिरती, कोर्ट, कज्जे, निकाल, एवढयापुरतीच असे.

छबीच्या घरीं मी वारंवार जात असें. कमापेक्षां तिची माझी मैत्रिच जास्त सलगीची होती. पण तिच्या घरीं गेलें असतां तिनें कधींही मला कोणताही जिन्नस खाण्याचा आग्रह केला नाहीं.

त्याला एक कारण होतें. रत्नागिरीसारख्या धर्मनिष्ठ गांवांत जात–प्रपंचाचें खूळ फार मोठ्या प्रमाणांत असे. भंडारी ही मूळची दर्यावर्दी जात. शिवाजीच्या आरमारावर या लोकांनीं एकाकाळीं मोठे पराक्रम गाजविले होते. शिवाजीच्या आरमाराचा मुख्य माय नाईक या नांवाचा एक भंडारीच होता. मराठेशाही गेली त्याबरोबरच भंडारी जातीच्या हातच्या तरवारी बंदुकाही गेल्या आणि त्याच जागीं माड काढण्याची कोयतीं आलीं.

" माड काढणें " हा शब्द कोंकणच्या बाहेरच्या लोकांना फारसा कळणार नाहीं. दारू तयार करण्याच्या विधींतला हा पहिला विधि आहे. माडावर चढून त्याची पोय कापून त्याच्यावर एक मडकें लावायचें आणि दुसऱ्या दिवशीं त्यांतील माडी उतरून खालीं आणायची, या विधीला 'माड काढणें' असें ह्मणतात. हें काम करीत असल्यामुळे भंडारी जात ही एक कमी दर्जाची जात आहे असें समजलें जात असे. मुळचे अस्सल मराठे—क्षत्रिय—पण हें काम करण्यामुळें त्यांना सामाजिकदृष्ट्या कमीपणा आला होता. कुठल्याही ब्राह्मणानें त्यांच्या हातचें पाणी कधी घेतलें नसतें–पण औषधासाठीं निरा घेणारे ब्राह्मण त्या वेळीं रत्नागिरींत मुळींच नव्हतें असें नाहीं. निरा म्हणजे फेस न आलेली ताजी माडी. औषधाला अर्थातच दोष नाहीं—दोष असतो काय तो शुद्ध आणि स्वच्छ अशा पाण्याला ! त्या पोर वयांत सुद्धां मला या प्रकाराचें राहून राहून आश्चर्य वाटत असे.

या सामाजिक निर्बन्धामुळें छबीनें कधींही कांहींही खाण्याचा मला आग्रह केला नव्हता. ज्यावेळीं हें माझ्या ध्यानांत आलें, त्यावेळीं मी या बाबतींत चढावाचें धोरण स्वीकारण्याचा निश्चय केला.

एका रविवारीं मी छबीच्या घरीं गेलें असतां मुद्दाम पिण्यासाठीं पाणी मागितलें. तें ऐकून ती अगदीं स्तंभित झाली. आणि ह्मणाली, " आमच्या घरचं पाणी तुला चालेल? "

" कां चालणार नाहीं ? " मी विचारलें, " तुझ्या घरचं पाणी आमच्या घरच्या पाण्यापेक्षां वाईट आहे कीं काय ? "

" छे: ! छे: ! मुळींच नाहीं. " छबी ओशाळून म्हणाली, " उभ्या रत्नागिरींत आमच्या विहिरीच्या पाण्यासारखं पाणी शोधून सापडायचं नाहीं. "

" होय ना ! " मी म्हटलें, " मग कां देत नाहींस ? रत्नागिरींतलं चांगलं तेवढंच पाणी मला प्यायला मिळूं नये अशी का तुझी इच्छा आहे ? "

तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती घरांत गेली. थोडा वेळ आईशीं कांहीं कुजबुजली, पुन्हां बाहेर आली, वेड्यासारखी क्षणभर माझ्याकडे पहात राहिली आणि म्हणाली, " नका गडे, कुणाला कळलं तर उगीच तुला त्रास होईल. त्यापेक्षां थोडा वेळ तहान मारून पहा. घरीं गेल्यावर खुशाल पाणी पी. तहान भूक आंवरायला माणसांनं शिकलंच पाहिजे. "

मी एकदा मोठ्यानें हंसलें आणि म्हटलें, " तहान भूक आंवरायचा उपदेश तूं नकोस कांहीं करायला. खरं म्हणशील तर मला तहान मुळीं लागलेलीच नाहीं. मी पाणी मागितलं तें तुझ्या घरचं पाणी मला प्यायचं आहे, म्हणूनच मागितलं. भंडाऱ्याच्या घरचं पाणी पिऊं नये असं लोक म्हणतात, म्हणूनच मुद्दाम मागितलं. भंडाऱ्याच्या घरचं पाणी प्यायल्यानं काय होतं तें मला पहायचं आहे."

" पण तुझ्या घरीं कळलं तर ? " साशंक मुद्रेनें छबी म्हणाली.

मी निर्धारपूर्वक उत्तर दिलें, " कोणतीही गोष्ट मला चोरून करायची नाहीं. मी कांहींच चोरून ठेवणार नाहीं. मी घरीं गेल्यावर आईला सांगणार कीं छबीच्या घरीं मी आज पाणी प्यायलें आहे म्हणून. त्याचा परिणाम काय होतो तेंही मी बारकाईनं पहाणार. भंडाऱ्याच्या घरचं पाणी प्यायल्यानं वाति होते, कीं पोटांत शूळ उठतो, तेंच मला पहायचं आहे. "

छबी म्हणाली, " नुसतं पाणी ? नुसतं पाणी प्यायलेलं बरं दिसत नाहीं. बरोबर कांहीं खायला—" एवढेंच बोलून छबी थांबली. तिला संकोच वाटला.

" कां थांबलीस ? " मी तिला विचारलें, " प्यायची तयारी आहे तिथं खायला कोण भिणार ! "

" पण म्हटलं आमचं भंडाऱ्याच्या घरचं—" चांचरत चांचरत छबी पुन्हा बोलूं लागली.

" काय आणायचं असेल तें एकदम घेऊन ये. असं घाबरायला तुला काय होतं आहे तेंच मला कळत नाहीं. "

अगदीं गंभीरपणें छबी ह्मणाली, " मला काय होतं आहे तें तुला कळायचं नाहीं. तूं माझ्या घरीं पाणी पिशील, एखादा लाडूही खाशील, तुला त्याचं कांहीही वाटणार नाहीं. पण हें लोकांना कळलं तर त्याचा मोठा बभ्रा होईल. गोदूताई, मी जातीनं भंडारी आहें. माझ्या जातीला मुद्दाम कुणी नांव ठेवलेलं मला केव्हांही खपायचं नाहीं. लोक ह्मणतील, या भंडाऱ्याच्या पोरीनं ब्राह्मणाच्या, त्यातून थोरामोठ्यांच्या मुलींची दोस्ती केली, हळुहळु तिला घरीं नेत नेत फुसलावली आणि आपल्या घरचं खाणं घालून बाटवली. असं कुणि ह्मटलं तर मला मेल्याहून मेलं होईल. तुमची जात मोठी असेल, पण माझी जातही मला तितकीच मोठी आहे. मला कुणाला बाटवायचं नाहीं आणि कुणाला बाटवायचा प्रयत्न करून माझ्या जातीचा दर्जा कमीही करायचा नाहीं. आणि ह्मणूनच ह्मणतें कीं ही तहानभूक थोडावेळ थांबवून घर आणि घरीं गेल्यावर खुशाल काय तें खा आणि पी. "

माझ्या जागीं दुसरें कुणी असतें तर त्याला या भाषणाचा थोडा विचार करावा असें वाटलें असतें. पण मला विचार करायची जरूरीच नव्हती. आधीं विचार करूनच मी सवाल टाकला होता. मी ह्मटलें, "मला कुणि कांहीं ह्मटलं तर त्याची मला पर्वा नाहीं. आणि तुला कुणि कांहीं बोलू लागलं तर त्यांना उत्तर द्यायला मी खंबीर तुझ्या पाठीशीं आहें हें ध्यानांत ठेव. "

छबी आंत गेली. थोड्या वेळानें ती व तिची आई एका तबकांत एक दोन लाडू, थोडा चिवडा आणि घांसून पुसून स्वच्छ केलेल्या तांब्यांतून पाणी, असें साहित्य घेऊन आली

तें सर्व साहित्य माझ्यापुढें ठेवतांना छबीची आई ह्मणाली, " ताईसाहेब, मला वाटतं तुह्मीं करतां अहांत ते बरं नाहीं. मी तुमचं बोलणं ऐकलं, तुमचं ह्मणणं बरोबर आहे. पण जगाची नजर निराळी असते. जें कांहीं करायचं तें लोकांना भिऊनच केलं पाहिजे. "

" मला नाहीं तसं वाटत ! " असें ह्मणून मी एक लाडू मोडून त्याचा तुकडा तोंडांत टाकला.

आह्मी ओसरीवरच बसलों होतों. घर अगदीं रस्त्यावर होतें. रस्त्यावरून जाणारायेणारांची वर्दळ होती. प्रत्येणजण जात असतांना मधेंच क्षणभर थांबून माझ्याकडे एकवार नजर टाकल्याशिवाय जात नसे.

योगायोग मोठा विलक्षण होता. बाबीशेट रस्त्यानं जात होते. मला पहातांच ते थाबले. ते थांबले असें पहाताच मी त्याना हांक मारलो आणि ह्मटलें, "या ना तात्या. थोडा चिवडा खाऊन पाणी पिऊन जा."

आपली ऊंच काठी माझ्या समोर टेंकून माझ्याकडे पहात तात्या ह्मणाले, "आतां काय सांगावं तुला पोरी ? देवानं तुला कांही अक्कल दिली आहे कीं नाहीं ? कुठं खाते आहेस, काय खाते आहेस, याची कांहीं चाड आहे का तुला ? माझ्या घरची कार्टी असती तर दोन थोबाडींत मडकावल्या असत्या—"

वांकड्या मानेनें गाल पुढें करून मी ह्मटलें, "मग द्या की एक."

"काय निर्लज्ज कार्टी आहे" तात्या ह्मणाले, "अग एकच कां चारसुद्धां मडकावल्या असत्या. पण तूं आमच्या घरचीं नाहींसना ?"

"कोण ह्मणतं असं ?" मी उत्तर दिलें, "अख्खा दिवस मी तुमच्या घरीं असतें ह्मणून आई ओरडत, तें तुह्मांला माहीत आहे ना ? मग मी तुमच्या घरची नाहीं कशी ? हें पहा तात्या, तुम्हीं थोबाडींत दोन द्या किंवा चार द्या पण हे लाडू आणि चिवडा संपवून वर चांगलं पाणी प्यायल्याशिवाय मी प्राण गेला तरी इथून हालणार नाहीं."

"तशी तूं हट्टी आहेस तें मला चांगलं माहीत आहे." तात्या म्हणाले, "पण हें पहा गोदे, हें बरं नव्हे. तूं अजून लहान आहेस, केवढं तरी आयुष्य अजून तुझ्यापुढं आहे. मला स्पष्ट बोलायला लावूं नकोस. पण तूं कुठं काय करते आहेस याचा विचार कर. त्यांत कांहीं विशेष आहे असं मला वाटत नाहीं. पण तें लोकाचाराविरुद्ध आहे. तुझ्या जातीला तूं ओळखत नाहींस. तू कांहीं तरी करशील खरं—पण त्याचा त्रास होईल तुझ्या बापाला—तुझ्या आईला. मट भिक्षुक त्यांना उमे चावून खातील. प्रायश्चित्त घ्यायला लावतील—सळो कीं पळो करून सोडतील. खायचंच असलं तर दाराआड खा—अशी चवाठ्यावर बसून खाऊं नकोस.

मी मोठमोठयानें हंसलें आणि म्हणालें, " मी खायला बसलें आहें ती नुसतं खाण्यासाठीं नव्हे—चव्हाटयावर खाण्यासाठींच मी खायला बसलें आहे. मंडाऱ्याच्या घरचा लाडू खाल्ला आणि पाणी प्यायलं कीं पोटांत शूळ उठतो कीं जीव जातो, तेंच मला पहायचं आहे—म्हणून खायला बसलें आहें. समजलं तात्या ! सर्वांना सांगा, गोखलेसाहेबांच्या गोदूनं मंडाऱ्याच्या घरचं खाणं खाल्लं. काय कुणाला मला वाळींत टाकायचं असेल तें खुशाल टाका म्हणावं. "

खोटया रागानें दांत ओठ खात तात्या म्हणाले, " आतां काय सांगावं या कार्टीला ? अग गाढवी, वाळींत तुला टाकणार नाहींत, तुझ्या बापाला टाकतील. "

मी म्हटलें, " तें काय म्हणून ! अपराध माझा, त्याची शिक्षा माझ्या बापाला कां ? "

" तुझ्यासारखी आचरट कार्टी त्यांच्या पोटीं जन्माला आली म्हणून ! " असें म्हणून हंसत हंसत तात्या निघून गेले, मलाही हसूं लोटलें.

हंसतां हंसतां माझी नजर छबीच्या चेहऱ्याकडे गली. छबी अगदीं गंभीर झाली होती. प्रश्नचिन्हांकित नजरेनें मी तिच्याकडे पाहिलें तेव्हां ती म्हणाली, " गोदूताई, एकंदरींत झालं तें कांहीं बरं झालं नाहीं. तुझ्या हट्टासाठीं मी तुझं म्हणणं कबूल केलं. पण त्याचा आतां मला पश्चात्ताप होतो. काय होईल कुणी सांगावं ! हें प्रकरण कदाचित विकोपाला जाईल आणि तुझे आईबाप आम्हांला निष्कारण दोषी ठरवतील. "

" पण मी आहें ना ? " मी निर्धारानें म्हटलें, " तुला वाटत असेल कीं मी लहानशी आहें. पण साऱ्या जगाबरोबर मांडायला मी एकटी उभी राहीन हें ध्यानांत ठेव. मी कोणतीही वाईट गोष्ट केली नाहीं याची मला खात्री आहे. मी गैरवर्तन करणार नाहीं याची माझ्या आईलाही खात्री आहे. आतां हा लाडू मी खाल्ला—कांहीं प्राण गेला नाहीं माझा ! काय बिघडलं त्यांत ? मी तुझ्या घरचं दूध प्यायलें असतें तर तें चाललं असतं. दुधालाच कां दोष नाहीं ? आणि पाण्यालाच कां दोष आहे ? हा दोष आला कुठून ? कुणि आणला—कां आणला याची चर्चा होईल ती मला ऐकायची आहे.

तेवढ्यासाठीं मी या कण्या फेंकल्या आहेत. आतां किती कोंबडीं कशी झुज-तात तें मला पहायचं आहे." असें म्हणून मी तांब्यांतलें पाणी मांड्यांत ओतलें आणि पिऊं लागलें.

रस्त्यावरून जाणारा प्रत्येक मनुष्य थबकून माझ्याकडे पाहिल्य शिवाय पुढें जातच नसे. बिचारी छबी भीतीनें थरथर कापत होती. तिची आई दाराआड उभी राहून भयभीत मुद्रेनें एकवार माझ्याकडे आणि एकवार रस्त्यांतून जाणाऱ्या लोकांकडे पहात होती.

छबीच्या आईचा निरोप घेऊन मी जायला निघालें. पायरी उतरत असता मला छबीच्या आईचा उद्गार ऐकूं आला, "थक्क आहे या पोरीची!" तो उद्गार ऐकून मला धन्यता वाटली.

दुसरे दिवसापासून सारी रत्नागिरी जागी झाली. चिपळून सोडून आल्या-पासून मला अगदीं मेल्यासारखें वाटत होतें. आतां कांहींतरी जीव आला असें वाटू लागलें. रस्त्यांतून जाणारा प्रत्येक मनुष्य माझ्याकडे बोट दाखवूं लागला. रत्नागिरींतही माझी प्रख्याति होऊं लागली आणि त्या प्रख्यातिबरो-बरच चिपळूणच्या गोष्टी रत्नागिरींत विकृत स्वरूपांत पसरूं लागल्या.

पहिली चुगली आईच्या कानीं आली ती आमच्या उपाध्येबुवांकडून.

त्या दिवशी कांहीं धर्मकृत्य व्हायचें होतें. उपाध्येबुवा आले, ते येतांच आईनें त्याना पाट बसायला दिला. खांद्यावरच्या शिध्याच्या मोटल्या आणि हातांतील दर्भाच्या पेंढ्या बाजूला फेंकून ते पाटावर बसले आणि हातांतील पळीपंचपात्री जमिनीवर आदळून म्हणाले, "बाईसाहेब, मी आलों आहें खरा—पण रहावं कीं जावं याचा विचार करतों आहे. तुम्ही मोठी माणसं आहांत, मोठे अधिकारी आहांत, म्हणून बोलतां येत नाहीं. पण हें एकंदरींत बरं नव्हे."

आश्चर्यचकित होऊन आईनें विचारलें "असं काय झालं बापूभटजी?"

त्याच्या चौपट चकित होऊन उपाध्येबुवा म्हणाले, "म्हणजे? तुम्हाला माहीत नाहीं? तुमच्या चिरंजीवीनं गांवांत काय गुण उधळले तें तुम्हांला माहित नाहीं?

आईला खरोखरीच कांहीं माहीत नव्हतें. ती नुसती उपाध्येबुवांच्या तोंडा-कडे पहात उभी राहिली. जमदग्नीचा अवतार आणून उपाध्ये म्हणाले,

" सारा भ्रष्टाकार–तुमच्या ताईसाहेबांनीं सारा भ्रष्टाकार माजवला आहे. आतां ती तुम्हांला शिवली, घरांतल्या पाण्याला शिवली, देवांना देखील शिवली असेल. आतां असल्या या घरांत आम्हीं धर्मकृत्यं कशीं करायचीं ?– वेदमंत्रोच्चार कसा करायचा ? "

आई मोठ्या बुचकाळ्यांत पडली. जीवाची आटापेट करून उपाध्येबुवा सारखे बोलत सुटले होते. धर्म आणि अधर्म याच्यावर मोठें व्याख्यान देत होते. पण मूळ मुद्यावर मुळींच येत नव्हते. आई अगदीं शांतपणें ऐकत होती. काय झालं आहे तें उपाध्येबुवांनीं सांगितल्याशिवाय आपण होऊन त्यांना विचारावयाचें नाहीं, असा तिनें निश्चय केला असावा असें वाटत होतें.

दारांत उभी राहून मीही तितक्याच शांतपणें ऐकत होतें. बोलत असतां उपाध्येबुवांची नजर मधून मधून माझ्याकडे जात होती. पण तिचा माझ्यावर कांहीं परिणाम होत नाहीं असे पाहून ते अधिकाधिक संतापत होते.

त्यांचा संताप वाढावा म्हणून मी मधून मधून त्यांच्या भाषणाला हंसत होतें.

व्हायचा तोच परिणाम झाला. उपाध्येबुवा संतापून म्हणाले, " पाहिलीत, कशी हंसते आहे ? कशी हंसते आहे ती पहा म्हणजे तुम्हांला देखील संताप येईल. भंडाऱ्याच्या घरीं ब्राह्मणाची मुलगी जाऊन जेवते आणि ते ब्राह्मण कोण तर खुद्द जिल्ह्याचे अधिकारी—खुद्द प्रांतसाहेब— आणि त्याचं तिला कांहींच वाटत नाहीं. असल्या या घरांत आम्ही येऊन धर्मकृत्यं करायचीं कशीं ? मला आश्चर्य वाटतं तें हेंच. हें तुम्हांला मानवलं कसं ? "

आईनें शांतपणें उत्तर दिलें, " माझी मुलगी भंडाऱ्याच्या घरीं जेवली नाहीं. "

उपाध्येबुवा जरा सर्द होऊन म्हणाले, " नसेल, जेवली नसेल. पण कांहीं तरी मातीमसण खाल्लं असेल—"

" मातीमसण नाहीं. दोन लाडू आणि पसाभर चिवडा खाल्ला आणि वर चांगला अर्धा तांब्या पाणी प्यालें ! " मी शांतपणें उत्तर दिलें.

उपाध्येबुवा क्षणभर माझ्याकडे टकमक पहातच राहिले. त्यांच्या तोंडून सहज उद्गार निघाला, " अगदीं उघड उघड कबूल करते आहे ! "

" तर काय तिनं खोटं बोलावं ! " आई म्हणाली, " माझी मुलगी केव्हांही खोटं बोलायची नाहीं. काय बिघडलं त्यांत ? आमच्या इकडनं खेलखान्यांत जाणं होतं. त्यावेळीं तिथं नाहीं का साहेबाच्या पंक्तीला खात ? त्यावेळीं कुठं वाळींत टाकण्याचा प्रश्न तुह्मी नाहीं काढला ? "

उपाध्येबुवांचा पारा आणखी उतरला. ते निमुळत्या स्वरांत म्हणाले, " त्यांची गोष्ट वेगळी आहे. ते सरकारी अधिकारी आहेत. अधिकारी अधिकारी एका जागीं जमले म्हणजे त्यांना कांहीं कांहीं गोष्टी शिष्टाचारासाठीं कराव्या लागतात. त्याला कांहीं दोष नाहीं. सरकारी नोकर म्हणजे पृथ्वीपति, ' ना विष्णुः पृथ्वीपतिः ' ते विष्णुचे अवतारच आहेत. त्यांनीं वाटेल तें केलं तरी त्यांचं त्यानांच शोभतं. सरकारी अधिकाऱ्याला कसलाच दोष नाहीं. पण मुलीच्या जातीला तें कसं चालेल ? "

उपाध्येबुवाना पुढें मुद्दे आठवेनात. त्यांनीं वादविवाद आवरता घेतला.

पण मी थोडींच स्वस्थ बसणार होतें. मी म्हटलें, " प्रायश्चित घ्यायचं असलं तर मला कोणतं प्रायश्चित घ्यावं लागेल ? "

उपाध्येबुवा डोकें खाजवून म्हणाले, " तें मला धर्मसिंधूंत पाहिलं पाहिजे. असले प्रसंग वारंवार येत नाहींत. तरी पण मला वाटतं कृच्छ्र-चांद्रायण व्रत करावं लागेल, होम करावा लागेल, शान्त करावी लागेल. पण एवढे उपद्व्याप होत नसतील तर हिरण्यद्वारा प्रायश्चित करावं हा उत्तम मार्ग. "

मीं खदखदां हंसलें, तेव्हां उपाध्येबुवा म्हणाले, " हंसूं नका ताईसाहेब, कृच्छ्रचांद्रायण व्रत म्हणजे सामान्य काम नाहीं—"

" काय करायचं असतं या व्रतासाठीं ? " मी म्हटलें.

" तें मला धर्मसिंधूंत पाहिलं पाहिजे. " उपाध्येबुवांनीं उत्तर दिलें. " मोठं कठीण आहे तें व्रत. कसं करायचं तें फारच थोड्यांना माहीत आहे. सर्वांत सोव्वळ उपाय म्हणजे हिरण्यद्वारा प्रायश्चित करणें. जप नाहीं, जाप्य नाहीं, होम नाहीं, हवन नाहीं. हिरण्यदान करावं आणि मोकळं व्हावं. "

हिरण्यदान या शब्दाचा अर्थ मला माहीत होता. पण मी मुद्दामच विचारलें, " हिरण्यदान म्हणजे काय ? "

" हिरण्यदान म्हणजे दक्षिणाप्रदान. ब्राह्मणाला दक्षिणा देणें. सर्व पापं भस्म होतात. " उपाध्येबुवा म्हणाले.

मी कुत्सितपणें म्हणालें, " दक्षिणेच्या रुपयांतून आगीच्या ठिणग्या बाहेर येतात वाटतं ? भस्म झालेल्या पापाची एक चिमूटभर राख पहायला मिळते का ? "

उपाध्येबुवा फें फें फें करून हंसले आणि म्हणाले, " ताईसाहेबांचं भाषण मोठं मार्मिक आहे. जशी खाण तशी माती. बाईसाहेबांचा स्वभाव उदार तसं ताईसाहेबांचं भाषण मार्मिक. साहेबांचा स्वभाव तर फारच दिलदार. एक सरदार आहेत बरं सरदार. सारी रत्नागिरी बोलत असते त्यांच्याबद्दल. आजपर्यंत पुष्कळ प्रांतसाहेब येऊन गले, पण असे प्रांतसाहेब झाले नाहींत. हें एवढं प्रायश्चित करूनच टाका बाईसाहेब–साहेबांच्या किर्तींत भर पडेल. पापक्षालन होईल आणि किर्तीही वाढेल. असा हा दुबार फायदा होण्याचा योग दवडूं नका. "

मी थोडासा गंभीरपणाचा भाव आणून म्हटलें, " कीर्ती कुणाची वाढेल– माझी कीं बाबाची ! "

पुन्हां फें फें करीत उपाध्येबुवा म्हणाले, " दोघांचीही. दोघांचीच कां– त्रिवर्गाची–साहेबांचो, बाईसाहेबांचो आणि खुद्द आपली ताईसाहेबांचीही कीर्ती वाढेल. नकळत हातून पाप घडलं—"

" नकळत नाहीं–अगदीं जाणून बुजून मी भंडाऱ्याच्या घरीं खाल्लं. " मी ठांसून उत्तर दिलें. " ऐकलंत उपाध्येबुवा, मीं चुकून पाप केलं नाहीं. त्यांत कांहीं पाप आहे असं मला वाटत नाहीं. पापच झालं नाहीं तर प्रायश्चित कसलं ! मी पाप केलं नाहीं म्हणूनच त्याचं प्रायश्चित करणार नाही. आई आणि बाबा माझ्यासाठीं प्रायश्चित करूं लागले तर त्यांना तसं करूं देणार नाहीं, हें खूप ध्यानांत ठेवा. होमहवनांनंही नाहीं आणि हिरण्यदानांनंही नाहीं. "

उपाध्येबुवा एक क्षणभरच स्तंभित झाले. पण उसनें अवसान आणून हंसत म्हणाले, " ताईसाहेबांचा स्वभाव अगदीं साहेबांसारखाच आहे. मोठा करारी. मोठा बाणेदार. बाणा म्हणजे असा पाहिजे. कांहीं हरकत नाहीं. कांहीं हरकत नाहीं, तुम्ही प्रायश्चित केलं असं मी गांवांत सांगत जाईन. "

" कांहीं नको, असलं खोटंनाटं सांगायला. " मी करारीपणानें म्हटलें.

" तसं कसं होईल ताईसाहेब ? " उपाध्येबुवा संथपणें म्हणाले, " मला या घरीं यायचं आहे. तुमचा धर्म चालू ठेवायचा आहे, व्रतंउद्यापनं करायचीं आहेत. तुम्ही प्रायश्चित्त केलं नाहीं तर मला या घरीं येतां यायचं नाहीं. आणि तसा आलों तर वैदिक मंडळी मला बहिष्कार घालतील. तुमचा धर्म चालण्यासाठीं--केवळ तुमच्या कल्याणासाठीं मला खोटं बोलल्या-खेरीज गत्यंतर नाहीं. "

आई नुसती हंसली आणि म्हणाली, " चला बापूभटजी, आतां पूजेच्या तयारीला लागा. "

मी जें काय समजायचें तें समजलें. उपाध्येबुवा म्हणजे काय चीज असते याची त्या दिवशीं मला पहिल्यानें कल्पना आली.

---

# प्रकरण १४ वें.

# वेदशाळेंत.



मधले दोन दिवस शाळेला सुटी होती. ज्यावेळीं मी शाळेंत गेलें त्यावेळीं छबी माझ्याशीं नीटशी बोलेना.

मला थोडें आश्चर्य वाटलें. तिनें बोलण्याचें अजिबात टाळलें नाहीं पण पूर्वीच्या अनुभवाप्रमाणें पहातां कुठें तरी आडपडदा येत होता. ती मुळींच बोलत नव्हतो असें नाहीं. पण बोलण्यांत संकोच होता—मोकळेपणा नव्हता.

स्पष्टपणें तिला विचारावें असें माझ्या मनांत आलें. पण मधल्या सुटींत आपोआपच त्याचा निकाल लागला. कमानेंच पहिल्यांदा प्रश्न काढला गांवांत प्रायश्चिताची ओरड झाली होती. नुसतीच ओरड होऊन थांबलें नव्हतें, चर्चेला महत्त्व आलें होतें.

कमाच्या प्रश्नाला उत्तर देतांना मी म्हटलें, " ही बातमी बढवढीत खोटी आहे. मला कुणीही प्रायश्चित दिलें नाहीं, किंवा मी घेतलेंही नाहीं.

कमा म्हणाली, " प्रायश्चित तूं घेतलं नाहींस. तूं प्रायश्चित घेतलंस असंही कुणि म्हणत नाहींत. तूं वयानं लहान आहेस—मुलगी आहेस, प्रायश्चित घेतलं तें तुझ्या वडिलांनीं. तूं मुलगा असतीस–मुंज झालेला मुलगा असतोस–तर प्रायश्चित तुला घ्यावं लागलं असतं. पण तूं मुलगी असल्यामुळं प्रायश्चित तुझ्या वडिलांना घ्यावं लागलं. "

बाबांनीं प्रायश्चित घेतलें नाहीं असें मी ठांसून सांगितलें त्यावेळीं कमा म्हणाली, " असं मुळींच होणार नाहीं. खुद्द बापूभटजी आमच्या काकांना सांगत होते. "

माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. एकूण हें बापू भटजींचें कारस्थान! त्या दिवशीं झालेलें सर्व भाषण मी जसेंच्या तसें सांगितलें. वैदिक मंडळीकडून स्वतःला त्रास होऊं नये म्हणून बापूभटजींनीं उठवलेली कंडी किती निराधार आहे, याची जेव्हां त्या दोघींची खात्री पटली त्यावेळीं छबी म्हणाली, 'मी उगीच तुझ्यावर रागावलें. बापूभटजींसारख्या वयोवृद्ध माणसानं मुद्दाम येऊन ज्यावेळीं आमच्या घरीं सांगितलं त्यावेळीं मला कसा संशय यावा!

एवढा वयोवृद्ध सत्वशील ब्राह्मण—बेधडक खोटं बोलेल असं आम्हांला तरी कसं वाटावं ? आईची खात्री झाली होती. माझी खात्री झाली नव्हती असं नाहीं—मला थोडासा संशय होता. तुझ्या वडिलांनीं प्रायश्चित घेतलं असं त्यांनीं सांगितलं, त्यावेळीं मला तें खरं वाटलं. ते म्हणालेच मुळीं, कीं 'गोदूनें प्रायश्चित घेतलें नाहीं'—पण त्याचवेळीं त्यांनीं सांगितलं, कीं अज्ञान असल्यामुळं गोदूला प्रायश्चित्त घेण्याची जरूरी नाहीं. गोष्ट त्यांनीं इतकी बनवून सांगितली कीं खोटेपणाचा तिला वाससुद्धां आला नाहीं. पण पुढचा प्रकार मात्र मोठा विलक्षण होता. त्यांनीं माझ्या आईलाही प्रायश्चित करायला सांगितलं—"

मी चटकन् विचारलें, "तें काय म्हणून ?"

छबी हंसत हंसत म्हणाली, "तुला स्वतःला वाटतं तितकी तूं घोरणी नाहींस. मी आधींच सांगितलं होतं, माझ्या घरीं खाण्यापिण्यांत तुझ्या हातून पाप घडल्याचं जसं ठरतं तितक्याच प्रमाणांत तुला खायला घालणारं माणूसही दोषी ठरतं. धर्म म्हणजे असा, कीं उच्चवर्णाच्या माणसानं कमी जातीच्या माणसाकडे कांहीं खायला मागितलं, तरी त्यानं तें द्यायचं नाकारलं पाहिजे. पाप करायचं एकानं कबूल केलं तरी दुसऱ्यानं त्याला मदत करतां नये. त्यामुळं मदत करणाऱ्याचं पाप दुप्पटीचं ठरतं, असा शास्त्राधार आहे, असं बापू भटजींनीं सांगितलं. मलाही तें खरं वाटलं. मनाचे संस्कार आहेत कीं नाहीं ? कळूं लागल्यापासून आपण पापपुण्याच्या गोष्टी ऐकत असतों—कानीं कपाळीं हरघडीला 'हें पाप, हें पुण्य' असं आपलं रोज ऐकावं लागत असतं. मनावर त्याचा परिणाम होतो ना ? तो अगदीं अंतःकरणाला भिनून जात असतो. तुला खायला देतांना देखील मला असंच वाटलं होतं. तुझी तयारी असली म्हणून काय झालं, मी त्या पापाची वाटेकरी कां व्हावं ? तुला आठवत असेल, मी तसं बोलूनही दाखवलं होतं. आणि आतां बापूभटजींनीं जेव्हां हें सांगितलं तेव्हां तीच आठवण पुढें उभी राहिली—आणि त्यामुळंच त्यांचं म्हणणं मला खरं वाटलं."

बापूभटजींच्या करामतीचें मला कौतुक वाटलें. स्वार्थासाठीं माणूस किती खोटें बोलतो हा ! प्रामाणिकपणानेंच वागायचें तर बापूभटजींना आमचें घर वर्ज्य करतां आलें असतें.

त्यांचे शब्द मला आठवले. त्या स्वार्थी वृत्तिचा मला किळस आला. स्वतःच्या स्वार्थासाठीं सच्छील दिसणारा वयोवृद्ध गृहस्थ आज घडघडीत खोटं बोलून प्रामाणिक माणसाची बदनामी करतो, याची मला चीड आली. मला चटकन् आठवण झाली आणि मी छबीला विचारलें, " बाबांनीं प्रायश्चित घेतलं असं बापूभटजींनीं सांगितलं का ? केव्हां प्रायश्चित घेतलं म्हणून सांगितलं? "

छबीनें उत्तर दिलें, " त्यांनी सांगितलं, कीं प्रायश्चितविधी उरकून आतांच आलों. ही परवांची गोष्ट. "

शाळा सुटून आम्हीं शाळेच्या बाहेर पडलों. बापुभटजींचें घर मला माहीत नव्हतें. कमाला माहीत होतें. छबीला घरीं जायला वेळ होईल म्हणून ती जरा कुरकुरत होती पण मी आग्रह केला.

आम्ही तिघीही त्यांच्या घरीं गेलों, पण ते घरीं नव्हते. वेदशाळेंत गेले होते. मला आनंद झाला. वेदशाळेंतच त्यांना गांठायचें असें आम्हीं ठरविलें आणि त्याप्रमाणें तडक आम्ही वेदशाळेंत गेलों.

वेदशाळेच्या दाराशीं तीन मुली आलेल्या पहातांच सर्व मंडळी थक्क झाली. मुलांचे पाठ सुरू होते ते एकदम बंद राहिले. वेदशाळेचे गुरुजी बाहेर आले आणि म्हणाले, " मुलींनों, काय काम आहे तुमचं ? ही वेदशाळा आहे हें तुम्हांला माहीत आहे ना ? आधीं तुम्हीं मुली, त्यांतून या दोन मुली ब्राम्हण दिसत नाहींत. बायकांनीं वेदघोष ऐकूं नये—शूद्रानांहीं तोच प्रतिबंध आहे. वेदघोष ऐकला तर शूद्राच्या कानांत तापलेल्या शिशाचा रस ओतावा अशी शास्त्राज्ञा आहे, हें कदाचित तुम्हाला माहीत नसेल—"

मी जरा पुढें सरून म्हटलें, " खरोखरच माहित नाहीं. मला जिथं माहित नाहीं तिथं या बिचाऱ्यांना कसं माहीत असणार ? पण माझं फार जरूरीचं काम आहे. आपली भेट झाली हेंच माठं भाग्य. "

गुरुजी साशंक मुद्रेनें माझ्याकडे पाहूं लागले. त्यांचा प्रश्न मला अंदाजानेंच कळला. मी म्हटलें, " क्षमा करा, आधीं मी कोण आहें तें आपल्याला आधीं सांगितलं पाहिजे होतं. गोखले प्रांतसाहेबांची मीं मुलगी—" गुरुजी एकदम दचकले, मी पुढें बोलूं लागलें, " गोखले प्रांतसाहेबांची मीं मुलगी, माझं नांव गोदू. ही सुर्व्यांची छबी, हिच्या घरींच मी लाडू खाऊन पाणी प्यायलें. रत्नागिरींत ज्यांची चर्चा होत आहे त्याच या आम्ही दोघी. "

गुरुजी किंचित हंसून म्हणाले, " असं का ? मुली, तूं मोठी धीट दिसतेस, पण तुझ्या वयाला हें शोभत नाहीं. ठीक ! ठीक ! माझ्याकडे काय काम आहे तुझं ? "

" आपल्याला ऐकून घ्यायला थोडी फुरसत आहे का ? " मी मोठ्या अदबीनें विचारलें. त्यांनीं होकारार्थी मान हालवितांच मी बोलण्यास सुरवात करणार होतें पण त्यांनी मला जरा थांबण्यास सांगून आंतून दोन चटया मागवून घेतल्या. एका चटईवर ते स्वतः बसले आणि दुसऱ्या जरा दूर ठेवलेल्या चटईवर आम्ही तिघी बसलों.

मी बोलण्यास सुरवात केली पण बापु भटजी कुठं दिसत नव्हते. एका प्रकारें गुरुजी हे रत्नागिरीच्या ब्रम्हवृन्दाचे प्रमुख होते, त्यामुळें माझी फिर्याद बापूभटजींची वाट न पाहतां त्यांच्याच समोर मांडावी असा विचार करून मी म्हटलें, " आपल्या नित्य कार्यात मी विघ्न केलं त्याची मला क्षमा करा. माझ्या अब्रूचा प्रश्न आहे—माझ्या आईबापांच्या अब्रूचा प्रश्न आहे. मंडाऱ्याच्या घरीं मी पाणी प्यायलें आणि त्याबद्दल माझ्या बाबांनी प्रायश्चित्त केलें, अशी कंडी गांवांत पसरली आहे—

गुरुजी एकदम म्हणाले, " कंडी म्हणजे ? तूं मंडाऱ्याच्या घरीं पाणी प्यायली नाहींस ? "

मी उत्तर दिलें. " अर्धी बातमी खरी आहे. मी छबीच्या घरीं लाडू खाल्ला, चिवडा खाल्ला, पाणी प्यायलें, एवढी बातमी खरी आहे. माझ्या बाबांनी किंवा आईनं प्रायश्चित केलं, अशी जी बातमी पिकली आहे ती खोटी आहे. "

गुरुजी म्हणाले, " तुझ्या आईनं प्रायश्चित्त केलं असं कुणीच म्हणत नाहीं. अज्ञान असल्यामुळं प्रायश्चित्ताची जशी तुला जरूरी नाहीं तशीच विवाहीत असल्यामुळं तुझ्या आईला प्रायश्चित्ताचा अधिकार नाहीं. प्रायश्चित्ताचे अधिकारी तुझे वडील आणि त्यांनीं प्रायश्चित्त केलं हें योग्यच झालं. "

" त्यांनीं केव्हां प्रायश्चित्त केलं ? "

" त्यांनीं केव्हां प्रायश्चित्त केलं तें मला माहीत नाहीं, पण त्यांनीं प्रायश्चित्त घेतलं, एवढंच मला माहीत आहे. "

" कुणि सांगितलं हें आपल्याला ? "

" खुद्द बापू भटजींनीं! त्यांनींच माझ्याकडून शास्त्राधार काढून नेला आणि विधि उरकल्यावर मला येऊन तसं कळवलं."

" बापूभटजींना यावेळीं बोलावतां येईल का ?

"हो हो–तर! ते आंतच आहेत." असें ह्मणून गुरुजींनीं त्यांना हांक मारली.

बापूभटजी बाहेर आले आणि चोरासारखे उभे राहिले. मनांतून ते घाबरले असावे पण तसें न दिसूं देण्याची ते खबरदारी घेत होते. ते बाहेर आलेले पहातांच मी त्यांना नमस्कार केला आणि गुरुजींकडे वळून ह्मटलें, " क्षमा करा गुरुजी, मी आपल्याला त्रास तर देतेंच आहे, पण माझ्यामुळं बापू भटजींनाही निष्कारण गैरसोय सोसावी लागणार. आपण त्यांना एवढं विचारा, कीं बाबांनीं प्रायश्चित केव्हां केलं ?"

गुरुजींच्या प्रश्नाची वाट न पहातां बापूभटजी मोठ्यानें हंसत ह्मणाले, " यांत कसली माझी गैरसोय ? परवांच साहेबानीं प्रायश्चित्त घेतलं–त्याच वेळीं मी गुरुजींना सांगितलं आणि छबीच्या आईलाही सांगितलं. वेद शाळें-तल्या सर्व मंडळींना ही गोष्ट माहीत आहे."

बेमालूम खोटें बोलण्याचा बापूभटजींचा हा धडाका पाहून मी क्षणभर स्तंभित झालें. पण खोटें बोलण्याचें माप त्यांच्या पदरांत अचूक घालण्याची खात्री असल्यामुळें मी जरा नमतें घेऊन ह्मटलें, " क्षमा करा गुरुजी, आणि बापू भटजी, तुह्मींही क्षमा करा. पण हा प्रायश्चित्त विधी कुठं झाला ?–या वेद शाळेंत का ?"

पुन्हां मोठमोठ्यानें हंसत बापू भटजी ह्मणाले, " वेद शाळेंत कशाला ? तुमच्या बंगल्यावर जागा काय थोडी आहे ! तिथंच विधी झाला. मला वाटतं, ताईसाहेब, तुह्मीं कुठं बाहेर गेला होतां. बाबीशेटच्या घरीं गेलां होतां वाटतं !–त्यावेळीं विधी झाला. मी विचारलं सुद्धां साहेबांना. कारण तुम-चेंही अभिषिंचन करावं असं मी साहेबांना सुचवलं होतं. पण तुमचा स्वभाव जाणून त्यांनीं तें नाकारलं." बापू भटजी बोलत असतांना घुटमळले, मी हंसलें. गुरुजींनाही संशय आला.

मी हात जोडून उभी राहून ह्मटलें, " गुरुजी, मला क्षमा करा. बापूभटजी, तुह्मींही क्षमा करा. चमत्काराचा काळ या युगांत गेला असा माझा समज होता. पण तो खोटा ठरला. गुरुजी, एक चमत्कार तरी घडून आला असला

पाहिजे किंवा हे खोटं तरी बोलत असले पाहिजेत. यांच्यासारखे वेढोनारायण खोटं बोलतात असं मंडाऱ्यांच्या घरीं पाणी पिणाऱ्या माझ्यासारख्या मुलीनं कसं बोलावं? तेव्हां चमत्कार घडून आला हेंच खरं. गुरुजी, माझे बाबा फिरतीवर जाऊन आठ दिवस झाले आणि आज सकाळीं दहा वाजेपर्यंत ते परत घरीं आले नव्हते. वाटल्यास आपण त्यांच्या हपीसांत चौकशी करा?"

बापूमटजींचा चेहरा काळा ठिक्कर पडला. गुरुजी रागानें तांबडेलाल झाले आणि ह्मणाले, "तुमच्यासारखीं माणसंच वैदिकवृत्तिचा नाश करताहेत बापू! खोटं बोलणं गृहस्थाला तर शोमत नाहींच पण वैदिकांनं खोटं बोलणं ह्मणजे गोमांससेवनासारखं आहे. आह्मीं पुरोहितवर्गच जर असे वागूं लागलों तर गृहस्थाला धडा कसा मिळणार! प्रायश्चित्त घ्यायला गोखले साहेब कबूल आहेत कीं नाहीं हें विचारण्याची सवड होईपर्यंत तुह्मीं वाट पाहिली पाहिजे होती. तोपर्यंत त्यांचं घर वर्ज्य करायला पाहिजे होतं. इंग्रजी शिकलेल्या लोकांच्या दृष्टीनं आह्मीं कदाचित मूर्ख ठरत असूं, पण आह्मीं प्रामाणिक राहिलं पाहिजे. मूर्खपणाचा डाग पत्करेल, कालान्तरानं लोकांचीं मतं बदलतील किंवा बदलणारही नाहींत, पण लबाडीच्या जोरावर वैदिक वृत्तिचं पोषण होणार नाहीं हें बापूमटजी, तुह्मांला कळायला पाहिजे होतं. तुमच्यामुळं या एवढयाशा मुलीसमोर मान खालीं घालायचा आह्मांला प्रसंग आला आहे—" असें बोलून ते माझ्याकडे वळून ह्मणाले, "मुली, आमच्या दृष्टीनं तुझ्या हातून पाप घडलं आहे, या पापाचं प्रायश्चित्त तूं करणार आहेस कीं नाहीं?"

मी ठासून उत्तर दिलें,—"तुमच्या दृष्टीनं मी पापी असेन, मला तसं वाटत नाहीं. मी प्रायश्चित करणार नाहीं, आणि माझ्यासाठी माझ्या बाबांनाही प्रायश्चित करूं देणार नाहीं. यामुळं मला घर टाकून बाहेर निघावं लागलं तरी चालेल."

असें ह्मणून मीच चटकन् उठलें, गुरुजींना नमस्कार केला आणि माझ्या दोन्ही मैत्रिणींचा हात धरून मी रस्ता सुधारला.

बापूमटजींचा आणि गुरुजींचा खटका उडणार यांत शंकाच नव्हती. तो पहायला आपण स्वतः हजर रहावें असें मला वाटलें नाहीं.

प्रायश्चित्ताच्या बातमीप्रमाणें ही बातमीही दुसऱ्याच घटकेला सर्वतोमुखीं झाली.

बापूमटजी आपल्या पुतण्याला भेटण्याकरितां मुंबईला गेले, असें मला दुसऱ्याच दिवशीं कळलें.

## प्रकरण १५ वें

# धेड–ब्राम्हण

बापू भटजी रत्नागिरी सोडून गेल्यामुळें ग्रामण्याचा विषय सर्वतोमुखीं झाला. रस्त्यावरून जाणारा प्रत्येक मनुष्य माझ्याकडे बोट दाखवूं लागला. मलाही तेंच पाहिजे होतें. रत्नागिरीला आल्यापासून बराच काळ मी लोकांच्या नजरेंत न आल्यामुळें मला जें मृतप्राय वाटत होतें त्याची एकदांची भरपाई झाली.

आतां मला कुणाचें बंधन राहिलें नव्हतें. फिरतीवरून आल्यावर सारी हकीकत ओघाओघानें बाबांच्या कानीं गेली. त्यांच्या नित्याच्या स्वभावा-प्रमाणें त्यांनीं ती फारशी हिशोबांतही घेतली नाहीं.

मात्र एक दिवस वेदशाळेचे गुरुजी मुद्दाम त्यांच्या भेटीला आल्यामुळें प्रायश्चित्ताच्या विषयाचा पुन्हां एकदां उहापोह झाला. प्रायश्चित घेण्याविषयीं गुरुजींनीं बाबांना एक प्रकारची आग्रहाची सूचना केली, त्यावेळीं बाबा म्हणाले, “ अशी प्रायश्चित्तं आम्हीं घेऊं लागलों तर तीं दररोजचीं होतील. आम्हीं सरकारी अधिकारी, वारंवार गावोगांव फिरावें लागतें, वाटेल त्यावेळीं वाटेल तिथं जेवणाखाण्याचीं व्यवस्था करावी लागते; शिवाय हा आमचा क्लब ! साहेबांच्या पंक्तीचा रोजचा लाभ ! तिथले स्वयंपाकी कोण आहेत तें तुम्ही जाणताच. अशा परिस्थितीत आम्हीं प्रायश्चित्त घेऊं लागलों तर तासाला एक पडेल. वर्षाला श्रावणी होतेच आहे—ती मात्र कधीं चुकवित नाहीं. त्यावेळीं उभ्या वर्षाचीं प्रायश्चित्तं होऊन जातात. आमचं प्रायश्चित्त झालं कीं सर्व कुटुंबाचा त्यांत समावेश होतोच. ”

बाबांच्या या उत्तरानें गुरुजींचें समाधान झालें कीं नाहीं तें जरी सांगतां येणार नाहीं, तरी ते निरुत्तर झाले एवढें मात्र खरें. गुरुजींचा स्वभाव फार सरळ असे. त्यामुळें बाबांनीं अगदीं मोकळ्या मनानें दिलेलें हें उत्तर त्यांना रुचलें. उगीच उडवाउडवी केली असती तर वादविवाद करायला त्यांनीं माघार घेतली नसतो. बाबांनीं सांगितलेली परिस्थिति अपरिहार्य होती याची

त्यांना जाणीव होती. समारोपादाखल ते म्हणाले, " आपलं म्हणणं अक्षरशः खरं आहे. सेवावृत्ति ब्राह्मणाला वर्ज्य आहे असें असतां आम्ही ती पत्करली आहे. त्यांतून ही यवनांची सेवा. एकदां सेवावृत्ति पत्करल्यावर पापापुण्याचा प्रश्न संपला, असं म्हटल्याखेरीज गत्यंतर नाहीं. पेन्शन घेतल्यावर एकदां साऱ्याच पापाचीं प्रायश्चित्तं करून पुन्हां ब्राम्हणाच्या कर्मकांडाकडे लक्ष देण्याचा एव्हांपासुनच अंतरीं निश्चय ठेवावा म्हणजे झालं. "

एवढयावर तो विषय संपला. पेन्शन घेतल्यावर बाबा सर्व पापांची प्रायश्चित्तें करणार या एकाच आधारावर माझा मार्ग मोकळा झाला. अमुकाच्या घरीं खावें आणि अमुकाच्या घरीं खाऊं नये हें बंधन नाहींसे झालें. आठवड्यांतून एकाददुसरा दिवस बाबीशेट यांच्या घरीं मी उघड उघड जेवायला रहात असें. आजूबाजूला त्याची चर्चा होत असे—नाहीं असें नाहीं—पण हळुहळु तो विषय अस्ताला जात चालला कुणी कांहीं चर्चा करो त्याची मला क्षिति वाटेनाशी झाली. लोकांनाही हळुहळु ती गोष्ट पचनीं पडूं लागल्यासारखी वाटूं लागली आणि घरचा विरोध नसल्यामुळे त्या प्रकाराचें महत्त्व अजिबात नाहींसें झालें.

एवढया लहान वयापासून ब्राम्हणेतरांच्या घरीं जेवणाखाण्याचा सराव पडल्यामुळें जातिभेदाचें किंवा जातिद्वेषाचें बीज माझ्या अंतःकरणांतून नाहींसें झालें.

असेंच कांहीं दिवस गेले. माझा अभ्यास सुरळीत चालला होता. मी ज्या शाळेंत जात असें ती शाळा मिशनरी शाळा होती. हायस्कुलांत चौथ्या इयत्तेपासुनचे पुढले वर्ग होते. आमच्या शाळेंत मॅट्रिकच्या वर्गापर्यंतची जरी सोय होती तरीही चौथ्या पांचव्या इयत्तेपुढील मुलें मिशनरी शाळा सोडून सरकारी हायस्कुलांत जात असत आमचा दादा हायस्कुलांतच जात असे, त्यामुळें मला केव्हां एकदां हायस्कुलला पाय लागेल असें झालें होतें.

त्या काळांत एकाच वर्षांत एक इयत्ता करण्याचें बंधन नव्हतें. मी पहिल्यानें जरी इंग्रजी पहिल्या इयत्तेंत बसलें होतें तरी घरीं मास्तर ठेवून मला पुढच्या इयत्तांचें शिक्षण देण्यांत येत होतें. दुसऱ्या सहामाहीला मला एकदम तिसरींत घेण्यांत आलें. एका वर्षांत तीन इयत्ता करून दुसऱ्याच वर्षी हायस्कूलच्या

पायरीवर पाय देण्याची माझी तयारी चालली होती. " आमची गोदू चव-दाव्या वर्षींच मॅट्रिकला बसेल आणि आपल्या दादाला मान खालीं घालायला लावील " असें बाबा वारंवार बोलून दाखवीत असत. दादाला त्याचें वैषम्य वाटत असे आणि त्यामुळें त्याच्या माझ्या मधला जिव्हाळ्याचा दुवा दिवसें-दिवस तुटत जाऊं लागला होता.

या गोष्टीचें बाबीशेट तात्यांच्या घरींही सदोदित कौतुक होत असे. या कौतुकाच्या पायीं मला आणखीं एक मित्रलाभ घडला. या नवीन मित्राच्या लाभामुळें माझ्या पुढील आयुष्यावर मोठाच परिणाम घडला असल्यामुळें त्याची सविस्तर हकिकत देणें जरी अवश्य आहे तरी फारसा विस्तर होऊं न देतां मी ती थोडक्यात नमूद करून ठेवणार आहें.

दोस्ती करायची तो आपल्यापेक्षां कितीतरी मोठ्या माणसांशीं, हें माझें एक प्रकारचें वेडच होतें. मला हे जे नवीन दोस्त लाभले ते जिल्ह्याचे फारच मोठे अधिकारी होते. ते तेथील सिव्हिल हॉस्पिटलचे सिव्हील सर्जन--म्हणजे डॉक्टर होते. रत्नागिरीच्या भाग्यानें म्हणा किंवा दुर्भाग्यानें म्हणा, रत्नागिरीचे जिल्ह्याचे अधिकारी बहुतेक हिंदीच असत. ज्या काळाची हकिकत मी लिहित आहें त्या काळांत तेथील कलेक्टर आणि जज्ज पारशी होते, इंजिनि-यरही पारशी होते, सिव्हील सर्जन महाराष्ट्रीय होते, पोलीस सुपरिंटेंडंट आणि एकदोन असिस्टंट कलेक्टर आणि कस्टम खात्याचे अधिकारी हेच काय ते युरोपियन होते.

या सिव्हील सर्जनांचे नांव डॉ. किर्तीकर. सर्वसाधारण लोकांत हे जितके लोकप्रिय होते तितकाच इतर अधिकारी वर्गाला त्यांचा दरारा होता. ऑफि-सर लोकांच्या क्लबाचे ते अध्यक्ष होते. त्यामुळें एक प्रकारें ते त्यांच्यावर सामाजिक सत्ता गाजवित असत. वरिष्ठपणाची जाणीव असलेल्या अधिका-ऱ्यांत ते जितक्या दिमाखानें वागत असत, तितक्याच प्रेमळपणानें रस्त्यावर दंगल करणाऱ्या मुलांबाळांत ते लोकप्रिय झाले होते. डॉक्टरांची सारवट गाडी रस्त्यानें जाऊं लागली कीं पोरांचा घोळका "याम् याम् सायबा" करीत त्यांच्या गाडीमागून धांवत असे. त्यावेळीं तीं मुलें दृष्टीआड होईपर्यंत मागें वळून तोंडभर हंसणारा " रामराम " म्हणून मोठ्यानें ओरडणारा त्यांचा तो आतृमुखी चेहरा रत्नागिरीकरांच्या स्मरणांतून केव्हांही जाणार नाहीं.

तात्यांच्या घरच्या रोग्यापैकीं एका रोग्याला पहाण्यासाठीं ते एके दिवशीं आले होते. मी त्यावेळीं त्यांच्या घरीं होतें. मला पहातांच स्पष्ट आणि स्वच्छ मराठी शब्दोच्चार करणाऱ्या निर्मळ वाणीनें त्यांनीं तात्यांना विचारलें, " ही कोण मुलगी ? तुमच्या घरचीं दिसत नाहीं. कुणी पाहुणी आली आहे वाटतं ?"

एकदां पोटभर हंसून तात्या म्हणाले, " आमच्या घरची म्हटली तर घरची आहे. नाहीं म्हटलीं तर नाहीं. मोठी व्रात्य कार्टी आहे. आईबापांनीं तिचं नांवच टाकलं आहे म्हणाना ! रिकाम्या वेळांत ती बहुतेक आमच्या इथंच असते. ही आमच्या गोखले प्रांतसाहेबांचीं मुलगी. हिचं नांव गोदू. इंग्रजी शाळेंत जात असते. एका वर्षांत तीन यत्ता करून पुढल्या वर्षीं हायस्कूलांत जाण्याचा चंग बांधून बसली आहे–"

डॉक्टर मधेंच म्हणाले, " मुलगी मोठी हुशार दिसते. तुझं नांव गोदू का ? गातां येतं कां तुला ? "

हा प्रश्न अनपेक्षित होता. मी नुसती त्यांच्या चेहऱ्याकडे पहात राहिलें. त्यावेळीं माझ्या पाठोवर एक थाप मारून बाबोशेटना उद्देशून ते म्हणाले, " हीच कां ती हुशार मुलगी ! तोंडांतून एक शब्दसुद्धां निघत नाहीं ! "

तात्या पुन्हां मोठमोठयानें हंसले आणि म्हणाले, " अजून तोंड उघडोत नाहीं म्हणून ठीक आहे. एकदां बोलूं लागेल तर साहेबांना देखील बोलण्यांत हटवील ! "

" बोलण्यांत ती काय हटवते मला ? " डॉक्टर म्हणाले, " डॉक्टरींत मी माघार घेईन पण बोलण्यांत घेणार नाहीं. " पुन्हां मला आपल्या समोर उभी करून दोन्ही गुडघ्यावर हात ठेवून माझ्याकडे पहात ते म्हणाले, " तुला गातां येतं का गोदे ? "

मी अगदीं ओशाळून गेलें. माझी मलाच लाज वाटली. मला गातां येत नव्हतें. मी नुसती हंसलें. मी नुसती नकारार्थी मान हालवली, त्यावेळीं ते माझ्या पाठोवर हलुहलू चापट्या मारीत म्हणाले, " असं ! असं ! म्हणून ओशाळलीस वाटतं ! त्यांत कांहीं एवढं वाईट वाटायला नको. ती तुझ्या वडिलांची चूक आहे. शिकवलंच नाहीं कुणि–तर तुला तरी कुठून गातां यावं ! तुला गाण्याचा आवाज आहे का ? "

मी अगदीं थंडपणें म्हटलें, " शाळेंत कविता म्हणतें, त्यावरून आवाज आहे असं वाटतं–पण गाण्याचा आवाज आहे कीं काय तें कांहीं कुणि पाहिलं नाहीं ! "

जवळची खुर्ची ओढून घेऊन डॉक्टर बसले त्यावेळीं माझे धाबें दणाणलें. आतां बहुतेक हे माझी परीक्षा घेणार असें मला वाटलें. आणि खरोखर तसेंच झालें. एका हातानें चष्मा वर सारून ते माझ्याकडे पहात म्हणाले, " आतां म्हण पाहूं एक कविता. "

लाजण्याची वृत्ति हृदयांत जोरानें उसळत होती. पण माझा बंडखोर आत्मा तितक्याच जोरानें झगडण्यासाठीं जागा झाला होता. लाज शरम पार नाहीशी झाली, मी ठिकाणावर आलें, आणि खुल्या आवाजानें कविता म्हणायला सुरुवात केली.

" अरे वा ! तुझी आवाजी चांगलीच दिसते—या पूर्वींच तुझ्या आवाजीवर मेहनत घेतली पाहिजे होती. इतक्यांत सुंदर गाऊं लागली असतीस. पाहिलंत ? या चलाख मुलाची आईबापं अशीं मूर्ख असतात ! आपल्या मुलींचा गळा किती गोड आहे याची ज्यांना जाणीव नाहीं त्यांनीं असल्या मुलांचे आईबाप तरी कां व्हावं ? असं पहा गोदे, एकदां आमच्या बंगल्यावर ये. तुला आमच्या लिमयेबुवांच्या स्वाधीन करतों. " असें म्हणून डॉक्टर उठले.

रोग्याच्या औषधाबद्दल ज्या कांहीं सूचना द्यायच्या त्या देऊन झाल्यावर पुन्हां एकदां माझ्याकडे वळून म्हणाले, " ऐकलंस गोदे, आवाजी चांगली तयार कर. ईश्वरानं तुला उत्तम गळा दिला आहे. ईश्वरदत्त देणगीची अशी उपेक्षा करणं बरं नव्हे. मीच एक दिवस येतों आणि तुला घेऊन जातों आमच्या बंगल्यावर. मग कांहींच संकोच रहाणार नाहीं. पण तुझी आई तुला पाठविल ना आमच्या बंगल्यावर ?"

" कां पाठवणार नाहीं ? " मी विचारलें.

" अग मी बाटगा आहें. " डॉक्टर हंसत हंसत म्हणाले, " विलायतेला जाऊन आलेला आहें. आमच्या घरचा सैंपाकी गोव्यांचा किरिस्तांव आहे, आणि कोठीवाला—बटलर म्हणतात त्याला—सुरतेचा घेड ब्राम्हण आहे. "

ब्राह्मणाची ही नवी जात मला माहीत नव्हती. जिज्ञासा क्षणभर बाजूला ठेवून मी उत्तर दिलें, " त्यांत काय आहे ? मी भंडाऱ्याच्या घरीं खाल्लं म्हणून बापूभटजींनीं ग्रामण्य माजवलं होतं. आतां तें चांगलं पचनी पडलं आहे माझ्या. "

डॉक्टर मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, " भंडारी पत्करले, पण हा घेड ब्राह्मण पटायचा नाहीं बरं पोरी. एकदां ये तर खरी, मग पाहूं या पुढल्या गोष्टी. तुझ्या बापाला सारी कांहीं संवय आहे. हे बाप मोठे लबाड असतात. आपण वाटेल तें करतात पण पोरांना बंधनं घालतात. आपण कसे वागतात याची घरीं दाद सुद्धां लागूं देत नाहींत. " एवढेंच बोलून ते निघून गेले. दुसरा रोगी तपासायला जायची त्यांना घाई होती.

मी तात्यांना विचारलें, " घेड ब्राह्मण म्हणजे काय हो तात्या ? "

तात्यांनीं उत्तर दिलें, " कोकणच्या ब्राह्मणाला चित्पावन ब्राह्मण म्हणतात—देशांतून कोंकणांत उतरलेल्या ब्राह्मणांना कऱ्हाडे म्हणतात—देशावरच्याला देशस्थ म्हणतात—तसंच सुरतेच्या ब्राह्मणाला घेड ब्राह्मण म्हणतात. " असें म्हणून डोळे मिचकावित आजूबाजूच्या मंडळीकडे पाहून तात्या हंसले. यांत कांहीं तरी खोंच आहे हें तेव्हांच माझ्या ध्यानीं आलें, पण मी पुन्हां प्रश्न केला नाहीं.

घरीं गेल्यावर आईला पुन्हां तोच प्रश्न केला. तिला त्या प्रश्नाचें आश्चर्य वाटलें. ती म्हणाली, " घेड ब्राम्हण म्हणजे काय तें मला माहीत नाहीं. घेड आणि ब्राम्हण हीं जातींची अगदीं दोन विरुद्ध दिशेचीं टोकं आहेत. उंचांतला उंच म्हणजे ब्राम्हण आणि नीचांतला नीच म्हणजे घेड. घेडाच्या हातचं कुणि पाणि तर घेत नाहींच पण त्यांची नुसति सांवली पडली तरी सचैल स्नान करतात. "

मी कुतूहलानें विचारलें, " मग डॉक्टर कितींकरांच्या घरीं हा घेड कसा वावरतो ! ते ब्राम्हण आहेत ना ? "

आई हंसली आणि म्हणाली, " नाहीं, ते ब्राम्हण नाहींत—ते पाठारे प्रभु आहेत. ही जात आपल्या इकडल्या भागांत नाहीं. आपल्या इकडे जे प्रभु आहेत ते कायस्थ प्रभु आहेत. पाठारे प्रभु फक्त मुंबईतच आहेत. तो क्षत्रि-

यांचा एक पोटभेद आहे. तरीपण त्यांच्या घरींसुद्धां घेड कसा वावरतो हें मोठं आश्चर्य आहे ! एकादा शूद्रसुद्धां घेडाची सांवली घेणार नाहीं. ”

माझी जिज्ञासा अतृप्त राहिली. प्रत्यक्ष योगायोग येण्याची मी वाट पहात बसलें.

दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं डॉक्टर आमच्या बंगल्यावर आले. तो रविवार होता. बाबा घरींच होते. ते आले त्यावेळीं मी दिवाणखान्यांत नव्हतें, त्यामुळें बाबांचें व त्यांचें काय बोलणें झालें तें मला कळलें नाहीं.

बाबांनीं मला बोलावून घेतलें आणि दिवाणखान्यांत येऊन पहातें तो तेथें डॉक्टर बसलेले. मला पहातांच ते एकदम खुर्चीवरून उठले आणि “ चल आतां आमच्या बंगल्यावर. ” असें म्हणाले.

परवानगी मागण्याच्या सूचक मुद्रेनें मी बाबांकडे पाहिलें, त्यावेळीं बाबा म्हणाले, “ जा बरं त्यांच्या बरोबर. अगदीं संकोच धरूं नकोस, ” एकक्षणभर थांबून मी बाबांना विचारलें, “ पण त्यांच्या घरीं कांहीं खाल्लंप्यायलं तर चालेल का ? त्यांचा स्वयंपाकी किरिस्तांव आहे आणि कोठीवाला घेड ब्राम्हण आहे. ”

बाबा मोठमोठ्यानें हंसूं लागले आणि डॉक्टरांच्या हंसण्याला तर पारावारच नव्हता. खुल्या अंतःकरणांतून मोकळेपणानें निघालेले हास्याचे फवारे मी बाबांच्या हंसण्याशीं ताडून पाहूं लागलें, त्यावेळीं मला केवढा तरी फरक दिसून आला. बाबांच्या हंसण्यांत संकोच होता—थोडासा दांभिकपणाही होता—कृत्रिमतेची झांक होती.

बाबा म्हणाले, “ हें असलं कांहीं विचारूं नये. विचारलं म्हणजे ‘नाहीं होय’ म्हणावं लागतं. ”

आपल्या खड्या वाणीनें डॉक्टर म्हणाले, “ हें पहा गोखले, इथंच चूक होते आहे. जे कांहीं असेल तें मुलांना स्पष्टपणें सांगावं. त्यांतून ती मुलगी आहे. तिनं माझ्या घरीं कांहीं खाऊं नये अशी तुमची इच्छा असेल तर मला तसं स्पष्ट सांगा. स्वतःचा विचार स्वतः करण्याइतकं अजून तिचं वय नाहीं. अजून तिला मार्ग दाखवला पाहिजे. तुम्हांला पसंत नसेल तर मी तिला फसवणार नाहीं. मला तसं करणं आवडत नाहीं. पण पसंत असेल तर तसं स्पष्ट सांगा.

बाबा थोडेसे ओशाळले पण सांवरतें घेऊन म्हणाले, " आम्हींच जिथं हवे तसे वागतों तिथं मुलांनां कुठल्या तोंडानं अडथळा करायचा? त्यांतून आपल्यासारखीं माणसं सारं कांहीं जाणतआहेत. मुलीला मी तुमच्या हवालीं केलीं आहे. तुम्हांला योग्य दिसेल तसंच करा. "

डॉक्टर पुन्हां एकदां हंसले. मी कपडे बदलण्यासाटीं आंत गेलें, तेवढया वेळांत चहा घेण्याचा समारंभ झाला. भटजी आंत आला आणि आईला म्हणाला, " मी पुन्हां सांगून ठेवतों असल्या किरिस्तावांचे पेले मी कांहीं उचलणार नाहीं. तस असेल तर तुम्हीं दुसरा आचारी पहा. "

" ते किरिस्ताव नाहींत. हिंदुच आहेत. " असें आईनें सांगितलें त्यावेळीं भटजी म्हणाला, " हिंदु असले तर बाटगे असतील—सुधारक असतील! आधींच तुमच्या घरांत भ्रष्टाकाराबद्दल जिकडे तिकडे बकवा झाली आहे. गांवांतील ब्राम्हण मला तोंड वर काढूं देत नाहींत. त्यामुळें मला गांवांत जायचं-सुद्धां टाकावं लागलं आहे. म्हणून सांगतों, यापुढं असा किरिस्तावांना आणि साहेबांना चहा द्यावा लागणार असेल तर हीच माझी नोटीस. "

आई नुसती हंसली आणि निघून गेली. मी डॉक्टरांच्या बरोबर त्यांच्या बंगल्यावर गेलें. हा बंगला माळाच्या एका टोंकाला होता. तिथून पाहिलें म्हणजे पलिकडे समुद्राच्या उसळणाऱ्या लाटा नजरेला पडत असत.

बंगला फारच मोठा होता पण आंत कुणिच माणसें नव्हतीं. मी डॉक्टरना विचारलें, " डॉक्टरीणबाई कुठं आहेत? "

खिन्नतेची ल्हानशी झुळूक त्यांच्या चेहऱ्यावरून निघून गेलेली मला दिसली. ते गंभीर झाले आणि म्हणाले, " मुली, मी एक अभागी प्राणी आहें. माझ्या तारुण्यातच माझी पत्न स्वर्गवासी झाली. माझ्या कुटुंबांतलीं कुणिच माणसं नाहींत असं म्हटलं तरी चालेल. मी बहुतेक माझ्या सामन्याच्या घरींच वाढलों. त्यामुळं त्या घरचीं माणसंच मला आपलींशीं वाटतात. माझ्या बायकोच्या बहिणी आणि त्यांची मुलं इथं मधूनमधून येतात तेवढाच काय तो कौटुम्बिकतेचा लाभ! एरव्हीं मी हा असा फकीर आहें. मला स्वतःला मुलं नाहींत त्यामुळं कुठलींही मुलं मला आपलींशीं वाटतात. मुलं पाहिलीं कीं मी वेडा होतों—मुलं पाहिली कीं माझा मोठेपणा विसरतों—मुलं पाहिलीं कीं

मला दुसरं कांही सुचत नाहींसं होतं—मीही एक मूक होतों–त्यांच्याबरोबर नाचतों–बागडतों–खेळतों—त्यांतच मला स्वर्गसुखाचा लाभ होतो—"

आम्हीं बोलत असतां इटलियन क्लॉथचा पेशवाई थाटाचा काळा पायघोळ बंदाचा आगरखा घातलेले, डोक्यावर पागोटें घातलेले एक किडकिडीत गृहस्थ आले. त्यांना पहातांच डॉक्टर म्हणाले, "या बुवा, ही माझी नवी मैत्रिण—गोखलेसाहेबांची गोदू. पेटी काढा पाहूं आता."

त्यांनीं टेबलावरील घंटा वाजविली त्याबरोबर एक दणकट दिसणारा उंच माणूस आला. त्याला पहातांच डॉक्टर म्हणाले, "पाहिलास गोदे, हाच तो आमचा घेडब्राम्हण. याचं नांवशिबादियार. हाच आमचा कोठीवाला." त्यांनीं शिबाला चहा आणायला सांगितलें. तीन कप चहा आला. लिमये बुवांनींसुद्धां आमच्याबरोबर चहा घेतला, हें पहातांच मला थोडें आश्चर्य वाटलें. मी त्यांना विचारणार होतें–पण तो वेळ नव्हती.

माझ्या गाण्याच्या शिक्षणाला त्या दिवसापासून सुरवात झाली.

---

## प्रकरण १६ वें

# द्रौपदीवस्त्रहरण

डॉ. कीर्तिकरांच्या बंगल्यावर माझें जाणें येणें सुरू झाल्यापासून माझ्याबद्दलच्या गांवांतल्या चर्चेला आणखी तोंड फुटलें. भंडाऱ्याच्या घरीं जेवणखाण केलेलें पचल्यामुळें आतां ही मुलगी बाटग्यांच्या घरांतूनही वावरूं लागली, असा आरोप माझ्यावर येऊं लागला.

बापूभटजी मुंबईला गेल्यापासून दुसरेच एक भटजी आमच्या घरीं येऊं लागले होते. आठवड्यांतून दोनतीन दिवस आमच्या घरीं कांहींना कांहीं तरी धर्मकृत्य असेच असे. हात चांगला ओला होण्याचा संभव असल्यामुळें असलें घबाड साधण्यासाठीं कुणि ना कुणि तरी भिक्षुक तयार व्हावा, यांत नवल नव्हतें. आमच्या घराचा गांवांत बोभाटा झाला होता पण त्या भटजींनीं त्यावर पर्याय काढला. ते म्हणत असत, “ साहेब तर साहेबच आहेत, त्यांना साहेबासारखं वागलंच पाहिजे. साहेब लोकांत मिसळल्यावर त्याच्या बाहेर जाऊन चालत नाहीं. वरिष्ठ अंमलदार जसे वागतील तसंच इतर अंमलदारांनांही वागणं भाग पडतं. मुलगी त्यांच्या आटोक्यांत नाहीं. एकुलती एक आहे, त्यामुळें आई आणि बाप उभयतां तिला फारशी जमेत धरीत नाहींत. चिरंजीव फार सालस आहेत, चांगले धर्मनिष्ठ आहेत. आपलें घर सोडून दुसऱ्याच्या घरीं पाणीसुद्धां पिणारे नाहींत. हायस्कुलांत जातात पण दुपारीं तहान लागली तर पाणी प्यायला घरीं येतात, इतके कर्मठ आहेत. बाईसाहेब म्हणजे एक मोठ्या माऊली आहेत. घरच्या सर्व पापांचा बोजा धुऊन टाकायचा मक्ता त्यांनीं घेतला आहे. किती धर्मनिष्ठ आहेत त्यांचं वर्णन सुद्धां करतां यायचं नाहीं. धर्म करण्यांत मोठा सढळ हात! देऊं लागल्या म्हणजे नको नको म्हणेपर्यंत देत असतात. अशी धर्मदाती माऊली ज्या घरांत आहे त्या घरांत कुणि कितीही पापं केलीं तर कसलीं हिशोबांत घ्यायचीं! मी बाईसाहेबांकडे पहातों आणि म्हणूनच त्यांची उपाध्येगिरी पत्करली आहे. ”

आईची ही स्तुती अगदींच अवास्तव होती असें जरी नाहीं तरी वाजवी-पेक्षां थोडिशी जास्त खुलवून सांगितलेली होती, यांत शंका नाहीं. भिक्षुक-पुराणिकांना आई सढळ हातानें दानधर्म करीत असे खरी, पण त्यांत उपाध्येबुवा सांगत इतका फाजीलपणा नव्हता. रत्नागिरींत इतर गृहस्थांच्या मानानें, त्याचप्रमाणें अधिकारी या नात्यानें, आमची गृहस्थिती इतर धनिकापेक्षां अर्थातच चांगली होती. त्यामुळें जो दानधर्म होत असे तो इतरांपेक्षां चारदोन आणे जास्तच होत असे, एवढेंच. उपाध्येबुवा या दानधर्माची हकिकत जी अतिशयोक्तीनें सांगत असत त्यांत नुसता त्यांचा स्वार्थ होता. ज्या घरीं भिक्षुक या नात्यानें जाऊं नये असें इतर ब्रह्मवृन्दांना वाटत होतें, त्या घरीं जाण्याची संधि साधण्यासाठीं उपाध्येबुवा आमच्या आईच्या उदारपणाची हकिकत अतिरंजित करून सांगत होते. वेदशाळेचे नवाथे गुरूजी आमच्या घरीं जाण्याविषयीं त्यांना बंधन घालतील या भीतीनेंच ते तसें सांगत असत. पण त्यामुळें माझा मार्ग मात्र बराच खुला झाला.

डॉ. किर्तिकरांच्या घरी लिमयेबुवांच्या तालमीत माझें गाण्याचें शिक्षण पद्धतशीर रितीनें चालले होतें. डॉक्टरांच्या घरीं दर रविवारीं भजन होत असे. त्या भजनाची पदें म्हणण्याचें काम हळुहळु एकट्या माझ्यावरच पडूं लागलें. डॉक्टरही भजन म्हणत असत. त्यांचा आवाज खडा होता, सुरेल होता, पण गाण्यांतल्या बारकाया त्यांच्या आवाजातून निघत नसत. खटका, मुरकी आणि मींड माझ्या आवाजांत चांगलाच होती. तानेचाही अभ्यास जोरानें चालला होता. त्यामुळें माझ्या भजनाला जास्तच रंग येत असे आणि म्हणूनच भजनाची कामगिरी हळुहळु सर्वस्वी माझ्यावरच पडूं लागली.

डॉक्टर प्रार्थना सामाजिस्ट होते. प्रार्थनासमाजाला सगुणोपासना मान्य नाहीं. तरीही देवळांत कीर्तन वगैरे झालें तर जाण्याची त्यांना आवड असे. सदासर्वकाळ साहेबी थाटात वावरत असल्यामुळें ते बाटगे आहेत, क्रिस्तोधर्म स्वीकारलेले आहेत, असे आरोप गांवचे लोक बिनदिक्कत करीत असत. सर्व साधारण नागरिकांना तें खरेंही वाटे.

माझे गायनगुरू लिमयेबुवा यांचा पेशा हरिदासाचा होता. गावांत मधून मधून त्यांचीं कीर्तनें होत असत. त्यांच्या कीर्तनाला माझी आई वारंवार जात असे, तिच्या तोंडून त्यांच्या कीर्तनाची तारीफ मी ऐकत असें.

कीर्तनें बहुतेक रात्रीच्या वेळीं होत असल्यामुळें आई मला आपल्याबरोबर कीर्तनाला नेत नसे. डॉक्टरांच्या बंगल्यावरही कांहीं शिष्ट मंडळीसाठीं म्हणून त्यांचीं कीर्तनें होत असत पण तीहीं रात्रीच्या वेळींच होत असल्यामुळें मला जाणें अशक्य होत असे. कीर्तनाची तारीफ वारंवार ऐकत असल्यामुळें ती ऐकण्याची माझी उत्कंठा वाढत होती.

या उत्कंठेची तृप्ति होण्याचा योग एके दिवशीं सहजासहजीं आला. गांवांतील विठोबाच्या देवळांत बुवांचें कीर्तन ठरलें होतें. साहेब म्हणाले, (डॉ. कीर्तीकरांना सर्व नुसते साहेबच म्हणत असत,) "आज आपण तुमच्या कीर्तनाला येणार."

बुवा मोठमोठ्यानें हंसले आणि म्हणाले, "तें अगदीं अशक्य आहे. लोक तुम्हांला देवळांत येऊं देणार नाहींत. त्यांतून आपण देवळांत येणार कसे? आपली ही बूटपाटलोणींची संवय. घरांत धोतर सुद्धां नाहीं. देवळांत सगळा बैठकांशीं कारभार. आधीं पाटलोण घालून आपल्याला कुणि देवळांत येऊं देणार नाहींच—पण त्यांतून येऊं दिलंच तर पाटलोण घालून आपण बैठकीवर बसणार कसे? आणि डोक्याला काय घालणार? उघड्या डोक्यानें तर आपल्याला येतां येत नाहींच, कारण आपण शेंडीला रजा दिली आहे. हे साहेबी थाटाचे केंस देवळांच्या आवारांत यायला आपल्याला आड येतील."

डॉक्टर आपल्या खड्या आवाजांत मोठमोठ्यानें हंसले आणि म्हणाले, 'ठीक आहे. पहा तर आतां. आज तुमच्या कीर्तनाला विठोबाच्या देवळांत येतों—नुसता कीर्तनाला येतों एवढंच नाहीं—तर साऱ्या शास्त्रीपंडितांनीं मला आज रात्रीं अग्रमान दिला नाहीं, तर मिशी उतरून देईन." माझ्याकडे वळून ते म्हणाले,—"तूं येशील का ग गोदे?"

मला तेंच पाहिजे होतें. मी म्हटलें, "येईन—पण मला पाठवणार कोण? ही कीर्तनं मेलीं रात्रींची होत असतात. आई स्वतः जाते—चांगली गाडींतून जाते. पण मी हट्ट धरला तरी मला नेत नाहीं. जागरण होईल म्हणते. मग मी कशी येणार कीर्तनाला?"

"एवढंच ना?" साहेब म्हणाले, "मी स्वतः येऊन तुला घेऊन जाईन."

त्या रात्रीं मोठी गम्मत झाली. बाबा व्हरंड्यांवर इझीचेअर टाकून बसले होते. मी दिव्याजवळ पुस्तक वाचित होतें. दुसऱ्या दिव्याजवळ दादाचा अभ्यास चालला होता. आई घरांत होती.

दाराशीं कुणाची तरी गाडी थांबली. साहेबच आले असावे असें मला वाटलें पण पहातें तो भलतेच गृहस्थ गाडींतून खालीं उतरले.

बाहेर काळोख होता. व्हरंड्यावरच्या दिव्याचा अंगणात अंधुक प्रकाश पडत होता तेवढाच. त्या प्रकाशांतून येणारी मूर्ति दिसली. मी आश्चर्य चकित झालें. पायऱ्या चढून वर येईपर्यंत मला ओळखतां देखील आलें नाहीं.

त्यांचा पोशाख पार बदलला होता. एवढ्या मोठ्या काठांचें नागपूरी धोतर ते पासघेळ नेसले होते. अंगावर एक शालजोडी नुसतीच टाकली होती. कालच श्रावणी केल्यासारखें कोरेंकरकरीत जानवें त्या शालजोडी खालून डोकावत होतें. डोक्यालाही एक शालजोडी गुंडाळली होती. त्यांच्या त्या भव्य देहाला हा पोशाख फारच खुलून दिसत होता. या सर्व पोशाखावर ताण करण्यासाठीं त्यांनीं हातात पळीपंचपात्री घेतली होती आणि पायांत खडावा घातल्या होत्या. चटकन् पहातांच ते नाटकातल्या एखाद्या ऋषि-सारखे दिसत होते—फक्त दाढीची तेवढी उणीव होती.

त्यांना पहातांच बाबा चमकले. आधीं त्यांनीं त्यांना ओळखलंच नाहीं. पण ओळख पटतांच ते म्हणाले, " हें काय साहेब ? आज हें कसलं सोंग ? "

गंभीरपणाचा भाव आणून साहेब म्हणाले, " जगांत ढोंग वाढलं, कीं माझ्यासारख्या प्रामाणिक माणसालाही अशीं सोंगं करावीं लागतात. आज विठोबाच्या देवळांत लिमयेबुवांचं कीर्तन आहे. मला तें ऐकायचं आहे. मग काय करतां ! हा असा कान्होबा शास्त्री बनलों. आतां तरी ब्रम्हवृंद काय करतो तें पहायच आहे. चल गोदे, तें पुस्तक ठेवून दे. "

" म्हणजे ? गोदूलाही बरोबर नेणार आहांत का ? " बाबा म्हणाले.

मोठमाठ्यानें हंसत डॉक्टर म्हणाले, " तिला तर नेलंच पाहिजे. लिमये बुवांचीं आणि माझी पैज लागली आहे, त्यांत तिला पंच नेमलं आहे. ती तर अवश्य पाहिजेच ! "

हातांत तांदूळ भरलेला पेला घेऊन आई दाराबाहेर आली पण साहेबांना पहाताच दारांत थबकली. आईचा आणि साहेबांचा परिचय नव्हता—पण साहेबांना परिचय करून देण्याची जरूरी कधीं लागतच नसे. ते म्हणाले, " बाईसाहेबही कीर्तनाला निघाल्या आहेत वाटतं ? ऐकलंत बाईसाहेब, आज तुमच्या गोदूला आम्हीं बरोबर घेऊन जाणार. आज कीर्तनाला मोठा रंग भरणार आहे. आणि तुम्हींही चला गोखले. आजच्यासारखं कीर्तन पुन्हां ऐकायला मिळायचं नाहीं. लिमयेबुवांच्या जिव्हेवर आज सरस्वती नुसती नाचणार आहे. कंठांत सरस्वतीची वीणा झणाणणार आहे. अशी संधि दवडूं नका. बाईसाहेब बरोबर नेत नसतील तर माझ्या गाडींतून चला. "

आई नुसती हंसली आणि कांहीं न बोलतां पायऱ्या उतरून खालीं गेली, त्यावेळीं साहेब म्हणाले, " पाहिलंत गोखले ! तुम्हांला आतां माझ्यावांचून आधार नाहीं. मी आहें तुमचा पाठीराखा. चला माझ्या गाडींतून. "

आई गाडींत बसून निघून गेली. बाबा कपडे करून बाहेर येईपर्यंत साहेब तिथेंच बसले होते. ते मला म्हणाले, " आजचं कीर्तन मला फार महाग पडलं. तेवढयासाठीं आज हें नवं धोतर घ्यावं लागलं. एक शालजोडी होती माझ्याजवळ पण डोक्याला गुंडाळायला ही दुसरी नवी घेतली. पंचपात्रीं होती बंगल्यावर पण पळी नवीन आणावी लागली—" बाबा कपडे करून बाहेर आलेले पाहून ते म्हणाले, " फक्त दर्भाची पेंढी तेवढी काय ती कमी आहे, नाहीं तर या थाटांत कुणीही मला भिक्षुक म्हणून घरीं बोलावील ! "

भिक्षुक होण्याच्या कल्पनेनें त्यांचें त्यांनाच हंसू आलें. त्यांच्या हंसण्यानें सारा बंगला दणाणून गेला. पुस्तक बाजूला ठेवून दादासुद्धां घटकाभर त्यांच्याकडे पहात राहिला.

बाबांना साहेबांप्रमाणें पोषाखाची उणीव नव्हती. दोन्ही प्रकारचे पोषाख करण्याची त्यांना संवय होती. पण दोन्ही पोषाखात पगडी मात्र एकच असे. यावेळीं बाबांनीं ब्राह्मणी थाटाचा पोषाख केला होता—त्यांत कसलाच साहेबीपणा नव्हता. त्यामुळें देवळांत जाण्यास मनाई होण्याची त्यांना भीति नव्हती.

आम्हीं गाडींत बसून विठोबाच्या देवळाशीं आलों. आम्हीं आलों त्यापूर्वीं कीर्तन सुरू झालें होतें. साहेब, आमचे बाबा आणि मी देवळाच्या दाराशीं

येतांच श्रोत्यांत चुळबुळ सुरू झाली, त्यामुळें बुवांचें लक्ष आमच्याकडे गेलें. कुणी मोठा माणूस सभामंडपांत येतांच त्याच्या स्वागतासाठीं कीर्तनाला जो विक्षेप येत असतो, त्या वेळच्या नियमाप्रमाणें बुवांनीं एकदां " पुंडलिक वरदे हरिविठ्ठल " केलें. डॉक्टर देवळांत शिरतांच सर्व लोक टकमक पाहूं लागले. आधीं कुणी त्यांना ओळखलेंच नाहीं—पण ओळख पटतांच चालत असलेल्या " विठ्ठल विठ्ठल "च्या गजरावरही श्रोतृवर्गांची कुजबूज ऐकूं येऊं लागली. सभामंडपांत येतांच साहेबांनीं बुवांच्या पायांवर मस्तक ठेवून नमस्कार केला. बुवांनीं दोन्दीं हातांनीं धरून त्यांना वर उचललें आणि उभयतांनीं वारकरी पद्धतिनें दोन्हीं खांद्यावर माना टाकून कडकडून मिठ्या मारल्या.

देवळांत कीर्तनाच्या जागीं शास्त्री-पंडित-भिक्षुक मंडळीची बैठक निराळी असते. साहेब कुठें तरी बाजूलाच बसत होते, पण शास्त्रीपंडितांनीं बाजूला सरून जागा केली आणि हाताला धरून अगदीं आग्रह करून त्यांना आपल्या मंडळींत बसवून घेतलें. बाबा इतर गृहस्थ मंडळींत जाऊन बसले पण साहेबांनीं मला मात्र आपल्याजवळ बसवून घेतलें.

कीर्तन खरोखरच फार रंगलें. आख्यान द्रौपदीवस्त्रहरणाचें होतें. साहेबांच्या सहवासानें लिमयेबुवांच्या मतांत बरेंच स्थित्यंतर झालें होतें. त्यांच्या कीर्तनाच्या पद्धतीला आधुनिकता आली होती. भीष्मद्रोणांच्या नेभळेपणामुळें भरसभेंत द्रौपदीची कशी विटंबना झाली, दुर्योधनाच्या अधिकाराखालीं दबलेल्या गेलेल्या पितामहांनीं द्रौपदी ही बायको या नात्यानें नवऱ्याची मत्ता कशी ठरविली आणि त्या दिवसांपासून स्त्रियांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन स्त्री ही नवऱ्याची मत्ता असा त्रिकालाबाधित सिद्धांत कसा झाला, याचें विवरण त्यांनीं मोठ्या रहस्योद्ग्राही पद्धतीनें केलें.

शास्त्रीपंडितांना तें विवरण रुचलें नाहीं. कीर्तन चाललें असतां शास्त्रीपंडित लोक बुवांच्या विवरणाबद्दल आपसांत चर्चा करीत होते. बुवांनीं भीष्म द्रोणांना ' नेभळे ' आणि ' परदास्यामुळें बुद्धिभ्रष्ट बनलेले ' अशीं विशेषणें लावल्याचा त्यांना राग आला. पण बुवांचें विवरण साधार चाललें होतें. आधारासाठीं ते भारतांतील श्लोक म्हणून दाखवित होते. त्यामुळें सर्वसाधारण श्रोत्यांवर त्यांच्या निरूपणाची छाप पडत होती.

मधून मधून ज्यावेळीं विठ्ठल नामाचा गजर होत असे, त्यावेळीं साहेबांचा आवाज शेकडों श्रोत्यांच्या आवाजांच्यावर सर्वत्रांना ऐकूं येत असे. भाविक-पणानें ते टाळ्या पिटित असल्याचें पाहून सर्वत्रांना आश्चर्य वाटलें.

साहेबांचा स्वभाव फारच भावनाप्रधान होता. द्रौपदीच्या छळाचें वर्णन बुवांनीं अत्यंत परिणामकारक रीतीनें केलें. त्या वर्णनासरशीं साहेबांच्या डोळ्यांतून नुसत्या अश्रुधारा वाहूं लागल्या—इतकेंच नव्हे—तर त्यांच्या त्या मोठ्या हृदयांतून निघालेला हुंदका सभामंडपांतील निम्मेशिम्मे श्रोत्यांना चांगला ऐकूं आला. कुणाच्याही दुःखाची हकीकत त्यांच्या डोळ्यांना केव्हांही पाणी आणित असे, हें मी हरघडी पहात होतें. पण नुसत्या कीर्तनांतील निरूप-णानें देखील त्यांच्या भावना उचंबळून येत असल्याचें पाहून माझा त्यांच्या विषयींचा आदर द्विगुणित झाला.

कीर्तन संपल्यावर आरतीच्या वेळीं ओंवाळणींत त्यांनी पांच रुपयाची नोट टाकलेली पहातांच सर्व मंडळी थक्क झाली. श्रोते ओंवाळणींत सहसा एक पैसा टाकित असत. श्रीमंत माणसें क्वचित चवली, फार तर पावली टाकतात. पावलीच्या पलीकडे कुणाची मजल जात नसे, ह्मणूनच सर्वत्रांना पांच रुपयांच्या नोटीमुळें आश्चर्य वाटलें.

आरती—नमस्कार संपल्यावर नित्याच्या " या बुवा बसा " च्या ऐवजीं " या साहेब बसा " या शब्दांनीं बुवांच्या ऐवजी साहेबांचेंच स्वागत कर-ण्यांत आलें. पण साहेब थोडेंच चुकणार होते ! त्यांनी हाताशीं धरून बुवांना एका भल्या मोठ्या तक्याजवळ बसविलें, आणि आपणही त्यांच्या शेजारीं बसले. खिरापत वाटतांना वाटणारा पहिल्यानें साहेबांकडेच आला, पण त्याला आधीं बुवांनाच खिरापत देण्याचा साहेबांनीं आग्रह केला.

शास्त्री—भिक्षुक मंडळीची जिभली वळवळूं लागली. एक भले लठ्ठ शास्त्री ह्मणाले, " आह्मी भलतेंच ऐकत होतों. साहेब एवढे भगवद्भक्त आहेत हें आह्मांस माहीत नव्हतें. आज प्रत्यक्ष पाहिलें—साहेबांचें या रूपांत दर्शन घडलें हें आमचें मोठेंच भाग्य ! "

लिमये बुवा हंसत हंसत ह्मणाले, " साहेबांचं कीर्तन आपण ऐकलं आहे का ? "

शास्त्रीबुवा हस्तिदंती करीत म्हणाले, " म्हणजे ? साहेब कीर्तन सुद्धां करतात वाटतं ? "

" मुंबईला मंदिरांत त्यांचीं पुराणं प्रवचनं वारंवार होत असत. ठाण्याला असतांना बहुतेक दर रविवारीं मुंबईच्या मंदिरांत त्यांचं कीर्तन किंवा प्रवचन अगदीं हटकून व्हायचं ! " लिमयेबुवा म्हणाले.

कुठल्या मंदिरांत, याचा मात्र बुवांनीं उल्लेख केला नाहीं. ज्या मंदिरांत साहेबांचीं कीर्तनें प्रवचनें होत असत तें मंदिर प्रार्थना समाजाचें होतें असें जर बुवांनीं सांगितलें असतें, तर शास्त्रीबुवांना काय वाटलें असतें हा मोठा प्रश्न आहे.

आम्ही घरीं आलों. अंगावरचें लुगडें बदलून आई माझ्या खोलींत आली, त्यावेळीं म्हणाली, " खरंच गोदे, आज कीर्तनाचा रंग कांहीं औरच होता. द्रौपदीवस्त्रहरणाची हकीकत मी ऐकली आहे, तशीच वाचलीही आहे. पण बुवांनीं केलेल्या विवरणामुळें आज मला नवा प्रकाश मिळाला. भीष्म-द्रोणांबद्दल आम्हांला पूर्वीपासून आदर होता. पण द्रौपदीच्या विटंबनेला आणि पांडवांच्या वनवासाला भीष्म-द्रोणच खरे कारणीभूत झाले, हें मला आज कळलें. वनवासाहून पांडव परत आल्यावर देखील त्यांच्या पक्षाला भीष्मद्रोण कां मिळाले नाहीत, याचं गुढ मला आज उकललं. मी सारखा विचार करीत येत होतें. भीष्माचा पांडवांकडे ओढा आणि त्यांनी असं कां वागावं ? ठिकठिकाणी द्रौपदीबद्दलचा त्यांचा लोभ व्यक्त होतो आणि त्यामुळंच ' स्त्री ही नवऱ्याची मत्ता आहे ' असा निकाल देऊन द्रौपदीची विटंबना झालेली त्यांनी उघड्या डोळ्यांनी कशी पाहिली, याचं मला आश्चर्य वाटत असे. पण त्यांचा हा स्त्रीजातीवरचा राग त्यांनी द्रौपदीवर काढला, हें मला आज कळलें. सत्यवतीच्या वेडानें शांतनूनं भीष्माला ब्रह्मचारी रहायला लावलं—भीष्म आपखुषीनच ब्रह्मचारी राहिला खरा पण त्याला सत्यवती कारण झाली—हेंही कांही खोटं नाही. अंबा, अंबिका आणि अंबालिका यांच्या प्रकरणांतही भीष्माला स्त्रीजातीपायीं निग्रह करावा लागला, हीही गोष्ट माझ्या ध्यानीं आली. पदोपदीं भीष्मानं उदारपणा दाखविला खरा पण स्त्रीजाती विषयींचा त्याचा द्वेष अंतःकरणांत कुठं तरी धुमसत होता. त्याचा सूड त्यानं द्रौपदीवर—द्रौपदीवर कसला—साऱ्या स्त्रीजातीवर काढला आणि तेव्हांपासून

भीष्मद्रोणांच्या निकालामुळं स्त्रीजात ‘ दासी ’ ठरली. जसजसा या गोष्टीचा विचार करूं लागलें तसतसं बुवाचं हें विवरण माझ्या बुद्धीला पटूं लागलें. जुन्या पुराणांतील गोष्टी वाचल्या, कीं स्त्रियांना स्वातंत्र्य होतें–त्या पुरुषाच्या सर्वस्वी आधीन नव्हत्या–असं ठिकठिकाणीं दिसून येतें. स्त्रियांच्या पारतंत्र्याला सुरवात केव्हांपासून झाली, याची मला कल्पना नव्हती. आज तो सुगावा लागला आणि माझा संशय दूर झाला. भीष्मपितामहांच्या दीर्घद्वेषी बुद्धीमुळें आज तारखेला आह्मा बायकांच्या कपाळीं गुलामगिरी आली, असें पटून मनाला समाधान वाटलं. खरोखर आजचं कीर्तन मोठं अपूर्व होतं. साहेबांनीं जातांना म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं. आणि हे तुझे साहेब म्हणजे एक विलक्षण व्यक्ती दिसते. काय त्यांनीं आज थाट आणला होता तो ! अंगावर शालजोडी पांघरून त्यांनीं या शास्त्री भिक्षुकांनां चांगलेच शालजोडीतले दिले ! माणूस तोच पण पोशाख बदलतांच बाटग्याचा सोज्वळ झाला. याच डॉक्टरसाहेबांना पाटलोण घालून कुणि देवळांत जाऊं दिलं नसतं. नागपुरी धोतरजोड्यानं ती अडचण दूर केली. काय दांभिकपणा आहे हा ! असं पाहिलं कीं या धर्माची शिसारी येते. पांच रुपयाची नोट ओंवाळणींत टाकली त्यामुळं डॉक्टरसाहेब मोठे माणूस झाले. तोंड फाटेपर्यंत प्रत्येकजण त्यांची स्तुती करीत होता. ही सारी स्तुती पांच रुपयांच्या मोलानं विकत घेतलेली ! मोठा विलक्षण माणूस आहे. तुझ्यावर त्याचा लोभ जडला आहे हें खरोखरच मोठं भाग्य. त्यांच्या सहवासाचा कांहीं फायदा करून घे. या वयांत जर बुद्धी वापरण्याचं बीं अंतःकरणांत पेरलं गेलं, तर पुढल्या वयांत त्याचा मोठा वृक्ष होईल, हें ध्यानांत ठेव. ”

आई निघून गेली आणि मीही विचार करीत झोंपी गेलें.

दुसऱ्या दिवशीं साहेबांच्या बंगल्यावर गेलें तेव्हां साहेब म्हणाले, “ काय गोदे, काय देणार निकाल ? सरशी कुणाची झाली ? ”

लिमयेबुवा म्हणाले, “ गोदूच्या निकालाची जरूरी नाहीं. मी कबूल करतों कीं फजिती माझी झाली. माझेही आज डोळे उघडले. जगांत सारा दांभिकपणा माजला आहे याची पुरेपूर खात्री पटली. ”

मी म्हटलें, " साहेब, मला एक विचारायचं आहे, द्रौपदीच्या छळाचं वर्णन चालत असतांना आपल्याला जो हुंदका आला तो खरा होता कीं—"

साहेब गादीवरून म्हणाले, " असा उघडउघड पायपोस कां मारतेस पोरी! मी शालजोड्या पांघरून गेलों तो दांभिकपणानं नव्हे, तर दुसऱ्या लोकांचा दांभिकपणा उघडकीस आणण्यासाठीं! डॉक्टर या नात्यानें मला निर्दयपणा करावा लागतो, जिवंत माणसाचीं आतडीं तोडावीं लागतात, पण माझं स्वतःचं आतडं फार नाजुक आहे. पोरी, आयुष्यांत मी फार दुःखं सहन केलीं आहेत. अफगाणिस्थानांतल्या लढाईच्या वेळीं पळून जाण्याचा प्रयत्न केल्यामुळं मला तोफेच्या तोंडीं देण्याचा हुकूम झाला होता. माझ्या औषधानं बऱ्या झालेल्या एका बड्या अधिकाऱ्याच्या कृपेमुळं मी तोफेच्या तोंडासमोरून जिवंत राहिलेला आहें. मृत्यू एकदां माझ्या समोर येऊन गेलेला आहे, त्यामुळं माझं अंतःकरण फार हळवं झालेलं आहे. मी आज मोठा अधिकारी असलों तरी कौटुंबिकदृष्ट्या एक अनाथ अपंगच आहें. मी दुःखी आहें म्हणूनच कुणाच्याही दुःखानं माझं आंतडं तुटतं. पोरी, तो हुंदका खरा होता. दुःखाचं नुसतं वर्णनसुद्धां माझ्या हृदयाला पाझर फोडतं. मी प्रामाणिक आहें आणि प्रामाणिकपणांतच मरावं अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे."

डॉक्टराचे हे उद्गार मला पुढल्या आयुष्यांत कसे मार्गदर्शक झाले, हें माझ्या पुढल्या चरित्रावरून कळेल.

---

## प्रकरण १७ वें

# लग्न म्हणजे लग्न

एका वर्षांत तीन यत्ता करून मी चौथींत बसलें. हायस्कूलला पाय लागला. दादाच्या बरोबर हायस्कुलांत जाण्याचा मान मला मिळूं लागला. तो सातवींत होता, त्याच वर्षी मॅट्रिकला बसणार होता, पण त्याच्याबरोबर मला हायस्कुलांत जातां आलें याचा माझ्या आईइतकाच मला अभिमान वाटला.

मला घरीं शिकवण्यासाठी मास्तर ठेवले होते. चौथी पुरी करतांच पांचवींत न जातां एकदम सहावींत बसण्याची माझी आकांक्षा होती.

मी हायस्कुलांत गेलें तिथेंही माझा नंबर पहिला राहिला, याचा मुलांना मत्सर वाटत असे. माझ्या बाबतींत मास्तर लोक पक्षपात करतात—मुलगी म्हणून पक्षपात करतात—उगीच मला चढवण्यासाठीं जास्त मार्क देतात आणि माझा नंबर कसाबसा पहिला लावतात, असा पुरुष मुलांचा आक्षेप असे.

मुलांच्या या मनोरचनेचें मला आश्चर्य वाटे. बायकांच्या जातीला ईश्वरानें बुद्धी दिली नाहीं, पुरुषांशिवाय बायकांना कर्तबगारीची कोणतीही पायरी मिळवतां येत नाहीं, असा जो सार्वत्रिक समज आहे—अजूनही आहे—त्याचें मला राहून राहून कौतुक वाटे. स्वतःचा अनुभव माझ्या समोर होता. मला मार्क मिळत होते, ते माझ्या कर्तबगारीनें मिळत होते. कुणाच्याही पक्षपातानें किंवा वशिल्यानें मिळत नव्हते. तरीही हा आक्षेप माझ्यावर होताच. माझ्या अनुभवानें मला माहीत होतें, कीं बुद्धी असली, बुद्धीचा उपयोग करण्याची ताकद आणि इच्छा असली, त्या ताकदीला योग्य दिशा मिळाली, तर बुद्धीमान समजल्या जाणाऱ्या पुरुष मुलांवरही मुली ताण करूं शकतात, याची स्वानुभवाची जाणीव मला पूर्णपणें होती.

म्हणूनच पुढल्या आयुष्यांत देखील या आक्षेपकांच्या कोत्या मनाची मला कींव येत असे. एखाद्या स्त्रीच्या नावाखालीं एखादा लेख प्रसिद्ध झाला, का बहुतेक तो तिच्या नवऱ्यानें तिच्या नावाखालीं लिहिला, असा बडकावून

सिद्धांत दिला जात असे. पुरुषांची ही अशीच मनोरचना कीं नसती घमेंड ? बुद्धीचा सारा ठेवा ईश्वरानें पुरुषानांच दिला आहे काय? एखादी घरगुती गोष्ट, एखादा साधासिधा निबंध लिहिण्याइतकी कल्पनाशक्ती स्त्रियांच्या ठायीं नाहींच, असें एकदम ठरवणाऱ्या मनोवृत्तीला काय नांव द्यावें ! अशा प्रकारचे आक्षेप येत असतांही त्यांचें निराकरण करण्याची बुद्धी कुणालाच कां होऊं नये ? जन्म दत्त अधिकाराची जाणीव आणि जन्मादारम्य गुलामगिरीची वृत्ति, या अनुक्रमें पुरुषांच्या व स्त्रियांच्या ठिकाणीं असलेल्या भावनेचा हा परिणाम काय ?

पुरुषांनीं वाटेल त्या प्रकारें आक्षेप घ्यावे आणि बायकांनीं ते मुकाट्यानें सहन करावे, हा उभयपक्षांच्या चांगुलपणाचा मामला स्त्री जातीवर येणाऱ्या परप्रकाशिततेच्या आक्षेपाला कारणीभूत होत असलेला पाहून माझ्या जन्मजात बंडखोरीला चांगलीच पुष्टी मिळाली. संधि सांपडेल तेव्हां पुरुष जातींचा पाणउतारा करण्याची मला बुद्धी होऊं लागली आणि त्या बुद्धी बरोबरच कर्तबगारीच्या जोरावर पुरुष जातीला दिपवून टाकण्याचा माझा उपक्रम सुरू झाला.

हायस्कुलांत देखील पंक्तीप्रपंच होताच. अस्पृश्यांप्रमाणें एकट्या मुलीला एका निराळ्या टेबला समोर बसविण्यांत येत असे. माझ्या वर्गांतील बहुतेक मुलगे माझ्यापेक्षां वयानें बरेंच मोठे होते. मी अगदींच लहान होतें. त्यामुळें मुलांचा घोळका पदोपदीं माझी कुचाळी करण्याची संधि साधित असे.

छबीनें शाळा सोडली होती आणि कमा अजून मिशन स्कुलांतच होती. हायस्कुलांत येण्याची कमाला खात्री नव्हती. ती माझ्यापेक्षां वयानें मोठी असल्यामुळें तिचें लवकरच लग्न होण्याची भीतिही होती. शिकण्याची हौस फार—पण घरचें उत्तेजन नाहीं, अशी तिची दीनवाणी स्थिती होती. छबी-चीही शिकण्याची इच्छा फार होती. पण ती काय करणार बिचारी ? घरचीं माणसें जुन्या काळचीं. एवढें शिक्षण दिलें हेंच भाग्य—म्हणून आल्या परिस्थितीला मान वांकवून ती स्वस्थ राहिली होती. बरोबरच्या मुली शाळेंत जात असतां आपण घरीं नुसत्या माशा मारीत बसणें, तिला मरणप्राय होत असे.

पण तिचें लग्न व्हायचें होतें. मुलगी जास्त शिकली तर तिच्या जातींत तिच्या लग्नाला अडथळा आला असता, असा तिच्या वडील माणसांचा समज होता. मी ज्या ज्या वेळीं तिला भेटायला तिच्या घरीं जात असें, त्या त्या वेळीं ती एकच रडगाणें गात असे. तिनें म्हणावें, " शिक्षणाला आड यणारं असं हें लग्न म्हणजे आहे तरी काय ? मुलीचं लग्न हें झालंच पाहिजे, असा अट्टाहास का ? पुरुष शिकतात, विद्वान होतात, नोकऱ्याचाकऱ्या करतात, तसंच बायकांनीं का करूं नये ! लग्न झालं पाहिजे म्हणे ! लग्नासाठीं मुलीला शाळेतून काढून घरीं ठेवायची हा कुठला न्याय ? "

तिचें भाषण चाललें असतां ते तिच्या आईच्या कानीं गेलें, त्या वेळीं ती म्हणाली, "बाई ग, बायकांच्या जातीला लग्नाशिवाय रहातां येत नाहीं. भटा-बामणांची गोष्ट निराळी आहे, त्यांच्या मुली शिकल्या तरी त्यांचं लग्न होतं—नव्हे, शिकलेल्या मुलीला.चांगला नवरा मिळणं सोपं जातं. आमच्या जातीचं अगदीं उलट आहे. आधीं पुरुषांनाच शिक्षणाची आवड नाहीं, तिथं बायकांच्या शिक्षणाला कोण विचारतो ? पुरुष चागले .शिकलेले नसल्यामुळं बायकांनीं शिकूं नये असंच त्याना वाटत असतं. शिकलेली मुलगी अर्धवट शिकलेल्या नवऱ्याची बायको झाली तर डोईजड होईल, अशी त्यांना भीति असते. शिकलेल्या नवऱ्याला न शिकलेली बायको चालते पण न शिकलेल्या नवऱ्याला शिकलेल्या बायकोची भीति वाटते. "

मी विचारलें, " कां ! शिकलेल्या नवऱ्याला जर अशिक्षित बायको चालते, तर अशिक्षित नवऱ्याला शिकलेल्या बायकोची भीति का वाटते ? "

छबीची आई म्हणाली, " तें मी कसं सांगूं गोदूताई ? मला एवढी बुद्धी कुठं आहे ? पण आहे हें असं आहे. बायको नवऱ्याच्या वरचढ होता नये, असा नवऱ्याच्या जातीचा बाणा आहे. शिकलेली मुलगी नवऱ्याला चार गोष्टी ऐकवूं लागली, तर त्याच्या नवरेपणाच्या अधिकाराला धक्का बसेल, अशी भीति पुरुषांना कदाचित् वाटत असेल. मला वेडीला याचं निराकरण करतां येणार नाहीं. आमच्या जातीची आहे ही स्थिती अशी आहे. माझी छबी हुशार आहे, पुढं चांगली शिकली तर बी. ए. एम्. ए. सुद्धां होईल इतकी हुशार आहे, असं माझं मन सांगतं. तिनं मोठमोठया परीक्षा द्याव्या असं

मला वाटतं—ती तर तेवढ्यासाठींच रडत असते. पण इच्छा असतांना सुद्धां केवळ तिचं लग्न झालं पाहिजे ह्मणून तिला शाळेंतून काढावी लागली."

असें हें लग्न ह्मणजे आहे तरी काय? असा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. इच्छा असतांना, अंगीं धमक असतांना, केवळ लग्न झालं पाहिजे ह्मणून शिक्षणावर कुऱ्हाड पडावी असें हें लग्न आहे तरी काय! आयुष्यांत महत्व लग्नाला आहे कीं शिक्षणाला आहे? लग्नाचा आणि शिक्षणाचा संबंध जगण्यासाठीं आहे कीं जगवण्यासाठीं आहे? मुलीचें लग्न झालें पाहिजे ह्मणून तिला चांगलें शिक्षण द्यावें लागतें, असा ब्राह्मणादि पांढरपेशे वर्गाचा समज आहे. त्याच्या उलट पहावें, तर त्यांच्या वर्गांत शिक्षण मिळालेल्या मुलीचें लग्न होणं कठीण जातें असा अनुभव आहे. शिक्षणामुळें एका वर्गाला लग्न सुलभ जातें, तर दुसऱ्या वर्गाला लग्नाच्या कामीं शिक्षणच आड येतें. असें हें लग्न ह्मणजे आहे तरी काय? शिक्षणाच्यासाठीं लग्न खर्ची घालायचें, कीं लग्नाच्यापायीं शिक्षणाला चाट द्यायची? लग्न झालेले पुरुष पुढें शिक्षण चालू ठेवतात, मग लग्न झालेल्या मुलींनाच चालू ठेवण्यास अडथळा कां असावा?

माझ्या मनांत आलेले ते प्रश्न मी आईसमोर मांडले. त्या वेळीं ती ह्मणाली, "लग्न ह्मणजे काय ते तुला लग्न न झाल्यानं कळत नाहीं. पण लग्न होऊन सुद्धां मला अजून ते कळलं नाहीं. माझं लग्न बऱ्याच लहान वयांत झालं, पण ज्यांचीं लग्नं माझ्यापेक्षा मोठ्या वयांत झालीं त्यांची स्थिति मी पहातें आहे. लहानपणीं, लग्न व्हायच्यापूर्वी-ज्या मुली चांगल्या बोलक्या होत्या, त्या लग्न होताच अगदीं मरतळल्या झालेल्या मला दिसून आल्या. लग्न व्हायच्या पूर्वी ज्या मुलींची वृत्ति बाणेदार होती- शब्दाला शब्द, उत्तराला उत्तर, देण्याची ज्या मुलींची ताकद होती-त्याच लग्न होताच अगदीं मऊ होऊन गेलेल्या मी पाहिल्या आहेत. माझा अनुभव तुला कसा सांगू? मला देखील असंच वाटतं. मी देखील लहानपणीं मोठी हूड होतें पण लग्न झाल्यानंतर इतकी गोगलगाय बनलें कशी, याचं माझं मलाच आश्चर्य वाटतं. 'सून असावी तर अशी' अशी सर्वांनीं माझी तारीफ करावी, पण त्याचं मला मात्र मरणप्राय दुःख होत असे. माझी वृत्ति मी दाबून टाकीत होतें. कुणी निष्कारण टाकून बोललं तर त्याला चांगलं सणसणीत उत्तर द्यावं अशी मनां-

तून उसळी येत असे. पण चांगली सून ठरण्यासाठीं मी मन मारून मुकाट्यानें रहात असें. ' चांगली सून ह्मणजे काय ' याचा विचार मी करूं लागलें ह्मणजे असं वाटतं, कीं चांगली सून म्हणजे चालतं बोलतं मढं ! तिला आपलेपणा नाहीं, स्वाभिमान नाहीं, स्वतःची बुद्धी चालवण्याची धमक नाहीं, दुसऱ्याच्या ओंजळीनं पाणी प्याल्याशिवाय जिला जगतां येत नाहीं, स्वतःचं मन नाहीं, बुद्धी नाहीं, ती खरी चांगली सून! मग ती सुशिक्षित असो कीं अशिक्षित असो—सूनपणा ह्मणजे मरतुकडं जिणं—" थोडा वेळ थांबून ती ह्मणाली, " हें झालें सूनपणाचं. पण बायकापणाची गोष्ट अगदीं न्यारीच आहे मी तुझी आई, तूं माझी मुलगी. माझे पति ते तुझे वडील—बायको-पणाच्या जिण्याची केविलवाणी स्थिती तुला कशी सांगू? चार घरच्या चार बायका जमल्या ह्मणजे आह्मी लग्नाच्या गोष्टी बोलतों-विशेषतः आपल्या मुलाच्या लग्नाच्या गोष्टी बोलतों, शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या मुलींच्या लग्नाच्या गोष्टीं बोलतों, पण स्वतःच्या लग्नाची गोष्ट मात्र केव्हांही बोलत नाहीं. लग्ना-च्या बायकोच्या जिण्याची गोष्ट जर आह्मी बोलू लागलों, व त्या आमच्या मुली-बाळींच्या कानीं पडल्या, तर त्या लग्नाला तयार होणार नाहीत. पोरी, ह्मणून लग्नाची चांगली बाजू तेवढीच आह्मी बोलतों. आणि, ती चांगली बाजू ह्मणजे तरी काय ? डागदागिने, शालूपठण्या, कार्यप्रस्थान, नवऱ्याच्या नांवावर मिळा-लेला मानमरातब, ह्मणजेच काय ती लग्नाची चांगली बाजू. दुसरी बाजू अनु-भवाची लागते. ती कुणी सांगत नाहीं. विचारली तरी सुद्धां सांगणार नाहींत. याच आमच्या दांभिकपणाला चांगुलपणा ह्मणतात. लग्न-लग्न ! लग्नाशिवाय बायकांचं जिणं नाहीं.—पण लग्नासारखं बायकांना मरण नाहीं. "

नकळत आईच्या डोळ्यांतून बोलण्याच्या हुंदक्यासरशीं पडलेली दोन टिपें मी पाहिलीं. मनांत प्रश्न उभे राहिले होते, ते त्या टीपासरशीं वाहून गेले. तोंड फिरवून पदरानें आपले डोळे पुसून आई म्हणाली, " गोदे, पोरी, तूं आपली शिकत जा. चांगली विद्वान हो. चांगल्या परीक्षा दे. इतर आया पोरींच्या लग्नासाठीं तळमळतात, तशी तळमळणारी मी नाहीं. तुझ्या लग्नाची मी घाई करणार नाहीं. चांगली शीक. चांगली करतीसवरती हो. लग्न म्हणजे काय हें कळण्याइतकी बुद्धिवान् हो. आणि लग्न करावं असं वाटलं, तर नंतर

मला सांग. जगलें वाचलें तर हा माझा निश्चय दांतीं धरून चालवीन. पण मेलेंच तर नशीब तुझं ! तशीं मेलें तर वडील माणसांच्या सक्तीसाठीं लग्नाला तयार होऊं नकोस. अगदीं दुराग्रह धर. तुला कुणी नांव ठेवलीं तरी हरकत नाहीं. पण लग्नाशिवाय जगतां येत नाहीं असं वाटल्याशिवाय लग्नाला तयार होऊं नकोस. ”

लग्नाबद्दलची माझी आधीं झालेली कल्पना आईच्या या भाषणानें जास्त भयप्रद स्वरूप धारण करूं लागली. आईचें मत कळलें. बाबांचें मत विचारण्याची सोयच नव्हती. कुणातरी पुरुषाचें लग्नाबद्दलचें मत मला पाहिजे होतें. पन्नास मुलांचा जंजाळ बाळगणाऱ्या बाबीशेटजींनीं खरें मत दिलें नसतें.

विचार करूं लागलें, तेव्हां एकच पुरुष नजरेसमोर उभा राहिला. तो रविवारचा दिवस होता. मी डॉक्टर कीर्तिकरांच्या बंगल्यावर नित्याप्रमाणें गेलें होतें. साहेब, कुठलासा रोगी पहाण्यासाठीं गेले होते. लिमयेबुवा बंगल्यावरच होते.

मी जातांच तंबोरा काढून त्यांनीं सा रे ग म ला सुरुवात केली, त्या वेळीं मी बुवांना म्हटलें, “आजचा दिवस गाणं राहूं द्या. आज गाण्याच्या ऐवजीं मला बोलायचं आहे. तुम्ही कीर्तन करतां, पुराणं वाचलीं आहेत, वेद उपनिषदांचा अभ्यास केला आहे, तेव्हां माझ्या एका प्रश्नाचं उत्तर द्या. लग्न म्हणजे काय ? ”

“ लग्न म्हणजे लग्न ! ” असें म्हणून लिमयेबुवा मोठयानें हंसले.

मी निग्रहानें विचारलें, “ अशी चकवाचकवी चालणार नाहीं. वेद, उपनिषद आणि पुराणें यांचीं नावं मी उगीच घेतलीं नाहींत. लग्न म्हणजे लग्न हें मला माहीत आहे. पण लग्नाबद्दल वेदाचं काय मत आहे, पुराणांचे काय आधार आहेत, हा माझा प्रश्न आहे. लग्न या विषयावर मला तुमचं कीर्तन ऐकायचं आहे ”

एक क्षणभरच लिमयेबुवा गंभीर झाले, आणि लगेच मोठमोठयानें हंसत म्हणाले, “ ठीक आहे तर मग. ‘ सजयति सिंदूरवदनो देवो ’ नें कीर्तनाला सुरवात करतों. हें कीर्तन फार लहान होणार आहे. सूत म्हणतात, शौनकादिक हो, ऐका. लग्न म्हणजे काय हें समजण्याचं सध्यां तुमचं वय नाहीं,

जरूरही नाहीं, आणि तुमच्यासारख्या मांडकुदळ मुलीबरोबर लग्नासारख्या मानगडीच्या विषयाची चर्चा करण्याची माझी इच्छा नाही. चालीन लोटांगण वंदीन चरण—"

मला बुवांचा राग आला. मी ताडकन् उठलें आणि बाहेर जाऊन व्हरांड्यावर उभी राहिले. माझ्या पोरस्वभावानुसार मला बुवांचा भारी राग आला होता. रागानें मी सारखी फणफणत होतें. कोण आलें कोण नाहीं, याचें मला भानही नव्हतें.

इतक्यांत माझ्या कानीं शब्द आले, "हें काय गोदे, ज्वालामुखी असा कां धुमसतो आहे ? काय झालं ?"

साहेबांचे हे शब्द कानीं येतांच मी शुद्धीवर आलें. माझ्या बावळेपणाबद्दल माझी मलाच लाज वाटली.

कशीबशी वेळ मारून नेण्याच्या इराद्यानें मी म्हटलें, "कांहीं नाहीं झालं ! बुवांना मोठा अभिमान झाला आहे आपल्या कीर्तनाचा ! मी कांहीं विचारलं त्याचं धड उत्तर सुद्धां त्यांच्यानं देववेना. अर्थातच मला राग आला !"

"असं का ?" साहेब म्हणाले, "मी आतांच बुवाची हजिरी घेतों. आधीं आंत चल, आणि काय झालं तें मला नीट समजावून दे."

साहेब आंत गेले-मीही त्यांच्या मागोमाग गेलें. बुवा होते त्याच जागीं बसले होते. मी त्यांच्याकडे मुळींच न पाहतां दूरच्या एका खुर्चीवर जाऊन बसलें.

साहेब म्हणाले, "बुवासाहेब, काय झालं ? गोदी कां रागावली तुमच्यावर !"

बुवा पूर्वीच्या सारखेच हंसूं लागले. माझा राग पुनः उसळी मारून वर येऊं लागला.

बुवा कांहीं बोलणार होते, तोंच साहेब म्हणाले, "जरा थांबा, मी एवढं हे खोगीर उतरून येतों. कपड्यांचं बंधन दूर झालं म्हणजे अघळपघळ बोलायला देहाबरोबरच मन सुद्धां जरा मोकळं होईल." असें बोलून ते तडक आंत गेले.

बुवांनीं मला हांक मारली, पण मीं उत्तर दिलें नाहीं. "बरं बुवा" म्हणून बुवा उगीच राहिले.

मी विचार करूं लागलें तसतशी माझ्या पोरकटपणाबद्दल माझी मलाच लाज वाटूं लागली. मी स्वतःला बुद्धिवान् समजत होतें, विचारी समजत होतें, पण एवढीशी थट्टा सहन करणें मला कठीण गेलें, याचा मलाच राग येऊं लागला.

विचाराअंतीं माझी खात्री झाली. राग आला तो थट्टेमुळें नव्हे. विषयाच्या उहापोहाबद्दल जी आत्यंतिक तळमळ माझ्या हृदयांत जागी झाली होती, आणि थट्टेपायीं बुवांनीं तिचा जो विरस केला, त्याचाच मला राग आला होता. कुणाच्याही थट्टेला मी केव्हांच चिडत नसें, पण या वेळीं चिडलें ती याच कारणामुळें.

बुवाही ओशाळल्यासारखे होऊन स्वस्थ बसले होते. मी हळुहळू त्यांच्याकडे वळलें, आणि अगदीं शांतपणानें म्हणालें, "बुवा, माझी चूक झाली. मला क्षमा करा."

"हं, आतां बोला!" असें म्हणत साहेबही तितक्यांत आले आणि खुर्चीवर बसून हुक्क्याच्या नळींतून गुडाखूच्या गोडया धुराचे फवारे सोडूं लागले.

---

## प्रकरण १८ वें.

# कसलं हें लग्न !

गुडाखूचा धूर मला सहन होत नसे. पण साहेबांना बंगल्यावर आल्यानंतर तेवढीच काय ती करमणूक होती, हें ध्यानांत घेऊन मला तो सहन करावा लागत असे.

साहेब ह्मणाले, " उगी का राहिलीस ? आतां बोल पाहूं ! बुवांनीं काय केलं ? "

एक क्षणभरच मी स्तब्ध राहिलें, आणि त्यानंतर बुवांशीं झालेलें सर्व भाषण आणि बुवांनीं त्यावर दिलेलीं उत्तरें वगैर इत्थंभूत साहेबांना सांगून मीं ह्मटलें, " यांत माझं काय चुकलं ? हा प्रश्न विचारण्याजोगं माझं वय नाहीं असं बुवा ह्मणाले. तें पटतं का आपल्याला ? माझ्या वयाच्या काहीं मुलींचीं लग्नं सुद्धां झालीं आहेत, मग मींच लग्नाबद्दल प्रश्न कां विचारूं नये ? "

साहेब एकदां पोट धरून मोठयानें हंसले. बुवांकडे पाहातांच, हंसावें कीं गंभीर रहावें, याचा विचार करीत मघलीच कुठली तरी छाया चेहऱ्यावर घेऊन ते बसल्याचें मला दिसून आलें.

साहेब ह्मणाले, " गोदीचं ह्मणणं खरं आहे. आजच्या काळांत तिच्या वयाच्या मुलींचीं लग्नं होताहेत—विशेषतः ब्राह्मणांत आणि कुणब्यांत पुष्कळच झालीं आहेत. नाहींत काय तीं आमच्या जातींत— "

" ह्मणजे ? " मी मध्येंच म्हटलें, " तुमच्या जातींत मुलींचीं लग्नं लवकर होत नाहींत का ? "

" नाहींत—निदान इतक्या लवकर तरी होत नाहींत. " साहेब हुक्क्याचा धूर हळूहळू सोडीत म्हणाले, " आमच्या जातींचं सारंच काहीं न्यारं आहे. आमची जात फक्त मुंबईंतच असल्यामुळं हिंदूखेरीज इतर संस्कृतीचा आमच्या जातीवर परिणाम झाला आहे. शिवाय हुंडा. या हुंड्यापायीं—किंवा सालंकृत कन्यादानापायीं म्हणा हवं तर, मुलीबरोबर शेरानीं सोनं द्यावं लागतं. त्याशिवाय वर थाटायच्या सामानसुमानाची यादी तर मोठी अजस्र

असते. लग्नाच्या वेळीं द्यायच्या सामानात कुणी कुणी पाळणे सुद्धा दिलेले मी पाहिले आहेत-" असें म्हणून साहेब एकदां मोठमोठ्याने हंसले. ते कां हंसले याचा अर्थ मला त्या वेळीं कळला नाहीं.

बुवाही हंसत होते. लोक हंसले की आपणही हंसावें, असली खोट्या शिष्टाचाराची वृत्ती त्या वयांतसुद्धां माझ्या ठायीं नव्हती. कोटी काय झाली, ती मला कळली नाहीं, असें कुणी म्हटलें असतें तरी मला पत्करलें असतें. पण नुसते लोक हंसतात म्हणून आपण हंसायचें हें मला केव्हाच पटलें नसतें.

" कां ग पोरी ! हंसत कां नाहींस ? " असें साहेबांनीं विचारलें, त्या वेळीं मी स्तब्ध राहिलें असें पाहून ते म्हणाले, " अर्थातच तुला तें कळणार नाहीं. जेवणाचीं भांडीं देतात, पलंग दतात, बिछाने देतात, अत्तरदाण्या गुलाबदाण्या देतात-पण पाळणे देतांना त्या जोडप्याला पुढं मुल होणार असं आधींच गृहीत कां धरतात ? एवढा सगळा सरंजाम द्यायची सर्वांचीच कांहीं ताकद नसते. पण कित्येक शेर सोनं आणि गडगंज संसाराचा सरंजाम सक्तीनं वसूल करायची वरपक्षाची हक्काची मागणी असते, ती पुरवण्याची ताकद सर्वांनांच नसल्यामुळं आमच्या जातींत मुली बऱ्याच मोठ्या वाढलेल्या राहतात. तुला खोटं वाटेल गोदे, पण माझ्या वयाच्या-चांगल्या चाळीस पन्नास वर्षं वयाच्या-कुमारिका तुला आमच्या जातींत दाखवून देईन. तुमच्या जातीचं तसं नाहीं. मुलगी जन्माला आल्यापासून तिच्या लग्नाची भुणभुण सारखी चाललेली असते 'अष्टवर्षा भवेत् कन्या' चा मंत्र कानीं कपाळीं ठणाणत असल्यामुळं मुलीच्या कल्याणापेक्षा मुलीच्या लग्नाचीच आईबाप जास्त काळजी वहात असतात. मुलगी उपवर होण्यापूर्वी कसंबसं तिचं लग्न उरकून घेण्याची तुह्मा लोकाची धडपड चालत असते. इतर धर्मांतील लोकांच्या सहवासामुळं म्हण, किंवा अवास्तव हुंड्याच्या चालीमुळं म्हण, आमच्या जातींतील मुली लग्नाशिवाय वाढलेल्या पाहिल्या, की तुह्मां लोकांतील मुलींच्या लग्नासाठीं चाललेली ही धडपड पाहून माझ्यासारख्याला आश्चर्य वाटतं. मुलगी उपवर होण्यापूर्वी तिचं लग्न झाल पाहिजे, नाहीं तर जात बुडते, असं तुह्मी म्हणतां. पण आमची जात कुठं बुडाली नाहीं तो ! आमच्या जातींत चांगल्या म्हाताऱ्या झालेल्या

बायकासुद्धां लग्न झाल्याशिवाय मेल्या आहेत. पण त्यामुळं आमचं काय नुकसान झालं आहे ? तुमच्या जातींतील लग्नाची धडपड पाहिली, कीं ही गोष्ट पहिल्यानं माझ्या नजरेसमोर उभी राहते. आम्ही हिंदुच आहोंत ना ! मग आमचा हिंदूपणा कुठं नाहींसा झाला नाहीं तो ! मग तुमच्याच हिंदूपणाला या असल्या लग्नांनीं धक्का कसा बसतो ? हे नुसते मनाच्या समजुतीचे खेळ आहेत. रूढीच्या दडपणाचे वेडेचार आहेत. जसा प्रघात घालावा तसा तो प्रचारांत येत असतो. "

मीं मध्येंच म्हटलें, " साहेब, माझा प्रश्न हा नाहीं. मी विचारीत होतें, कीं लग्न म्हणजे काय ? "

" असं का ? " साहेब म्हणाले, " तें मी अगदींच विसरलों. माझ्याकडून विषयांतर झालं. पण हें विषयांतर देखील अगदींच वायफळ नाहीं. या गोष्टीचा देखील तूं चांगला विचार कर. आतां तुझा प्रश्न, लग्न म्हणजे काय ? " असें बोलून त्यांनीं हुक्क्याचे बरेचसे घुटके मारून धुराच्या फवाऱ्यांनीं खोली भरून टाकली.

" लग्न म्हणजे काय ! " साहेब आपल्याशींच बोलल्यासारखें करून म्हणाले, " सकृद्दर्शनीं हा प्रश्न जेवढा सोपा वाटतो तितका सोपा नाहीं. म्हणूनच बुवांनीं तुला तें मघाचं उत्तर दिलं. लग्न ही एक आध्यात्मिक बाब आहे—सॅक्रॅमेंट आहे—असा समजण्याचा प्रघात आहे. पण लग्नाचे मंत्र जर समजावून घेतले, तर लग्न म्हणजे नुसतें एक कॉन्ट्रॅक्ट आहे, बेमुदत करार आहे, असंच आपल्याला दिसून येईल. लग्नाच्या मंत्रांत ' धर्मे च अर्थे च कामे च नातिचरामि ' अशी शपथ त्रिवार करून उभयतांकडून घेतली जाते, ' मोक्षे च नातिचरामि ' अशी शपथ कांहीं घेण्यात येत नाहीं. या लग्नाच्या करारात मोक्षाच्या बाबतींत उभयपक्षांना मोकळीक ठेवली आहे आणि म्हणूनच लग्न ही आध्यात्मिक बाब नाहीं असं मी प्रतिपादन करीत असतों. तो आध्यात्मिक बाब असती, तर धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष या चारही पुरुषार्थांच्या बाबतींत बंधन पाळण्याची शपथ घेण्यांत आली असती. तसंच मुलीचा बापही ' प्रजा उत्पन्न करण्यासाठीं ही मुलगी तुझ्या स्वाधीन करतों, ' असाच संकल्प सोडीत असतो. बापानं कोणत्या अटींवर

आपल्याला दुसऱ्याच्या स्वाधीन केली आहे, याची त्या वधूला कल्पना नसते. त्याचप्रमाणं कोणत्या अटीवर आपण या मुलीचा स्वीकार केला आहे, याची पुरेशी जाणीव त्या वरालाही नसते. हीं आमचीं लग्नं ! गोदे, पोरी, लग्न म्हणजे कॉन्ट्रॅक्ट आहे. या कॉन्ट्रॅक्टच्या करारावर एक पुरुष आणि एक स्त्री यांना एकमेकांशीं प्रामाणिकपणानं राहण्याचं बंधन घातलेलं असतं. एकमेकांनीं एकमेकांशीं प्रतारणा करायची नाहीं, वरचढपणा करायचा नाहीं, समबुद्धीनं आणि समवृत्तीनं संसार थाटून राहायचं, याच त्या कराराच्या अटी असतात. पण व्यवहारांत मात्र त्या पाळल्या जात नाहींत. देवाब्राह्मणाच्या साक्षीनं लग्न लागलं, असं आपण म्हणत असतों. पण हें लग्न कोणत्या अटीवर लागलं, त्या अटी पाळायच्या कशा, आणि त्या अटी पाळण्याच्या जबाबदारीवरच लग्नाचं चिरस्थायित्व कसं आहे, याची त्या नवराबायकोंना जाणीव सुद्धां नसते. रूढीला अनुसरून नवरा सत्ता गाजवीत असतो आणि रूढीला अनुसरूनच त्याच्या सत्तेचं जूं बायको बिनतक्रार आपल्या मानेवर वाहात असते, हेंच आमचं लग्न ! लग्न लागण्यापूर्वी विवाहसंस्कारांत घातलेले करारमदार आईबाप आपल्या मुलांना समजावून देत नाहींत, किंवा उपाध्येबुवा म्हणजे लग्नाचे रजिस्ट्रार तेही वधुवरांना समजावून देत नाहींत. ते तरी कुठून समजावून देणार ? या कराराच्या अटी—म्हणजे लग्नाचे मंत्र—कुणालाच माहीत नसतात. आंधळेपणानं हा सारा व्यवहार चालतो त्यामुळंच उभयपक्षाच्या सौख्याची पुढल्या आयुष्यांत हानी होत असते. प्रपंच थाटण्यासाठीं, प्रजावर्धन करण्यासाठीं म्हणजे ईश्वराच्या कार्याला मदत करण्यासाठीं, केलेला हा करार मुळींतच माहीत नसल्यामुळं कुणाकडूनही पाळला जात नाहीं. अतएव आमचीं लग्नं म्हणजे नकळत मोडलेले देवाघरचे करार होत. देवाब्राह्मणांच्या साक्षीनं जें लग्न लागलं, तें मोडलं जात नाहीं असा समज आहे, पण तो चुकीचा आहे. लग्न म्हणजे एक करार आहे असं एकदां ठरल्यावर त्यांतील अटी कोणत्याही एका पक्षानं मोडल्या तर तो करारही मोडला गेला पाहिजे. हा साधा व्यावहारिक सिद्धांत आहे. पण तसं होत नाहीं. हा करार अविच्छिन्न समजला जातो. पण हा करार अविच्छिन्न राहतो असं तरी कसं म्हणावं ? ‘ धर्मेच अर्थेच, कामेच नातिचरामि ’ अशी

त्रिवार शपथ करणारा पुरुष देवाब्राह्मणांच्या साक्षीनं झालेला करार मोडून वाटेल तेव्हां वाटेल तितकीं नवीं लग्नं म्हणजे नवे करार करतो, आणि स्त्री मात्र ती शपथ प्रामाणिकपणें पाळून पुन्हां नवा करार करायला पुरुषांप्रमाणें सरसावत नाहीं. तेव्हां लग्न ही आध्यात्मिक बाब कशी ठरेल ? काय हो बुवा, तुमचं काय म्हणणं आहे याबद्दल ? " साहेब बुवांकडे वळून म्हणाले.

लिमयेबुवा आडकित्यानं सुपारी फोडीत साहेबांच्या तोंडाकडे पहात अजून-पावेतों ऐकत होते. ते आंगठ्याच्या टोकानें पानाला चुना लावीत म्हणाले, " आपलं म्हणणं बरोबर आहे. पण रूढी ही अशी आहे. मनुस्मृतीच्या आधारावर कायदे केले गेले आहेत. कायदे आहेत सरकारचे, लग्न होतं ब्राह्मणाच्या हस्तें, आणि तें मोडायचं असलं तर जावं लागत सरकारकडे. खरं पाहिलं तर ज्यांनीं लग्न लावलं, त्या ब्राह्मणानींच लग्नाच्या प्रपंच्याचा निवाडा केला पाहिजे. पण त्यांच्या हातीं सत्ता कुठं आहे ? सत्ता आहे सरकारच्या हातीं. लग्न लावायचा अधिकार ब्राह्मणाचा. पण तें मोडायचा अधिकार सरकारच्या हातीं. सरकारचे कायदे मनुस्मृतीच्या आधारें. स्मृती करणारा हा मनू होता पुरुष. तोच जर मनुताई असती—किंवा त्या मन्याबापू आणि मनुताई ह्या दोघांनीं मिळून परस्परांच्या विचारानं जर हे कायदे घडवले असते, तर आज दिसत असलेली अनवस्था माजली नसती. कायदे घडवणारा पुरुष सत्तेला लाडचावलेला—त्या स्मृतीच्या आधारें सरकारी कायदे घडवणारेही पुरुषच—सरकारनेंही बायकांची संमती घेतलेली नाहीं. मग पुरुषांनीं शिरजोर कां होऊं नये ? आपल्या हक्कांची पायमल्ली होत आहे, याची बायकांनाही जाणीव नाहीं अशी जाणीव होण्यापूर्वीच म्हणजे अगदीं लहानपणींच त्याना लग्नाच्या अविच्छिन्न करारानं बांधून टाकलं जात असल्या-मुळं पुढल्या आयुष्यांत ती जाणीवही उत्पन्न होत नाहीं. कांहीं दिवस मुलींना चांगल्या सज्ञान होईपर्यंत लग्नाशिवाय राहूद्यात, विवाहांतील शपथांचे अर्थ त्यांना चांगले कळूंद्यात, कीं त्याच मुली पुरुषांना कशा सळो कीं पळो करून सोडतात, तें आपोआप दिसून येईल. "

" ऐकलंस ? " साहेब म्हणाले, " हें झालं बुवासाहेबांचं मत. माझं मत मी तुला कसं सांगू ? माझं लग्न मोठं सुखाचं झालं होतं. पण ती अगदींच

थोड्या मुदतीची बाब झाली. पश्चात्ताप करायची संधी मिळाली नाहीं. त्यामुळं लग्न मोडावं कीं मोडूं नये, याचा विचार करायला मला अवसरच मिळाला नाहीं. दुसऱ्यांचीं लग्नं पाहिलीं, आणि लग्न म्हणजे एक करार आहे असं एकदां गृहीत धरलं, म्हणजे हा करार मोडण्याचा मार्ग कुठं तरी असला पाहिजे. तात्पर्य काय, कीं लग्न हा एक करार आहे, आणि तो करार करण्याच्या बाबतींत चांगलं सज्ञान झाल्याशिवाय कोणत्याही स्त्रीनं किंवा पुरुषानं पडूं नये, आणि कुठल्याही आईबापांनीं सज्ञान झाल्याशिवाय आपल्या मुलांमुलींना या करारांत पाडूं नये खरें पाहिलं तर अज्ञान मुलांच्या हातून देवाब्राह्मणांच्या साक्षीनं कां होईना, कोणताही करार करून घेणं बेकायदेशीर आहे. अज्ञान मुलांनीं केलेला कोणताही करार—लग्नाशिवाय इतर कोणताही करार-कायदेशीर समजला जात नाहीं. पण मनुस्मृतीच्या जोरावर आईबापांनीं अज्ञान मुलाकरवीं करून घेतलेला—कोणत्याही कायदेशीर संस्थेच्या अधिकाराशिवाय करून घेतलेला—हा करार का पाळला जातो याचंच मला आश्चर्य वाटतं."

मी वर लिहिलेला संवाद म्हणजे साहेबांनीं त्या दिवशीं केलेल्या चर्चेचा साधारण सारांशच आहे म्हटलें तरी चालेल. त्यांनीं अगदीं सोप्या शब्दांत आणि सोप्या भाषेंत त्या दिवशीं हा विषय मला समजावून सांगितला होता. पण आतां लिहिल्यावर तो वाचून पाहिला, तेव्हां माझें समाधान झालें नाहीं. तो बराचसा माझ्या भाषेंत मांडला गेला आहे. अगदीं सोप्या भाषेंत गहन विषयसुद्धां माझ्यासारख्या लहानशा मुलीलाही कळतील अशा रितीनें सांगण्याची साहेबांची हातोटी माझ्या ठायीं नसल्यामुळें मला त्यांचें भाषण अस्सल बरहुकूम देता आलें नाहीं.

साहेबांच्या भाषणाशीं माझ्या आईच्या भाषणाचा मी एकापरीनें पडताळा घालून पाहिला. साहेबांच्या भाषणांत पुष्कळसें तथ्य आहे, असें त्यामुळेंच मला वाटूं लागलें.

लग्नामुळें आईला फारसें सुख झालें नाहीं, असा ध्वनी तिच्या भाषणावरून निघत होता. लग्न अगदीं केलेंच पाहिजे, तें झालें नाहीं तर कांहीं तरी अगदीं भयंकर असें होईल, असें जें छबीच्या आईला वाटत होतें, त्याची मला आठवण झाली. प्रश्न त्यावरूनच निघाला होता. महत्त्व कशाला ? लग्नाला, कं शिक्षणाला !

मीं साहेबांना विचारलें, " महत्व कशाला ? लग्नाला कीं शिक्षणाला ? मुलीचं लग्न अमुक एक वयापूर्वी झालं पाहिजे म्हणून तिला शाळेंतून काढून टाकणं न्यायाचं होईल का ?

गंभीर होऊन साहेब म्हणाले, "माझ्या हातीं अधिकार असता, तर लग्नासाठीं मुलीला शाळेंतून काढणाऱ्या आईबापांना मीं फटके लगावले असते. सुदैवानं म्हण किंवा दुर्दैवानं म्हण—माझ्या हातीं तसा अधिकार नाहीं. पण मला जर एकादी मुलगी असती, तर मीं आधीं तिला चागलं शिक्षण दिलं असतं, लग्नाच्या कराराच्या अटी समजावून देण्याची पात्रता येईपर्यंत तिला चांगलं शिक्षण दिलं असतं, असं शिक्षण देईपर्यंत ती मुलगी अर्थातच कायद्याच्या दृष्टीनंही सज्ञान झाली असती, सज्ञान झालेल्या मुलीला कायद्याच्या दृष्टीनं आपले करारमदार आपणच करण्याचा अधिकार येत असल्यामुळं तिच्या लग्नाची माझ्यावरची जबाबदारी आपोआपच दूर झाली असती, आणि ती तशी दूर झाली म्हणजे लग्न करावं कीं न कराव, कसं करावं आणि कुणाशीं करावं याचा विचार करायला तिची ती मुखत्यार झाली असती ! तात्पर्य काय, कीं मुलीला सज्ञान होईपर्यंत योग्य तें शिक्षण दिलं, म्हणजे आईबापांवरची लग्नाची जबाबदारी आपोआप उडून जाते. महत्व लग्नाला आहे. पण शिक्षण देण्याचं महत्व तितकंच जबाबदारीचं आहे. मनुष्याच्या आयुष्यांतील लग्न हा अत्यंत महत्वाचा करार आहे. आणि त्या कराराचं महत्व कळण्यासाठीं शिक्षणाचं महत्व लग्नाच्या महत्वापेक्षां जास्त जबाबदारीचं ठरतं आहे. "

माझ्या बुद्धीला ही गोष्ट आधींच पटली होती. पण साहेबांचा आधार मिळाल्यामुळें मला तेवढेंच अधिक समाधान वाटलें. लग्न म्हणजे काय ? लग्न झाल्यानंतर माणसाची परिस्थिती काय बदलते ! याची मला यत्किंचितही कल्पना नव्हती. पण शिक्षणाला तें आड येतें म्हणूनच लग्नाबद्दल मला तिटकारा वाटूं लागला.

छबीला शाळेंतून काढली होती खरी, पण अजुन तिचें लग्न कुठें ठरलें नव्हतें. तिच्या लग्नाची चाकशी करतां करतांना एक दुसरीच बाब उत्पन्न झाली. तिच्या भावाच लग्न ठरलें आणि त्यामुळें हिंदु लोकांच्या चालीरितींतील एक महत्वाचा प्रश्न उत्पन्न झाला.

---

## प्रकरण १९ वें

# मुलीची मुंज.



छबीचा भाऊ मुंबईला असे. त्याचें लग्न व्हायचें तें रत्नागिरींतच व्हावें असें ठरलें होतें.

लग्नाची सर्व तयारी झाली. रत्नागिरींतील चालीप्रमाणें लग्नासाठीं बराच अवाढव्य खर्च केला होता. तिकडील सर्वच जातींत तरी लग्नाचा थाट शक्तीच्या बाहेर करण्याचा परिपाठ असे–हातीं पैसा नसला तरी कर्ज काढून लग्नाचा ताबूर उभारण्यांत येत असे–तरीही भंडारी जात ही या कामीं सर्वांना मागें टाकीत असे.

या जातीचा हाच मोठा विशेष आहे. ही जात मोठी मानी आहे. कोणत्याही बाबतींत आपला कमीपणा जगाच्या नजरेला येऊं द्यायचा नाहीं असें या जातीचें ब्रीद आहे. ' भंडारी बायको देईल पण बढाई देणार नाहीं ' अशी या भागांत एक म्हण प्रचलित आहे. शिवाजीमहाराजांच्या काळांत दर्यावर्दीपणा करून या लोकांनीं मोठी कीर्ति मिळविली होती. या लोकांतील कांहीं दर्यावर्दी शिवपूर्वकाळीं चांचेगिरीचाही व्यवहार करीत असत. त्यामुळें त्या काळांत त्यांच्या घरातून संपत्ति नांदत असे. असल्या चांचेलोकांतूनच कर्तबगार माणसें निवडून शिवाजीमहाराजांनीं आपलें आरमार उभारलें होतें. इतिहासकालांतील त्या वैभवाची आणि कर्तबगारीची जाणीव त्यांच्या रोमरोमांतून खेळत होती. पिढ्यान्‌पिढ्या ती जाणीव वंशपरंपरेनें तशीच जिवंत राहिली होती. त्या जाणीवेच्या आधारावरच ही जात मानी राहिली आहे.

पूर्वपरंपरेच्या या मानाच्या जाणीवेमुळें पडता काळ आला तरी हे लोक आपला कमीपणा केव्हांही उघडा पडूं देत नाहींत. आणि म्हणूनच प्रत्येक कार्यप्रसंगाच्या वेळीं अवास्तव खर्च करून आपला मान कायम राखण्याची या जातीची धडपड चालत असते.

रत्नागिरींतील इतर भंडाऱ्यांच्या मानानें छबीचा बाप चांगला सुखी

होता. मुंबईला तो कॉन्ट्रॅक्टचा धंदा करीत असे. त्यांत त्यानें चांगलेच पैसे कमावले होते. तेव्हां मुलाच्या लग्नासाठीं कर्ज काढून थाट करणाऱ्या इतर लोकांपेक्षां बऱ्याच मोठ्या प्रमाणांत खर्च करण्याची त्याची ऐपत होती.

एवढा थाट केला होता खरा, पण अगदीं लग्नाच्या वेळीं तो सर्व फुकट जाण्याची पाळी आली होती.

तोंपर्यंत मला माहीत नव्हतें, पण छबीची आई ही पाटाची बायको होती. पाटाच्या बायकोला लग्नाच्या पुण्याहवाचनाला बसण्याचा अधिकार नाहीं, असा एक अचानक प्रश्न उपस्थित झाला.

ब्रह्मवृंदांत मतभेद झाले. पण ते शास्त्रापेक्षां पैशाच्या बळावरच झाले होते.

रूढी अशी होती! छबीचा बाप जातिवंत भंडारी—तो अर्थातच चिरडीला आला. ब्रह्मवृंदापेक्षां जातींतील लोकांचा या कामीं मोठा अडथळा आला होता. वाटेल तें करून छबीच्या आईला या मंगलकार्यासाठीं बसूं द्यावयाचें नाहीं, असा भंडारी जातीनें चंग बांधला होता. वाटेल तें झालें तरी तिच्या हातूनच देवक बसवायाचेंच, अशी छबीच्या बापाची प्रतिज्ञा होती.

प्रकरण अगदीं हातघाईवर आलें. लग्नाच्या मंगलकार्यांत रणें पडण्याची वेळ आली. पण कुणीच माघार घेईनात. ब्रह्मवृन्द जरी शास्त्राच्या दृष्टीनें सर्वानुमतें विरोधक होता, तरीही त्यांतून एक बाणेदार उपाध्ये निघाले.

ब्रह्मवृन्दानें बहिष्कार घातला तरी बेहेत्तर, पण हें कार्य आपण संपादणारच, अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली.

या प्रतिज्ञेच्या मुळाशीं पैशाची लालूच होती—नाहीं असें नाहीं—ब्रह्मवृन्दानें बहिष्कार घातल्यास आपण उपाध्येबुवाचें सर्व कुटुंब पोसूं असें अभिवचन छबीच्या बापानें दिलें होतें खरें—जातिवंत भंडाऱ्याचा शब्द सरकारी दस्तऐवजापेक्षां जास्त मोलाचा आहे याची जाणीव त्या उपाध्येबुवाला होती हेंही खरें—तरी पण एवढा विरोध असतां ठोकठोकपणें अधार्मिक समजलेलें कार्य संपादण्याला नुसत्या पैशाच्या लालचीपेक्षां थोडेसें जास्त नीतिधैर्यच त्या उपाध्येबुवांनीं आपल्या आचरणांत दाखविलें, असेंच मला वाटलें.

लग्नाचा सारा थाट फुकट गेला. लग्न झालें खरें, पण जातींतील माणूस नुसता अक्षता टाकण्यास सुद्धां आला नाहीं. कांहीं सरकारी अधिकारी, कांहीं

जिव्हाळ्याची स्नेही मंडळी आणि सार्वत्रिक रूढ असलेल्या लोकमताला न जुमानणारे चार दोन कट्टे सुधारक यांच्याखेरीज लग्नाच्या समारंभाला कुणीच हजर नव्हतें.

कोंकण प्रांताच्या रीतीप्रमाणें हें प्रकरण पुढें कोर्टापर्यंत गेलें. हजारों रुपये खर्च झाला आणि शेवटीं निकाल छबीच्या बापाच्या विरुद्ध झाला असें मला ऐकल्याचें आठवतें.

कोर्टाच्या निकालाशीं माझा कांहींच संबंध नव्हता. मला लोकांचेंच आश्चर्य वाटत होतें. देवाच्या घरीं सर्व माणसें सारखींच आहेत. मग लग्नाच्या आरंभीं देवाचें आवाहन करायला पाटाच्या बायकोनें कां बसूं नये ?

पाटाच्या बायकोचीं मुलें आणि लग्नाच्या बायकोचीं मुलें यांच्यांत देवा-घरचा कोणताच फरक दिसून येत नाहीं. पाट लागला म्हणून त्या बाईतही देवाच्या दृष्टीनें कोणताच फरक होत नाहीं. मग देवाच्या आराधनेला तिला विरोध कां ?

मीं आईला विचारलें. तेव्हां ती म्हणाली, " अशी रूढी आहे. शास्त्रांतही कदाचित् तसाच आधार असेल. "

यापेक्षां तिला जास्त कांहीं सांगतां आलें नाहीं. या उत्तरानें माझें अर्थातच कांहीं समाधान झालें नाहीं.

दुसऱ्या कुणाला विचारावें याचा मी विचार करीत होतें, त्या वेळीं बाबी-शेट समोर दिसले.

बाबीशेट तात्यांचीं मतें जशीं जुन्या काळचीं नव्हतीं, तसेच ते नव्या काळा-लाही पारखे नव्हते. संगमेश्वरीं वाणीजातीनें यज्ञोपवीत धारण करावें कीं करूं नये, याबद्दल रत्नागिरींत त्या वेळीं त्या जातींत दोन तट पडले होते. कोंकण प्रांतांत वाणी जातींत दोन भेद आहेत. एक कुडाळी वाणी आणि एक संगमेश्वरी वाणी. कुडाळी वाण्यांत पूर्वीपासूनच सर्वस्वी ब्राह्मणाचार पाळले जात असत. मुंज—सोडमुंज, वैदिक विवाहपद्धति, वैदिक श्राद्धकर्में, वार्षिक श्रावणीपासून तों विधवांच्या केशवपनापर्यंत सर्व ब्राह्मणाचार कुडाळी वाणी जातींत प्रस्तुत होते. संगमेश्वरी वाणी जातींत हे आचार नव्हते. ते पूर्वीपासूनच नव्हते कीं मधल्या कुठल्या काळांत नाहींसे झाले याची कुणाला जाणीव नव्हती.

पण ज्या वेळीं ती जाणीव उत्पन्न झाली, त्या वेळीं या जातींतील कांहीं मंड-ळींनीं पहिल्यानें यज्ञोपवीतधारणाचा उपक्रम केला. त्याला त्याच जातींतील जुन्या रूढीला चिकटून राहाणाऱ्या बऱ्याच मंडळींनीं कसून विरोध केला.

ब्राह्मणाचार पत्करल्यामुळें बंधनें जास्त वाढतात, धार्मिक सवलती कमी होतात, ही जाणीव त्या विरोधाच्या मुळाशीं नव्हती. रूढी सोडायची नाहींत, परंपरा मोडायची नाहीं, एवढाच दुराग्रह या विरोधाच्या मुळाशीं होता. त्या-मुळें संगमेश्वर, चिपळूण, खेड, महाड भागांत जानवींवाले आणि बिन जान-वीवाले असे दोन तट या जातींत पडले.

यांतील जानवीवाल्या तटाचे बाबीशेट हे एक कट्टे पुढारी होते. जानवीं घेणें, व्रतबंध करणें, ही सुधारणा आहे—हे सुधारकी चोंचले आहेत—असा बिनजानवींवाल्यांचा जानवींवाल्यावर आरोप होता. तेव्हां लोकदृष्ट्या बाबीशेट हे सुधारक होते आणि म्हणूनच त्यांना हा प्रश्न विचारणें मला सयुक्तिक वाटलें.

मी प्रश्न केला त्या वेळीं बाबीशेट म्हणाले, "पोरी, तूं फाजील चौकस आहेस. या फाजील चौकसपणामुळें तूं जन्माची दुःखी होशील. भंडारी जातीशीं तुझा कांहींएक संबंध नाहीं. तुला या उठाठेवी कशाला ?"

मी म्हटलें, "मी फाजील चौकस आहें हें मला माहीत आहे. भंडारी जातीशीं माझा कांहीं संबंध नाहीं हेंही मला माहीत आहे. पण तेवढ्यासाठीं मी चौकशी कां करूं नये ? माझं वय लहान आहे हेंही मला माहीत आहे. मी लहान तोंडी मोठा घांस घेतें आहें याचीही मला आठवण आहे, पण आयुष्य मोठें आहे याचीही मला आठवण होते. जगांत मला वागायचं आहे, पुढं निरनिराळे प्रसंग येणार आहेत, त्यांची तरतूद मी आधीं कां करूं नये ? आईला मी विचारलं, तिला सांगतां आलं नाहीं. तिनं रूढीकडे बोट दाख-वलं. गांवांतले लोक तुम्हांला सुधारक म्हणतात. जानवं घालण्याच्या प्रघात पडून तुम्हीं जुनी रूढी मोडली आहे, हें मी पाहातें आहें. म्हणूनच तुम्हांला विचारीत आहें."

"अशी माझी शेंडी पकडलीस का ?" हो हो हंसत तात्या म्हणाले, "बाई ग, मीं रूढी मोडली आहे खरी. पण त्या रूढी मोडण्यामुळं मी तुझ्या या

१२

विशिष्ट प्रश्नाच्या बाबतींत बंधनांत पडलों आहें. आमच्या जातींत कुठं कुठं पाट लावण्याचा प्रघात आहे. तो सरसहा नाहीं खरा, पण आहे यांत शंका नाहीं. पाट लावणाऱ्याला जरी आम्हीं वाळींत टाकीत नव्हतों, तरी अशा माणांसाना जातींत कमी लेखलें जात असे. पण आतां आम्हीं जानवीं घेतलीं. आतां जानवी घेणाऱ्या लोकांत तरी पाट लावले जाणार नाहींत. ब्राम्हण जरी आम्हांला पंक्तीला घेणार नाहींत, तरी जानवीं घेऊन आम्ही ब्राम्हणाच्या पंक्तीला बसलों आहोंत यांत काहीं शंका नाहीं. पण यापुढं आम्हांला पाट लावतां येणार नाहींत हें तितकंच खरं आहे. कदाचित् आम्हां जानवीवाल्यांतही कांहीं सुधारक निपजतील, आणि उद्यां पुनर्विवाह लाऊं लागतील. पण त पाट लावणार नाहींत—"

मला चिपळूणचीं आठवण झाली. मी म्हटलें, "म्हणजे काय! पाट लावणं म्हणजे विधवेशीं लग्न करणं, पुनर्विवाह म्हणजेही विधवेचंच लग्न, मग 'पुनर्विवाह करतील पण पाट लावणार नाहींत' असं तुम्हीं म्हणतां याचा अर्थ काय?"

तात्यांनीं एकदां पोटभर हंसून घेतलें आणि म्हटलें, "मोठी खट्याळ पोरटी आहेस तूं. एक शब्द सुद्धां खालीं पडूं देत नाहींस! असे अचुक प्रश्न ऐकले म्हणजे मोठा आनंद होतो. आमच्या घरीं इतकीं खंडीभर मुलं आहेत, पण कुणी देखील तुझ्यासारखे असे अचूक प्रश्न करीत नाहींत. तूं असे प्रश्न करतेस म्हणून तर असा तासान् तास तुझ्याशीं बोलत बसतों—"

"पुरे झाली माझी स्तुति" मीं म्हटलें, "अशानं मी फसायची नाहीं. माझी स्तुती करून तुम्हांला विषय उडवून देतां यायचा नाहीं. गुळाला ओमीळ डसतो तसा मी माझा प्रश्न घट्ट दातीं धरून बसेन."

तंबाकूची एक मलो मोठी पीक टाकून तात्या म्हणाले, "तें मला माहीत आहे. आतां ऐक, पाटाच्या आणि पुनर्विवाहाच्या विधींत फार मोठा फरक आहे. पाटाचा विधी म्हणजे वधुवरांना समोर बसवून नुसता काहीं तरी गडबडगुंडा करून लग्न म्हणजे पाट लावला, असं म्हणण्यांत येतें. पुनर्विवाहाचं तसं नाहीं. पुनर्विवाह ब्राह्मणाचारानंच लावले जातात. लग्नाच्या विधींत आणि पुनर्विवाहाच्या विधींत फारसा—फारसा कां—मुळींच फरक नाहीं म्हटलं

तरी चालेल. फक्त मानपान, मिरवणूका, वराती, गृहप्रवेश वगैरे फालतू भाग त्यांत नसतात. त्यामुळं पुनर्विवाहाचा विधी उच्च दर्जाचा समजला जातो. अर्थातच पाटाचा विधी कमी प्रतीचा समजला जातो. शूद्र दर्जाची लग्नं वैदिक विवाहपद्धतीनं लावलीं जात नाहींत—आमच्या जातींतील लग्नंही तशीच पौराणिक पद्धतींत होत होतीं. आता हीं जानवी घतलीं आणि वैदिक पद्धतीनं लग्न व्हावं लागलं. आतां आम्हालाही ही बंधनं बाधूं लागणार. छबीच्या आईला पुण्याहवाचनाला बसतां येत नाहीं, तें यामुळंच. छबीच्या आईचं हें पुनर्लग्न म्हणजे पाट ब्राह्मणाचारानं झालं नाहीं. म्हणून जिथं ब्राह्मणद्वारा कार्य करायचं तिथं तिला घेतां येत नाहीं. ज्यांचीं कार्यं ब्राह्मणद्वारा झालीं आहेत, त्यांना ब्राह्मणद्वारा होणाऱ्या कार्याशीं संबंध ठेवता येतो. ज्यांचीं लग्नं ब्राह्मणांनीं लावलीं नाहींत, त्यांना ब्राह्मण लावीत असलेल्या लग्नांत यजमान म्हणून बसतां येणार नाहीं. ”

मी एक क्षणभर विचार करून म्हटलें, “ तुमचं म्हणणं बरोबर दिसतं. पण त्यात एक मोठी गोम आहे. ब्राह्मणांनीं विरोध केला तो छबीच्या आईला, बापाला नव्हे. छबीच्या बापाचा आणि छबीच्या आईचा जो पाट लागला, तो एकाच विधीनं. मग छबीच्या आईलाच तेवढा विरोध का ? सुपारी लावून पुण्याहवाचनाला बसायला सर्वजण छबीच्या बापाला सांगत होते. एकच विधी, मग पुरुषाला मोकळीक कां, आणि बायकोला बंधन कां ? ”

“ आतां तर माझी अगदीं जीभच पकडलीस, ” बाबीशेट न हंसतां म्हणाले, “ हा प्रश्न मोठा बिकट आहे खरा. यापूर्वी माझ्या ध्यानांत आला नव्हता. शास्त्रांनी सारीं बंधनं बायकांसाठींच ठेवलीं आहेत. पुरुषांना फारशीं बंधनं नाहींत, हें विचार केला तर दिसून येईल. यापेक्षा मी जास्त काय सांगूं ? ”

त्या वेळीं हा विषय संपला. पण एवढ्यानें त्याचा समारोप झाला नाहीं असें मला वाटलें. जसजसा मी विचार करूं लागलें, तसतसें माझें असमाधान वाढूं लागलें. साहेबांचे शब्द आठवले—लिमयेबुवांचे शेरे आठवले—उत्तर एकच होतें बंधनें बायकांसाठीं आहेत. पुरुषांना बंधनें नाहींत.

पुन्हां आईला विचारलें, त्या वेळीं ती म्हणाली, “ असं आहे खरं. पण तसं कां आहे हें मी तरी कसं सांगूं ! लोक म्हणतात, हीं सर्व बंधनं स्त्रियांच्या

पावित्र्यासाठीं आहेत. पण पुन्हा असा प्रश्न येतो कीं, पावित्र्याचं बंधन पुरुषांना कां न लावावं ? स्त्री तेवढी पवित्र राहायची आणि पुरुषानं मात्र मनसोक्त वागायचं हें कां ? पुरुषाचा अपवित्रपणा त्याच्या पत्नीलाही अपवित्र करीत नाहीं का ? पुरुष अपवित्र झाला तर स्त्री तरी कशी प[ ]त्र राहणार ? पावित्र्यासाठीं स्त्रीनं पदोपदीं स्वार्थत्याग करायचा आणि पुरुषानं स्वार्थत्यागापेक्षां स्वतःच्या सुखासाठीं वाटेल तसं वागायचं असं शास्त्रांनीं कसं ठरवलं ! असं पाहिलं कीं तुमच्या साहेबाचं म्हणणं खरं वाटतं. शास्त्रं पुरुषांनीं घडवलीं आहेत म्हणून पुरुषांना वाटेल तशा सवलती ठेवल्या आहेत. स्त्रियांनीं शास्त्रं घडवलीं असतीं तर कदाचित् यांच्या उलट देखील झालं असतं. पावित्र्य पावित्र्य म्हणून म्हणतात तें असल्या शास्त्रांनीं कसं प्रस्थापित होणार ? असले हे घडवडीत अन्याय पाहिले कीं माझ्यासारख्या खुळ्यामोळ्या बायकोला देखील हीं असलीं शास्त्रं जाळून टाकावीं असं वाटतं. ”

साहेबांना हा प्रश्न विचारण्यांत कांहीं अर्थ नव्हता. त्यांनीं हेंच उत्तर दिलें असतें.

मला या अन्यायाची चीड येऊं लागली. उद्यां मोठी झालें कीं आधीं हीं शास्त्रें जाळून टाकीन असा मीं मनाशीं निश्चय सुद्धां केला. छबीच्या आईचा काय अपराध होता ! खरा अपराधी तिचा बाप. त्यानेंच ना तिच्याशीं पाट लावला ! त्याला मात्र मोकळीक, आणि जिच्याशीं पाट लावला तिला मात्र बंधन ? छबीचा बाप तयार झाला नसता तर तिनें त्याच्याशीं कसा पाट लावला असता ? गुन्ह्याचा बोजा त्याच्यावरच नाहीं का ? मग त्याला मोकळीक कां ? वेदशाळेंतील गुरुजींनाही मीं विचारून पाहिलें पण त्या वेदाभ्यासजड पंडीताला समाधानकारक उत्तर देतां आलें नाहीं. माझ्या प्रश्नाचं त्यांची बोबडी वळली.

प्रश्न उत्पन्न होत होते, पण त्यांचें निराकरण होत नव्हतें. पुन्हां पुन्हां मला वाटे, माझे प्रश्न असे उत्तराशिवाय राहाणार काय ? अगदीं सरळ प्रश्न केला तर उत्तरादाखल शास्त्राचे आधार दाखवतात. मनूनें असें म्हटलें आहे, देवलस्मृतींत असें लिहिलें आहे, पराशर तसें म्हणतो, याखेरीज दुसरें उत्तर नाहीं. तुमचें स्वतःचें म्हणणें काय आहे असें विचारलें, तर एकालाही

उत्तर देतां येत नाहीं. माणुसकीच्या दृष्टीनं विचार केला म्हणजे सरळ उत्तर येतें तें शास्त्राला संमत नाहीं, आणि शास्त्राकडे पाहिलें तर माणुसकीला त्यांत यत्किंचितही वाव दिलेला दिसत नाहीं.

ज्यांनीं शास्त्रं निर्माण केलीं, स्मृति निर्माण केल्या, ते ऋषि म्हणजे माणूसच होते ना ! त्या काळाला अनुसरून त्यांनीं स्मृति लिहिल्या असतील, पण त्या वेळचीं बंधनें या काळांत पाळलीं जाण्याचा अट्टाहास कां ! शिवाजीमहाराजांच्या राजवटींत मोंगलांच्या वेळचे कायदे नाहींसे झाले. मराठेशाहींतले कायदे आज इंग्रजीअंमलांत कुठें शिल्लक राहिले आहेत ? ह्या अगदीं नजरेसमोरच्या गोष्टी. मग ज्या काळचा इतिहास सुद्धां माहीत नाहीं, मनुस्मृति मनूनेंच लिहिली कीं काय याचा देखील जिथं पुरावा नाहीं, तिथं अशा शंभर छिद्रांच्या फाटक्या वाकळा पांघरून आज आम्ही थंडींत कुडकुडत कां पडावें !

घडघडीत माझ्या नजरेसमोर दिसत होतें. पुण्याहवाचनाला बसतां येत नाहीं असें छबीच्या आईला ज्या वेळीं सांगितलें गेलं, त्या वेळीं ती ढळढळां रडूं लागली. तिचा बिचारीचा काय अपराध होता ! तिच्या मुलीचें लग्न. त्याच्यासाठीं तिनं देवापुढें हात सुद्धां जोडूं नयेत का ! देवघरांत जाऊन सातदां देवापुढें नाक घांसून ती ढळढळां रडली. देवघरांतल्या देवापुढें हात जोडायला तिला कुणीच विरोध केला नाहीं—पण लग्नाच्या मंडपांत बसून अग्निदेवतेपुढें हात जोडायचे—नव्हे नवरा आवाहन करीत असतां—स्वतःच्या तोंडानें नव्हे, तर ब्राह्मणद्वारा आवाहन करीत असतां त्याच्या हाताला हात लावायचा सुद्धां तिला अधिकार नसावा ?

वेदशाळेंतील गुरुजींना मीं असें विचारलें, त्या वेळीं ते म्हणाले, " ती शूद्र आहे, द्विज नाहीं. म्हणून तिला तो अधिकार नाहीं.

मी विचारलें, " द्विज आणि शूद्र यांच्यांतला भेद काय ? "

गुरुजी म्हणाले, " द्विज म्हणजे दोन वेळ जन्मलेला. म्हणजे एक नैसर्गिकरीत्या झालेला जन्म आणि दुसरा धार्मिक जन्म म्हणजे व्रतबंध. शूद्राला व्रतबंधाचा अधिकार नाहीं. "

माझ्या डोक्यांत सहज एक विचार आला. मी म्हटलें, " ज्याचा व्रतबंध झाला नाहीं तो प्रत्येक मनुष्य शूद्रच समजायचा ना ! मग माझ्या आईची मुंज कुठें झाली आहे ! तो शूद्रीच नाहीं का ? "

गुरुजी संतापून म्हणाले, " आन्हिकाची वेळ टाकून तुझ्यासारख्या चहाटळ पोरीशीं मी एक क्षणभर देखील बोलूं इच्छीत नाहीं!"

माझी खात्री झाली, गुरुजी निरुत्तर झाले. 'शेषं कोपेन पूरयेत्' करून त्यांनीं पळ काढला. पुन्हां हा असा प्रश्न आला. मुंजीनें जर माणूस द्विज म्हणजे ब्राह्मण होतो, तर मग ब्राह्मण—बायकांची वाट काय? ब्राह्मणांच्या बायकांचीं कांहीं मुंज होत नाहीं. मग द्विज-पुरुषाशीं त्यांचीं लग्नें कशीं लागतात ! या विवाहाला मिश्रविवाह म्हणायचें कीं काय !

दुसऱ्या दिवशीं मी डॉक्टरसाहेबांच्या बंगल्यावर गेलें, त्या वेळीं त्यांच्याकडे एक पाहुणे आलेले मला भेटले. त्यांचें नांव राजारामशास्त्री भागवत. डॉक्टरांचे ते अगदीं जिवलग मित्र होते. त्यांचा परिचय करून देतांना डॉक्टर मला म्हणाले, " यांची चांगली ओळख ठेव. गेल्या ग्रहणाच्या वेळीं 'दे दान सुटे गिराण' असं लिहून त्याच्याखालीं 'कान्ह्या झारडा' अशी सही करून मी कार्ड पाठवलेलं तूं पाहिलंस, त्या वेळीं मला काय विचारलंस तें आठवतं ना ? माझ्या एका विक्षिप्त मित्राला हें कार्ड पाठवलं आहे, म्हणूनच तें असें विक्षिप्तपणानं लिहिलं आहे असं मीं तुला सांगितलं होतं. हेच ते माझे विक्षिप्त मित्र. हे राजाराम रामकृष्ण भागवत ऊर्फ रा. रा. भा. या नांवानंच सर्वत्र प्रख्यात आहेत. रा. रा. भा. याच नावाखालीं त्यांचे लेख प्रसिद्ध होतात—"

इकडलीं तिकडलीं बोलणीं झाल्यावर मी गुरुजींशीं झालेल्या भाषणाची हकीगत सांगितली. त्यासरशीं राजाराम शास्त्री रंगांत येऊन म्हणाले, " ऐक, कान्होबा ऐक, या एवढ्याशा पोरीला कळतं, तेवढं या आमच्या शास्त्री पंडितांना सुद्धां कळत नाहीं. मुलींची मुंज केली पाहिजे असं मी म्हणतों म्हणून माझी थट्टा करतात. वेदांना कोपऱ्यांत दडपून रूढीचा आधार दाखवतात. आमच्यापेक्षा पार्शीच शहाणे—तेच खरे आर्य आहेत. त्यांच्यांत मुलांचा आणि मुलींचा दोघांचाही व्रतबंध होत असतो. दोघेंही जन्मभर उपवीत धारण करतात. आम्ही अग्नीला नुसती देवता म्हणतों खरं, पण मुंज न झालेल्या स्त्रीला आवाहनाला बसवून अग्निदेवाचा उपमर्द करतों. या साऱ्या शास्त्री—पंडितांना सुळावर चढवलं पाहिजे. "

"मग तुम्ही काय वाट? तूंही राजारामशास्त्री आहेस कीं!" डॉक्टर हंसत हंसत म्हणाले.

अगदीं चिरडीस आल्यासारखें करून शास्त्रीबुवा म्हणाले, "मीं शास्त्री होतों, आतां नाहीं. आतां नुसता रा. रा. भा. आहे. त्या शास्त्रीपंडितांचा वैरी होऊन बसलों आहे. जिथं सांपडतील तिथं सापासारखे ठेचीन."

असें म्हणून ते घाईघाईनें उठले आणि आंतल्या खोलींतील एक ब्याग आणून ती उघडून म्हणाले, "हीं घे माझीं चोपडीं आणि आणि एकदा चांगलें वाचून पहा. मला फार आवडलीस तूं पोरी. अशी पोरं पाहिजेत सारीं चोपडीं चांगलीं लक्षपूर्वक वाच. नंतर मला वाटेल तितके प्रश्न कर. तुझ्यासारखीं प्रश्न करणारीं मुलं भेटलीं म्हणजे माझ्या बुद्धीला चलन मिळतं. जीभ वळवळूं लागते. मग सारखा बोलत सुटतों. प्रश्न कीं उत्तर! प्रश्न कीं उत्तर! दुसरी बात नाहीं. कुणी तरी प्रश्न करावे आणि त्याला उत्तर द्यायची संधि मिळावी म्हणून मी सारखा तळमळत असतों."

मला मोठा आनंद झाला. कुणालाही प्रश्न केला कीं, प्रत्येकजण मला दाबीत असे किंवा उडवा उडवी तरी करीत असे. पण आज उत्तर देणारी एक व्यक्ति आढळली हें पाहातांच मला आनंद झाला. त्यांच्या पुस्तकांच्या वाचनानें माझ्या पुष्कळ प्रश्नांवर प्रकाश पडला.

रत्नागिरीला त्यांचा मुक्काम फारच थोडा होता. त्या मुदतींत त्यांची माझी बरीच चर्चा झाली. त्यांची हकीकत देण्यानें पुष्कळशा गोष्टींची पुनरुक्ति होणार आहे म्हणून ती येथें देत नाहीं. माझ्या पुढील आयुष्यांत त्यांची गांठ पडण्याचे योग आले आहेत. त्या वेळीं ती हकीकत नमूद करणें बरें पडेल.

## प्रकरण २० वें.

# बनी पुनः भेटली.



दिवसांवर दिवस आणि महिन्यांवर महिने जात चालले होते. शाळेंतल्या अभ्यासाबरोबरच शाळेबाहेरच्या जगाचा अभ्यास तितक्याच झपाट्यानें चालला होता.

रत्नागिरीसारख्या लहानशा गांवाचें क्षेत्र तें काय, पण त्यांतही रोज नवे चमत्कार पहायला मिळत होते. डोळे उघडे ठेवून पहात असल्यामुळें मला दिसत होतें, हा माझा दोष होता. त्यांत जगाचा कांहींच अपराध नव्हता. प्रत्येक ठिकाणीं उगीच बारकाईनें पहाण्याची माझी खोड वयाबरोबर वाढत जात होती, आणि जसजशी ही खोड वाढत होती तसतशा जास्त जास्त गोष्टी मला विशेष बारकाईनें दिसूं लागल्या होत्या. दुसऱ्यांना जें दिसत नव्हतें तें मला दिसून येत असे, आणि नंतर मी त्याची विचक्षणा करीत असें. त्यामुळें रत्नागिरीसारखें लहानसें क्षेत्रही माझ्या नजरेला पुरून उरत होतें.

माझ्या या चौकसपणाला डॉ. कीर्तिकर आणि बाबीशेट तात्या हे उत्तेजन देऊन वाढवीत असत. त्यामुळें इतरांनीं मला कितीही नांवें ठेवलीं तरी त्यांची पर्वा न बाळगण्याची मला संवय होत होती.

दादा मॅट्रिक होऊन पुढील शिक्षणासाठीं मुंबईच्या कॉलेजात गेला होता. हायस्कूलच्या शिक्षणाच्या शेवटच्या पायरीच्या जवळपास मीही येत चाललें होतें. माझ्या शिक्षकांचा माझ्यावर फार लोभ होता. आणि हायस्कुलांत मी एकटीच मुलगी असल्यामुळें ते माझ्याबद्दल विशेष काळजी घेत होते. संस्कृतची जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप पूर्वीच्या काळांत रत्नागिरी हायस्कूलच्या सत्तेची समजली जात असे. मधलीं कांहीं वर्षे हायस्कूल तिला मुकलें होतें. पण आतां मी तीं मिळवीन अशी आशा वाटूं लागल्यामुळें शास्त्रीबुवाही माझ्या संस्कृताच्या अभ्यासाकडे व्यक्तिविशेषानें लक्ष देत होते.

शास्त्रीबुवा एक कर्मठ ब्राह्मण होते. त्यांना पूर्वी इंग्रजीचा संस्कार नव्हता. त्यांनी जुन्या पद्धतीनें संस्कृतचा अभ्यास केला होता. पण चालू शिक्षणाची जबाबदारी अंगावर पडल्यामुळें कर्तव्याच्या जागृतीनें त्यांनी खाजगी रीतीनें इंग्रजी भाषेचा चांगलाच अभ्यास केला. इंग्रजींतून संस्कृत विषयांचें शिक्षण देण्यास त्यांनीं सुरवात केली होती.

पुरुषशिष्यार्थ्यांचा माझ्याबद्दलचा हेवा दिवसेंदिवस वाढत जात होता. शिक्षक वर्गाचा माझ्याबद्दलचा अभिमान दिवसेंदिवस त्यांच्या डोळ्यांत जास्त सलत होता. त्यामुळें माझा पाणउतारा करण्यासाठीं वाटेल त्या खोट्यानाट्या कंड्या पिकवून कर्मठ असलेल्या शास्त्रीबुवांचें मत माझ्याविषयीं कलुषित करण्याचा ते प्रयत्न करीत होते.

शास्त्रीबुवा जितके कर्मठ होते, तितकेच सत्यान्वेषी होते. माझ्या वृत्तीची त्यांना ओळख होती. वादविषयक आचारविचारांविषयीं मी त्यांच्या घरीं जाऊन मनसोक्तपणें चर्चा करीत असें.

पण त्याचा त्यांना केव्हांच राग येत नसे. माझी जिज्ञासा दाबून टाकण्याचा दडपशाहीचा प्रयत्न त्यांनीं केव्हांही केलेला नाहीं. केव्हां केव्हां माझ्या प्रश्नांनीं ज्या वेळीं ते निरुत्तर होत असत, किंवा सकृद्दर्शनीं सयुक्तिक वाटणारें आणि कर्मठवृत्तीला धक्का देणारें उत्तर त्यांना देतां येत नसे, त्या वेळीं ते म्हणत असत, "पोरी, ही असली चर्चा माझ्याजवळ न करशील तेवढी बरी. तुझ्या या चर्चेनें एकादे वेळीं माझ्या हृदयात सुधारकी वृत्तीचें बीज रुजूं लागेल अशी मला भीति वाटते. तात्त्विक दृष्टीनें या गोष्टी माझ्या बुद्धीला पटतात. पण जुन्या समजुती माझ्या रक्तांत इतक्या भिनून गेल्या आहेत, आणि त्या समजुतींचा अभिमान इतका दृढमूल झालेला आहे, कीं त्या टाकून देण्याची नुसती कल्पना सुद्धां येणें म्हणजे मला भयंकर पाप वाटतें."

तरी मी चर्चा कधीं सोडली नाहीं. जुन्या रूढींना पाठपुरावा देणारे स्मृतींचे आधार मी त्यांच्यापासून मिळवीत होतें. माझ्या समजुतीच्या मंडनाला त्या आधारांचा जरी कांहीं उपयोग नव्हता, तरी मुळांत काय आहे हें पक्केपणानें समजून घेतल्याशिवाय मला त्यांच्या खंडनाची तयारी करणें अशक्य झालें असतें. म्हणूनच मी हे आधार गोळा करीत होतें.

शास्त्रीबुवांच्या सहवासाचा लाभ मला फारच मोठ्या प्रमाणांत झाला. त्यांच्याइतके विद्वान शास्त्री मला पुढील आयुष्यांत क्वचितच आढळून आले. त्यांच्याइतकी अभ्यासु व्यक्तीही सहजासहजीं क्वचितच दिसून येत असे. त्यांचें वय पन्नाशीजवळ आलें होतें. पण त्या वयांत मॅट्रिकच्या परीक्षेला बसण्याचा विचार वारंवार त्यांच्या मनांत येत असे. ते शास्त्री होते तसेच एक उत्तम वैद्यही होते. आणि आपल्या नुसत्या विद्यार्थ्यांनाच नव्हे, पण गांवांतील लोकांनाही आपल्या वैद्यकीज्ञानाचा ते फायदा देत असत. त्यांचें वैद्यकीचें शिक्षण आर्यवैद्यक पद्धतीनें जरी झालें होतें, तरी इंग्रजी वैद्यकाच्या पद्धतीचाही त्यांनीं चांगलाच अभ्यास केला होता. स्टेथॉस्कोप आणि थर्मामिटर वापरणारे ते पहिले वैद्य होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रवाळ-भस्माबरोबर क्विनाइन देण्याचा प्रयोग त्यांनींच पहिल्यानें सुरू केला. शास्त्री-बुवा या नात्यानें असो किंवा वैद्य या नात्यानें असो, चिंतामणशास्त्री केळक-रांना रत्नागिरींतील लोक केव्हांही विसरणार नाहींत.

मला राहून राहून आश्चर्य वाटे तें हेंच, कीं वैद्य आणि डॉक्टरांचा जिव्हाळ्याचा संबंध माझ्या आयुष्यांत कां यावा ?

मला पहिली स्फूर्ति देणारे मोरू मामा वैद्य. दुसरे डॉ. कीर्तिकर. तिसरे शास्त्रीबुवा. मोरूमामांनीं मला मातृभूमीची जाणीव करून दिली, पण शेवटीं ती इच्छा तशीच राहिली. बाबांनीं त्या वेळीं म्हटलें होतें खरें, पण कोळथर इब्राहीमपूरला जाण्याचें दिलेलें वचन बाबा सहजासहजीं विसरून गेले. माझ्या चंडखोर वृत्तीला डॉ. कीर्तिकरांनीं चालन दिलें आणि अनिच्छापूर्वक कां होईना—शास्त्रीबुवांनीं तिचें पोषण केलें.

स्मृतीचे ग्रंथ मी जसजसे वाचूं लागलें, तसतसा माझा स्मृतींबद्दलचा आदर कमी होऊं लागला. त्यांतील श्लोकरचना अगदींच ढिसाळ असल्याचें मला दिसून आलें.

एके दिवशीं शास्त्रीबुवांना मी तसें बोलून देखील दाखविलें. त्या वेळीं कौतुकानें ते हंसून म्हणाले, " तुझा आक्षेप अस्थानीं नाहीं. स्मृतींतील श्लोक अगदींच साध्या भाषेत लिहिले आहेत. भागवतादि ग्रंथ किंवा किरातार्जुनीय, शिशुपालवधासारखीं काव्यें यांच्या तोडीला त्यांची संस्कृतरचना बसणार

नाहीं खरी, तरी पण त्यांच्या या सुबोध भाषेमुळेंच ते सर्वांना समजायला सुलभ झाले आहेत."

मी चट्‌कन म्हटलें, ' मी सुद्धां असले श्लोक सहज तयार करीन.'

माझ्या या धिटाईबद्दल शास्त्रीबुवांना राग आला नाहीं. ते म्हणाले, "बरं आहे. आणि तसा आक्षेपही आहे. यांतील कांहीं श्लोक कुणी मागाहून घुसडून दिले आहेत असं समजलं जातं."

खरोखरच तसले श्लोक मला करता येतात कीं नाहीं याचें प्रत्यंतर पाहाण्यासाठीं मी मनुस्मृतीच्या धर्तीवर अनुष्टुप वृत्तांत कांहीं श्लोक तयार करून शास्त्रीबुवांना दाखविले. शास्त्रीबुवांच्या मतानें सुधारकी वाटणाऱ्या कांहीं मतांचा पुरस्कार करण्याचा विषय या श्लोकांत योजिला होता.

ते वाचून पहातांच शास्त्रीबुवा म्हणाले, " श्लोक चांगले झाले आहेत, यांत संशय नाहीं. व्याकरणदृष्ट्या हे निर्दोष आहेत. पण त्यांतील विषय मात्र सदोष आहे. उद्यां असले बनावट श्लोक तयार करून ते स्मृतींतीलच आहेत असं सांगण्याचा मोह तुला उत्पन्न झाला, तर मला आश्चर्य वाटणार नाहीं."

ही भलतीच कल्पना एका बंडखोर वृत्तीच्या मुलीच्या मनांत आपण भरवून देत आहों याची जाणीव शास्त्रीबुवांना त्या वेळीं नव्हती. पण पुढील आयुष्यांत असले श्लोक बनवून आधार दाखवणाऱ्या लोकांशीं मी जो वाद विवादाचा धुमाकूळ माजवला, त्याचें सर्व श्रेय शास्त्रीबुवांच्या या उद्गारांनाच होतें हें कळायला ते आज हयात नाहींत याचें मला दुःख वाटतें.

काव्यशास्त्रविनोदांत दिवस भराभर निघून जात होते. आणि चौदाव्या वर्षी मॅट्रिकच्या परीक्षेला मी बसेन असें बाबांनीं केलेलें भविष्य खरें होण्याचीं चिन्हें दिसत होतीं.

मी फारशी अभ्यासू नव्हतें. पुस्तकें घेऊन दादाप्रमाणें मी डोकें खुपसून बसत नसें. उनाडपणा करण्यांत माझा जास्त वेळ जात असे. तरीही अभ्यासांतील माझी प्रगति इतर कोणत्याही अभ्यासु मुलापेक्षां जास्त प्रमाणांत झाली होती. प्रत्येक सहामाहीच्या परीक्षेत माझा नंबर पहिला येत असे, आणि ' मुलगी असल्यामुळें मास्तर लोक उगीच जास्त मार्क देऊन तिला चढवून ठेवतात ' असें धडधडीत म्हणायला हेवेखोर पुरुषविद्यार्थी यत्किंचितही दिकत बाळगीत नसत.

हेवेखोर पुरुषविद्यार्थ्यांना शत्रुत्वाच्या नात्यानें माझ्या प्रगतीबद्दल जितकें वाईट वाटत असे, तितकेंच छबी आणि कमळा या माझ्या दोघां मैत्रिणींनाही मित्रत्वाचें नातें असतांही वाटत असे. त्यात त्यांचा दोष नव्हता. त्यांची इच्छा जबर होती पण ती पुरी करण्याची संधी त्यांना मिळत नव्हती. तशी संधी मिळाली असती तर छबीनें माझ्यावरही नंबर पटकावला असता, असें मी प्रांजळपणें कबूल करण्यास तयार आहें.

अजूनही तिचें लग्न झालें नव्हतें. तिच्या आईबापांच्या नजरेनें ती लग्न होण्याच्या मर्यादेबाहेर वाढली होती. पण त्यांच्या जातीच्या दृष्टीनें पाहिलें तर तिच्या वयांपेक्षांही जास्त वयाच्या मुली त्या जातींत त्या काळातही बऱ्याच दिसून येत असत.

पण कमळाच्या जातीचें तसें नव्हतें. तिच्या जातींत फार मोठया वयाच्या मुली ब्राम्हणांप्रमाणें लग्नाशिवाय राहूं शकत नसत. तिचें लग्न याच वर्षी काय वाटेल तें करून करण्याचा तिच्या आईबापांनीं संकेत केला होता.

तितक्यांतच अचानक एक योगायोग घडून आला. मी शास्त्रीबुवांच्या घराकडून आमच्या बंगल्यावर यायला निघालें असतां रस्त्यावर मला चिपळूणच्या कचेरींतील गोडबोले भेटले. त्यांनीं पेन्शन घेतलें होतें. रत्नागिरींत त्यांचें घर असल्यामुळें ते आतां एक प्रकारें वृद्धापकाळीं माहेरवाशी झाले होते.

त्यांना पहातांच मला आनंद झाला. आनंद झाला तो गोडबोले भेटल्यामुळें नव्हे, तर माझी बाळमैत्रीण बनी भेटेल, तिची ताई भेटेल, आणि त्यांच्या सावत्र आईच्या गमतीही पाहायला मिळतील म्हणून. मी त्यांचा पत्ता विचारून घेतला.

त्यांचें घर वरच्या आळीला होतें. रविवार साधून मी त्यांच्या घरीं गेलें.

मला पाहातांच बनी आनंदानें फुलून निघाली. पण तिला पाहातांच मात्र मला चमत्कारीक वाटलें.

ती एक मळी मोठी अवजड हिरवी साडी नेसली होती. अर्धा हात भरून येईल इतक्या हिरव्या बांगड्या, गोट, पाटल्या, तोडे, गळ्यांत ठुशी, वज्रटिका, कानांत बाळ्या बुगड्या, डोईंत राखडी चंद्रकोर अशा अवजड भारानें ओथंबलेलें तिचें स्वरूप पाहून मला आश्चर्य वाटलें.

'अशी वेड्यासारखी पाहतेस काय?' बनी म्हणाली.

"पाहूं नको तर काय करूं? इतक्या लवकर तुझं लग्न झालं असेल असं मला वाटलं नव्हतं" असें उत्तर देतांनां एक सुस्कारा नकळत माझ्या हृदयांतून निघून गेला.

"इतक्या लवकर!" बनी साधारण आश्चर्यानें म्हणाली, "इतक्या लवकर कशानं? तसं पाहिलं तर इतरांच्या मानानं माझ्या लग्नाला वर्षभर जास्तच लागलं असं बाबा म्हणताहेत. आतां मला हें चौदावं वर्ष लागलं नाहीं का?"

निराळ्या वातावरणांत वावरत असल्यामुळें मला तसें वाटलें खरें, पण व्यावहारिक दृष्ट्या ती माझी चूक होती. बनीचें लग्न झालें यात कांहीं आश्चर्य नव्हतें, आणि तिचें लग्न झाल्याचें मला आश्चर्य वाटलें, याचें बनीला आश्चर्य वाटावें यांतही कांहीं आश्चर्य नव्हतें, असें म्हटलें असतां आश्चर्य वाटूं न

तितक्यात ताई आली. ती पूर्वीचीच करुणरसाची मुद्रा तिच्या चेहऱ्यावर तशीच दिसून येत होती. मला पाहातांच आनंदाच्या भराची एक लहानशी लकेर तिच्यावरून निघून गेली.

"शेवटीं आलीसना गोदूताई?" ती म्हणाली, "पाहिलंस बने, मी नव्हतं तुला सांगितलं, गोदूताई तुला भेटायला आल्याशिवाय राहायची नाहीं."

मी म्हटलें, "शेवटीं कां? अगदीं आरंभींच आलें. दोन दिवसापूर्वी तुमचे बाबा रस्त्यांत भेटले, पण त्या दिवशीं येणं कांहीं शक्य नव्हतं. आज रविवारची सुट्टी साधून आलें. केव्हां आलांत तुम्ही रत्नागिरीला?"

"चांगले तीन महिने झाले आम्हांला इथं येऊन!" ताई म्हणाली, "मी रोज तुझी आठवण काढीत असें. बनी होती आपल्या सासरीं, ती गेल्या पंधरा दिवसांपूर्वी आली. बाबांना म्हटलं, तर त्यांनीं कांहीं मनावर घेतलं नाहीं. त्यांनीं पेन्शन घेतलं कीं नाहीं! आतां कशाला येतात ते तुम्हाला भेटायला!"

ताई बऱ्याच मोकळ्या मनानं बोलत होती. बापानें आमच्याकडे भेटायला यायचें नाकारल्यामुळें तिच्या मनाला बरेंच लागून राहिल्यासारखें वाटत होतें.

"हें असंच असतं," ताई म्हणाली, "त्या वेळीं दर रविवारीं बाबा तुम-

च्या घरीं जायला चुकत नसत. आतां काकुळती केली तरीही ऐकेनात. तुला भेटण्यासाठीं आम्ही तळमळत होतों. दुसऱ्या कुणाला त्याचं काय ! तसं काहीं असतं तर मात्र हटकून गेले असते."

ताई पूर्वीपेक्षां बरीच धीट झाल्यासारखी दिसत होती. 'दुसऱ्या कुणाला' म्हणजे कुणाला हें माझ्या ध्यानांत आलं आणि मी विचारलें, "बनीची धाकटी आई कुठं आहे ?"

अगदीं खालच्या आवाजांत ताइ म्हणाली, "गेली असेल कुठं गांव हुदडायला, ती घरची मालकीण आहे. आमच्यासारखी परस्वाधीन नाहीं."

प्रकरण बरेंच विकोपाला गेलें असावें असें मला वाटलें. एरव्हीं ताई इतक्या रोखानें बोलली नसती. अप्रिय विषय टाळण्याच्या रोखानें मीं म्हटलें, "एकूण बनीचं लग्न झालं तर !"

हंसतमुखानें ताई म्हणाली, "हो, झालं म्हणजे ! व्हायचंच. तुझंच कसं अजून लग्न झालं नाहीं असं मी विचारलं असतं, पण तुमची आमची बरोबरी कशी होईल ! आम्ही आपलीं गरीब माणसं, गरीबांच्या रीतीनंच आमचे व्यवहार व्हायचे."

"कुठं दिलीत बनीला ?" मी विचारलें.

ताई म्हणाली, "तिचं सासर चिपळूणजवळच एका खेड्यांत आहे. सासरा मुंबईला नोकरीला असतो. नवराही तिकडेच शाळेंत शिकत असतो. आतां इथं आली तीं मुंबईहूनच आली."

मला बनीचा मत्सर वाटला. लग्न झालं म्हणून नव्हे—तर तिला मुंबईला जातां आलं म्हणून. बनीच्या गृहस्थितीच्या तुलनेनें आमची चांगली सुस्थिती होती. पण अजून मला मुंबईला जातां आलं नव्हतं जाण्याची अगदीं तळमळ असूनही जातां आलं नव्हतं—याचंच मला वाईट वाटलं. लग्न झालें त्यामुळें कां होईना, पण बनीला मुंबई पाहायला मिळाली, आतां ती मुंबईलाच राहील, याचाच मला मत्सर वाटला.

इतका वेळ ताई बोलत होती, पण बनी अगदींच स्वस्थ होती. मीं तिच्याकडे पाहिलें, त्या वेळीं मला असें वाटलें कीं तिच्या ठायीं अकारण पोक-

पणा आला होता. चिपळूणला असतानांची तिची उल्हासी वृत्ति आज दिसून येत नव्हती.

विचारल्याशिवाय माझ्यानें राहावेना म्हणून मी म्हटलें, " बने, तूं अगदींच कशी ग बदललीस ! एखाद्या पोक्त बाईसारखी दिसूं लागलीस. "

बनीनें उत्तर दिलें नाहीं. पण ताई म्हणाली, " तिचं लग्न झालं नाहीं आतां तो लहानपणचा हूडपणा कसा राहील ? तुझं लग्न झालं असतं, तर तूंही अशीच झाली असतीस. चिपळूणला आमच्या आईसाहेब पाहिल्या होत्यास ना!"

ताईनें असें म्हणायला आणि ' बने अग बने ' अशी बाहेरून हाक यायला एकच गांठ पडली. " आल्या वाटतं बाईसाहेब ! " असें म्हणत बनी धांवतच बाहेर गेली.

ताई आणि मी एकामेकांकडे नुसत्या पहात राहिलों होतों. ताईची मुद्रा अगदीं कावरीबावरी झाली होती. वरिष्ठ अधिकारी आल्याबरोबर हाताखालचा कारकून जसा बावरतो, तशी तिची स्थिति झाली होती.

मी कांहीं बोलणार होतें, तोंच बाईसाहेबांची स्वारी आंत आली. आणि त्याबरोबर माझ्या ओंठावरचे शब्द तोंडांतच राहिले. बनीच्या कडेवर एक लहान मूल होतें. तें अगदींच किचकट दिसत होतें. त्या मुलाच्या अंगांत खणाचें झबलें होतें आणि डोक्यावर खणाची कुंची होती, त्यामुळें तो मुलगा होता कीं मुलगी होती हें समजण्यास मार्ग नव्हता.

मला पाहातांच बाईसाहेबांची स्वारी थांबली आणि म्हणाली, " असं ! आपली स्वारी आली आहे ! तेव्हांच बनी आली नाहीं ती बाहेर. आतां काय करणार आहे आपली स्वारी इथं येऊन ! आतां ते चिपळूणचे दिवस विसरा म्हणावं ! पेन्शन घेणं झालं तें कळलं आहे ना गोदूताई ! आतां कांहीं तुमचा आमचा वरिष्ठ कनिष्ठ संबंध राहिला नाहीं ! आतां इथं यायचं असेल तर चांगल्या माणसासारख्या वागा म्हणावं ! तीं तसलीं कुचकट बोलणीं आतां कुणी नाहीं ऐकून घेणार. "

बोलत बोलत बाईसाहेब आंत निघून गेल्या.

तिचेंही वय फारसें मोठें नव्हतें. पण बोलण्याचा आव मात्र मोठ्या आजीबाईचा होता. मला त्याचें आश्चर्य वाटलें नाहीं. कारण ही तिची पूर्वींचीच वृत्ति होती.

" माऊ कीं बहीण ? " मीं बनीला विचारलें. ' माऊ ! ' असें म्हणतांना तिच्या डोळ्यांना पाणी आलें, याचें मात्र मला आश्चर्य वाटलें. आपल्याला माऊ झाल्याबद्दल तिला वाईट कां वाटावें ?

मन मोकळें करून बोलण्याची संधी गेली होती, पण मी तशीच निघून गेलें असतें, तर तेंही बरें दिसलें नसतें.

इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत आम्हीं तिघीही बराच वेळ बसलों ठकी-चेंही लग्न झाल्याचें बनीनें सांगितलें. तिचेंही सासर मुंबईलाच होतें.

आम्ही बोलत होतों तोंपर्यंत बनीची आई बाहेर आली नाहीं. ताईनें घरांत जाऊन मला एक लाडू आणून दिला. मला चिपळूणची आठवण झाली. आतिथ्यधर्माला अनुसरून मी लाडू खाऊन पाणी प्यालें. पण एकंदरींत मनाला फार संकोच वाटत होता. मोकळेपणानें असें कांहींच बोलतां आलें नाहीं.

मी जायला निघालें, त्या वेळीं आंतून आवाज ऐकू आला, "तिला चांगलं कपाळभर कुंकू लाव बरं बने ! मी कांहीं कुंकू लावायला यायची नाहीं. आणि माझी बकोटी धरून ओढायलाही इथं कुणी नाहीं. त्या चिपळूणच्या गोष्टी आतां विसरा म्हणावं ! "

मी निरोप घेऊन निघालें. बनीला आमच्या बंगल्यावर येऊन भेट-ण्याचें आमंत्रण दिलें. घरीं आल्यावर माझ्या मनांत सारखे विचार येत होते. अशी मी तशीच बनी. एकदम तिच्यांत एवढा फरक का पडला ? असा संकोच कां उत्पन्न झाला ? नुसतें लग्न झालें असें म्हटल्यानें एवढा पोक्तपणा तिच्या ठायीं कां आला ? माझें लग्न झालें नव्हतें म्हणूनच मीं अशी पोरकट का ? लग्नामुळें वृत्तीलाही निराळें वळण कां लागतें ? हा परिणाम लग्नाच्या विधीचा कीं परिस्थितीचा ? असें हें लग्न म्हणजे आहे तरी काय ?

पुन्हां तोच प्रश्न उभा राहिला. पण त्याचें निराकरण होण्याची संधी बनी प्रत्यक्ष भेटल्याशिवाय मिळाली नसती. ती बंगल्यावर येऊन मन मोकळें करून बोलल्याशिवाय माझ्या प्रश्नांचा उलगडा झाला नसता. इतरांच्या उत्तरापेक्षां तिचें उत्तर जास्त सप्रमाण ठरणार होतें. ती माझ्याच वयाची होती आणि तिचें लग्न झालें होतें. लग्न झाल्यानें काय वाटतें याचा विचार तिनें केला होता कीं नाहीं याची मला खात्री नव्हती. लग्न होणें म्हणजे कांहीं

तरी विशेष व्हाणें असें माझ्याप्रमाणें तिला वाटलें असतेंच असें नाहीं. जी मुलगी आहे तिचें लग्न होणारच, याच प्रापंचिक प्रवाहाबरोबर वाहावत जाऊन ती पोक्त बनली होती. इतर मुली लग्न झाल्याबरोबर हूडपणा टाकून देतात, तसाच तिनें तो टाकून दिला होता. विचारपूर्वक कोणतीही गोष्ट ती करीत असावी असें मला वाटलें नाहीं. याला कारण, माझा स्वतःबद्दलचा अभिमान.

'मी कुणीतरी आहें' अशी तीव्र जाणीव पहिल्यापासून माझ्या हृदयांत जागृत होती. इतर मुली माझ्यासारख्या नाहींत, प्रत्येक गोष्ट माझ्यासारखी बारकाईनें विचक्षणापूर्वक पाहायची इतर मुलींना संवय नाहीं, असें माझ्या आत्माभिमानामुळें मला वाटत असे.

ठकीच्याबद्दल मीं असें म्हटलें नसतें. ठकी इतर मुलींसारखी नव्हती. ती बुद्धिमान होती. लग्न झाल्यानंतर वृत्तींत फरक कां होतो याची विचक्षणा बनीपेक्षां ठकीनेंच जास्त बारकाईनें केली असती.

पण तिची भेट होण्याचा संभव नव्हता. बनीची इच्छा असती तर ती ठकीला भेटूं शकली असती. कारण तिचेंही सासर मुंबईलाच होतें. पण बनी ठकीला भेटायला जाणार नाहीं—कदाचित इच्छा असली तरी तिला जातां येणार नाहीं—हें मला माहीत होतें.

मी मुंबईला गेलें तर ? माझी परीक्षा आतां जवळ आली होती. परीक्षेसाठीं मी मुम्बईला जाणार होतें. पण ठकीचा पत्ता मला कसा मिळणार ? परीक्षा पास झाल्यावर—

मी परीक्षा पास होणार याची माझ्या शिक्षकांप्रमाणे मलाही खात्री होती. मी कॉलेजांत जाणार होतें, पण तीं मुंबईच्या नव्हे. दादा मुंबईच्या कॉलेजांत जात होता, पण बाबा मला पुण्याला ठेवणार होते. म्हणूनच ठकीची भेट लवकर होण्याचा संभव नव्हता.

म्हणूनच निदान बनीशीं तरी पोटभर बोलायला मिळावें म्हणून मी फार उत्कंठित झालें होतें.

---

# प्रकरण २१ वें

# तिघींचे अनुभव

पुढल्या रविवारपर्यंत बनीची भेट होण्यासाठीं मला थांबावें लागलें असतें. पण त्या आठवड्यांत बुधवारीं कीं गुरुवारीं कसलीशी सुट्टी होती. त्या दिवशीं बनीला बोलावून आणण्याचें मी ठरविलें.

माझ्या नित्याच्या संवयीप्रमाणें बनीच्या घरीं घडलेली हकिगत मी आईला सांगितली. मला उत्पन्न झालेले प्रश्नही तिच्यापुढं मांडले. त्यावेळीं ती म्हणाली, "लग्न झालेली मुलगी तूं पाहिली नाहींस म्हणून तुला हें असं वाटलं. प्रत्येक मुलीच्या बाबतींत असाच फरक होत असतो. तो का होतो हें त्या मुलीला कळत नाहीं. माझ्या लग्नांत मी बनीपेक्षांही लहान होतें पण तो फरक माझ्या लक्षांत आला होता. माझं मलाच आश्चर्य वाटे, कीं माहेरीं मी तशी कां आणि सासरीं अशी कां! माहेराहून सासरीं जातांना—अगदीं वरातीच्या वेळींच—आईबाप गळ्यावर गळा टाकून रडूं लागतात. तिथूनच पहिल्या परिणामाला सुरवात होते. कुणी माणूस मेलें तर जेवढ्या मोठ्यानं रडतात तेवढ्याच आक्रोशानं रडत मुलीची सासरीं पाठवणी होते. मुलीच्या मनावर तोच पहिला धक्का बसतो. तिला वाटतं आपण या घराला आंचवलों. वरातीनंतर नवरीला फार दिवस सासरीं ठेवित नाहींत आठपंधरा दिवसांत ती परत येते त्यावेळीं पुन्हां आपलं ओळखीचं घर सांपडलं असं तिला वाटूं लागतं. थोडासा जीव थाऱ्यावर पडतो न पडतो तोंच पुन्हां सासरचं मूळ येतं. पुन्हा ती सासरी जाते. वरातीच्यानंतर ज्यावेळीं ती सासरीं जात असते त्यावेळीं कुणीतरी माहेरची ओळखीची मुलगी पाठीराखीण म्हणून तिच्याबरोबर जात असते. तेवढाच थोडासा आसरा असतो. तितकंसं चुकल्यासारखं वाटत नाहीं. परकी माणसांत येऊन पडलें असं वाटत असलं तरी घडीभर माहेरच्या गोष्टी बोलून जीव मोकळा करायला कुणी तरी पाठीशीं असतं. पण दुसऱ्या खेपेला तसं होत नाहीं. त्यावेळीं एकटं जावं लागतं आणि मग मात्र आभाळ फाटल्यासारखं वाटतं. आपलं लग्न झालं

अशी खूण पटते ती याचवेळीं. याचवेळीं वाटूं लागतं कीं लग्न म्हणजे एका घरचा मृत्यू आणि दुसऱ्या घरांत नवा जन्म. पोरकेपणा येऊं लागतो तो या दुसऱ्या खेपेच्या सासरीं जाण्याच्या वेळीं. त्यावेळीं काय वाटतं तें सांगतां यायचं नाहीं. आभाळ फाटल्यासारखं वाटतं असं जे मी म्हटलं तेंच त्याचं खरं वर्णन. सासरीं म्हणून ज्या घरीं येतों त्या घरीं खंडीभर माणसं असतात, पण सारीं अनोळखी. बरं, अनोळखी समजून त्यांच्याशीं वागतां येत नाहीं आपलेपणा तर दाखवला पाहिजे आणि इकडे कुणाची ओळखही नाहीं. नावं सुद्धां धड माहीत नसतात! प्रत्येकाला नवीननवीन उपपदं लावावीं लागतात. कुणाला भावजी म्हणावं लागतं, त्यांत कांहीं धाकटे असायचे कांहीं मोठे असायचे! तीच गत मामंजींची! तीच गत वन्संवहिनींची. वन्संना वहिनी म्हणावं आणि मामंजींना भावजी म्हणावं आणि अशी चुक झाली कीं सर्वांनीं अगदीं उचलून धरावं, असंच आपलं कित्येक दिवस चालत असतं. ज्याच्यासाठीं म्हणून परक्या घराला आपलं म्हणायचं त्या नवऱ्याचं मुळीं नावच घ्यायचं नाहीं. त्याच्याशीं बोलायचं नाहीं. त्याची ओळख व्हायची नाहीं. त्याची ओळख करायचा प्रयत्न करायचा नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याच्याकडे नुसतं पाह्यचं सुद्धां नाहीं. एवढया भरल्या घरांत अगदीं अनोळखी राहते अशी तेवढीच एक व्यक्ति. ज्याच्या हात धरून या परक्या घरीं यायचं त्याची नुसती तोंडओळख देखील पटूं नये, ही अशी रीत तरी काय असं मला राहून राहून वाटत असे. एका दिवसाची गोष्ट मला आठवते. स्नानाला पाणी पाहिजे होतं. 'मी देऊं का पाणी?' असं मी सहज कुठं चुकून म्हटलं, तर घरांतल्या साऱ्या माणसांनीं काहूर करून घर डोक्यावर घेतलं. पुन्हां म्हणून कधीं अशी चूक मी केली नाहीं. पण मला आश्चर्य वाटे तें हेंच कीं, यांत चुकलं काय? दिराशीं बोललं तर चालतं, मामंजींच्या प्रश्नाला उत्तर देतां येतं, सास्वा, जावा, नणंदा यांच्याशीं बोलायला तर कुणाचीच आडकाठी नाहीं, मग ज्याच्यासाठीं हें परकं घर पत्करलं त्याच्याशींच कां बोलायचं नाहीं? माहेरीं गेलें त्यावेळीं माझ्या आईला मी विचारलं सुद्धां. तिला माझ्या प्रश्नाचंच आश्चर्य वाटलं. 'नवऱ्यांशीं कधीं बोलतात का?' एवढंच ती म्हणाली. मला वाटलं नवऱ्यांशीं बोला-

यचं नाहीं—अगदीं जन्मभरसुद्धां बोलायचं नाहीं का ! मग तिथं आपलेपणा कसा वाटणार ! आधीं परक्या घरीं जायचं, सारीं परकी माणसं आपलीं म्हणायचीं आणि ज्याच्यासाठीं या परक्यांना आपलीं म्हणायचीं त्या मुख्य व्यक्तिशीं मात्र परक्यासारखं वागायचं ! या असल्या तिरपगळ्या आचारामुळंच तो पोक्तपणा अंगीं येतो. पोक्तपणाला कारण ही सक्तीची आपुलकी. बनीचा काय अनुभव असेल तो तिचा तिलाच विचारून पहा पण माझा अनुभव हा असा आहे. देव करो आणि असला अनुभव घेण्याचा प्रसंग तुला न येवो ! ”

आईच्या या आशीर्वादामुळं त्या अनुभवाची तीव्रता मला अजमावतां आली.

सुट्टी पडतांच मी गाडी पाठवून बनीला बोलावून घेतलें. इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर मी बनीला म्हटलें, “ लग्न झाल्यामुळं तुझ्यांत फरक झाला असं नाहीं का तुला वाटत ! ”

बनी म्हणाली, “ माझ्यापेक्षां तें तुलाच जास्त कळेल. पण लग्न न झालं असतांही तुझ्यांत मात्र फरक झालेला दिसतो. ”

मला आश्चर्य वाटलें. माझ्यांत फरक झाला असेल अशी शंका सुद्धां माझ्या मनांत आली नव्हती. आणि म्हणूनच मी बनीला तसा प्रश्न केला.

ती म्हणाली, “ तसा म्हणजे विशेष कांहीं फरक झाला आहे असं नाहीं. आधीं मुळचीच तूं धट्ट. त्यांत पांचचार वर्षांत जेवढा फरक व्हायचा तेवढा झाला आहे असं म्हटलं तरी चालेल. त्यांतून तूं शाळेंत जाते आहेस, इंग्रजी शिकते आहेस, कसली मेली ती परिक्षा—त्या परिक्षेला देखील यंदा बसणार आहेस म्हणे ! मोठमोठया साहेबलोकांतून फिरतेस, शास्त्रीपंडिताशीं भांडतेस, तेव्हां तुझ्या अंगीं पोक्तपणा हा यायचाच. तुझ्या बोलण्यांत ठसका जास्त आला आहे. चिपळूणांत देखील तो होता—नाहीं असं नाहीं—पण आतां तो अगदीं कानाशीं शिरकतो एवढंच. ”

“ पण माझी मुद्रा पालटली आहे का ? ” मी विचारलें.

थोडा वेळ विचार करून बनी म्हणाली, “ नाहीं. तशी मुद्रा कांहीं पालटल्यासारखी वाटत नाहीं. ”

मला तेवढेंच समाधान वाटलें. मी म्हटलें, "पण मी तुला सांगतें, जसा तुझा शब्द पालटला आहे तशीच तुझी मुद्राही पालटली आहे. त्यावेळीं तूं अगदीं अवखळपणें बोलत होतीस, पण आतां अगदीं कशी विचार करून बोलल्यासारखीं वाटतेस. मुद्रेवरचा मोकळेपणा जाऊन तिथं मोठेपणाची झांक आली आहे. एवढीशी दिसतेस पण मुद्रा मात्र एकाद्या पोक्त बाईची. मी मोठमोठ्या गोष्टी बोलतें—अगदीं पोक्त माणसासारख्या मोठ्या गोष्टी बोलतें—पण मी पोक्त दिसतें का ? नाहीं ना ? मग कांहींच न बोलतां तूं पोक्त कशी झालीस ? "

बनी माझ्याकडे सारखी टक लावून पाहात राहिली. जसें कांहीं तिला माझें भाषण कळलेंच नाहीं.

क्षणभर थांबून ती विनचुकपणें म्हणाली, "हो, असं आहे खरं. मेलं लग्न झाल्यावर हें असं होतंच. तो कन्याच्या पाण्याचा गुण आहे असं म्हणतात. कसं आपलं अगदीं चमत्कारिक वाटूं लागतं. काय होतं तें कांहींच सांगतां येत नाहीं. पण कांहीं तरी बदललं आहे असं मनाला वाटूं लागतं. "

मला आईच्या शब्दांची आठवण झाली. आईनें परिस्थिती पडताळून पाहिली होती. बनीनें कसलाच विचार केला नव्हता.

नंतर तिच्या सासरच्या गोष्टी निघाल्या. सासऱ्याचा स्वभाव, सासूबाईचा कडकपणा, नणंदांची चुगलखोरी आणि दीरांचा आकस्ताळीपणा वगैरे महाराष्ट्रीय कुटुंबांतील मामुली गोष्टी तिनें विस्तारपूर्वक सांगितल्या; पण नवऱ्याचा उल्लेखही केला नाहीं.

मीं तिला विचारलें, "मुंबईला तुझ्या सासरीं तुझा नवरा राहातच नाहीं का ?"

ती चमकली, लाजली, तिचे गाल लाल झाले आणि ती म्हणाली, "हें काय विचारतेस ! "

"मग इतक्या सर्वांच्या गोष्टी सांगितल्यास, तिथं नवऱ्याची गोष्ट कांहींच कशी सांगितली नाहींस ! "

"कांहीं घडलंच नाहीं तर सांगूं तरी कुठून ! "

"त्याचा स्वभाव कसा काय आहे ! "

कांहींच न बोलतां ती स्तब्ध राहिली.

मी बळेंच आश्चर्य ओढून आणून म्हटलें, " तुझ्या नवऱ्याचा स्वभाव तुला माहित नाहीं ? " तिनें नुसत्या मानेनेंच नाहीं म्हटलें, त्यावेळीं मी पुन्हां प्रश्न केला, " मग तुझी त्याची ओळख तरी आहे का ? समज, तो यावेळीं रस्त्यानं जात असेल तर हा आपला नवरा एवढं तरी तुला ओळखतां येईल का ?"

ती क्षणभर घुटमळली आणि विचार करून म्हणाली, " खात्रीनं सांगतां यायचं नाहीं. मी अजून चांगलंसं निरखून पाहिलं नाहीं "

आईच्या म्हणण्याचा पडताळा पटला. मी आणखी खोंचून विचारलें त्यावेळीं ती म्हणाली, " वर डोळे करून पाहण्याचा मुळीं धीरच होत नाहीं. भीति कसली वाटते तें सांगतां येत नाहीं खरं पण भीति वाटते एवढं मात्र खरं. नुसतं वर डोळे करून पाहायला सुद्धां मन दचकतं. मुंबईची वस्ती, दाराखिडक्यांचं बिऱ्हाड. पण घरीं येणं झालं कीं जीव चाचालल्यासारखा होतो. कधींदा थट्टा करतात, पण ते देखील कसंसंच वाटतं. अगदीं एका कोपऱ्यात दडून असतें—"

पुढें कांहीं तरी बोलावें असें बनीला वाटत होतें खरें पण वर्णन कसें करावें हें तिचें तिलाच कळेना. क्षणभर थांबून ती म्हणाली. " तूं विचारलंस तेव्हां हें सारं नजरेसमोर आलं. पण काय होतं तें मला सांगतां येत नाहीं- आतां पुन्हां सासरीं जाईन त्यावेळीं अगदीं लक्षपूर्वक ध्यान ठेवीन आणि मग काय होतं तें अगदीं बिनचुक तुला सांगेन. एवढं खरं कीं, परक्या घरीं जायचं आणि त्या घराला आपल्या माहेरापेक्षां देखील स्वतःचं घर समजायचं हें अगदीं कसंसंच वाटतं. जीव अगदीं घाबरल्यासारखा होतो. मन मोकळं करून बोलावं म्हटलं तर मायेचं कुणी माणूस जवळ नाहीं. सारीं अनोळखी माणसं. माझं हें माहेर तुला माहीतच आहे. सावत्र आई ही अशी, तरी देखील वाटतं कीं अगदीं पळून माहेरीं जावं. दुष्ट असली तरी ती ओळखीची तरी आहे. पण सासरचीं माणसं सुष्ट आहेत कीं दुष्ट आहेत हेंच मुळीं कळत नाहीं ! आणि सर्वांत मोठं कठीण तें हें, कीं ज्यांच्याशीं गाठीं पडल्या त्यांच्याकडे नुसतं पाहतां सुद्धां येत नाहीं. "

अगदीं तेच शब्द ! एक पिढी उलटून गेली तरी देखील आईच्या आणि

बनीच्या अनुभवांत अंतर पडूं नये ना ? चर्रकन् माझ्या अंगावर कांटा आला. आपलेंही असंच होणार का, असा प्रश्न उभा राहिला. समोर बनी बसल्याचीही क्षणभर विस्मृति पडली.

बनी म्हणाली, "तुझं कुठं आहे लक्ष ? मी काय विचारलं तें ऐकलंस तरी का ?"

खरोखरच तिचा प्रश्न माझ्या कानीं गेला नव्हता. मी प्रांजळपणें तसें कबूल केलें. तेव्हां ती म्हणाली, "बरं तर पुन्हा विचारतें, तुझ्या लग्नाचं कांहीं घाटतं आहे का ?"

काय उत्तर द्यावें, याचा मला प्रश्न पडला. मी नुसतें म्हटलें, "सध्यां माझं शिक्षण चाललं आहे, तें आधीं पुरं व्हायचं आहे."

डोळे फाडून माझ्याकडे पहात बनी म्हणाली, "इश्श, हें ग काय ? म्हणजे अशी शिकणार आहेस किती आणि किती वर्षं ? आणि शिक्षणासाठीं का लग्न थांबवून ठेवायचं ?"

बनीला आश्चर्य वाटलें, याचें मला कांहींच वाटलें नाहीं. सार्वत्रिक समजच तसा होता. मग तिनें तरी तसें का म्हणू नये ? तोच प्रश्न माझ्यासमोर होता. त्याच प्रश्नाच्या सांखळींतील एक दुवा सोडवण्यासाठीं मी बनीला घरीं बोलावून घेतलें होतें.

मी गंभीरपणानें उत्तर दिलें, "बने, या गोष्टीचं तुला आश्चर्य वाटतं, माझ्या आईबापांना तसं वाटत नाहीं. म्हणूनच माझं शिक्षण पुरे होईपर्यंत माझ्या लग्नाची गोष्ट निघणार नाहीं."

माझ्या उत्तरानें बनी अगदीं स्तंभित झाली. पुढें काय बोलावें हें सुद्धां तिला सुचेना.

बोलण्याची दिशा बदलली आणि पुन्हां आम्ही चिपळूणच्या गोष्टी काढल्या. ठकीविषयीं गोष्टी निघाल्या तेव्हां ती म्हणाली, "मला बरोबरसं माहीत नाहीं खरं, पण ठकीच्या लग्नाच्या बाबतींत कांहीं तरी मानगड झाली होती. ज्या मुलाशीं तिचं लग्न झालं तो मुंबईत कुठल्याशा छापखान्यात असतो म्हणे. ती लग्नाला नाखूष होती, हट्ट घेऊन रडत बसली होती. पण तिचं ऐकतं कोण? लग्न

झालं, सारे संस्कार झाले आणि ती नवऱ्याबरोबर मुंबईला गेली देखील. नवरा मुलगा असं नुसतं म्हणायचं म्हणून म्हणायचं पण आहे चांगला तीस चाळीस वर्षांचा असं म्हणतात. मी कांहीं पाहिला नाहीं! जायचं माझ्या मनांत होतं! पण तेल्याघरच्या लग्नाला ब्राह्मणाच्या मुलीला थोडीच कुणी जाऊं देणार! लग्न झाल्यानंतर तिची भेट घेईन म्हणून म्हणत होतें. पण त्यावेळीं माझंही लग्न झालं होतं, मीही परस्वाधीन होतें. भेटावं असं फार मनांत होतं पण शेवटीं कांहीं घडून आलं नाही."

"तिचा पत्ता तुला माहीत आहे काय?" मी विचारलें.

"तिचा पत्ता कांहीं माहीत नाहीं," बनी म्हणाली, "पण तिच्या नवऱ्याच्या छापखान्याचं नांव माहीत आहे. गेलीस कधीं तर पहा तपास करून."

तिनें ज्या छापखान्याचें नाव सांगितलें तो छापखाना चांगला प्रख्यात होता. पण तिथें जाऊन तपास कसा करायचा? ठकीच्या नवऱ्याचें नाव मला माहीत नव्हतें आणि बनीलाही माहीत नव्हतें. तरीही मी छापखान्याचें नांव टिपून घेतलेंच.

बनी निघून गेली. झाल्या गोष्टीबद्दल मी विचार करूं लागलें.

कित्येक पिढ्या होऊन गेल्या. पण परिस्थिती होती तशीच होती. आईच्या आणि बनीच्या अनुभवात कांहींच फरक नव्हता. आई उघड्या डोळ्यांनीं पहात होती आणि बनी झांकल्या नजरेनें पुढें पुढें जात होता, एवढाच काय तो दोघांच्या अनुभवांतला भेद.

याच सुमाराला कमलेचें लग्न झालें. ती आपल्या सासरीं निघून गेली. तिचें सासरही मुंबईलाच होतें. कांहीं दिवसांनीं तीही फिरून माहेरीं आली.

अनुभवाच्या यादींत आणखी भर टाकण्यासाठीं मी तिची भेट घेतली.

तिचें घराणें कारकून पेशाचें होतें खरें पण दैवयोगानें ती व्यापारी पेशांत जाऊन पडली होती. तिचा सासरा फार श्रीमंत होता. मुंबईत त्याची स्वतःच्या मालकीची चाळ होती, पण आमच्या दृष्टीनें त्याचा दर्जा सामान्य होता. तो एक तंबाखूचा व्यापारी होता. नवरा मुलगा चुटपुटतें इंग्रजी शिक्षण घेऊन

बापाच्या धंद्यांत पडला होता. आम्हां लोकांच्या दृष्टीनें ही परिस्थिती अव्वल दर्जाची नव्हती. कमाचा नवरा एखाद्या ऑफिसांतला कारकून असता, त्याला पन्नास रुपये पगार असता, वीस रुपये भाड्याच्या खोलींत त्याला राहावें लागलें असतें, तरीही आमच्या दृष्टीनें तें योग्य झालें असतें.

मुंबईत त्याच्या स्वतःच्या मालकीची चाळ होती, दरमहा सातआठशें रुपये भाडें येत होतें, व्यापारधंद्यात आणखी दरमहा हजारपांचशांची प्राप्ती होती, घरची स्वतःची दोन घोड्यांची गाडी होती, तरीही आमच्या दृष्टीनें तो एक क्षुद्र दुकानदार होता. याला सामाजिक दर्जा नव्हता–तो पांढरपेशा नव्हता.

मी कमाला भेटायला गेलें त्यावेळीं तिच्या आईचें जें भाषण झालें त्यावरूनच मी हा निष्कर्ष काढला.

स्वतः कमानें आपल्या परिस्थितीचा कांहींच विचार केला नव्हता. ती ज्या घरीं गेली होती त्या घरांतील सर्व माणसें बहुधा अशिक्षित होतीं. त्यांच्या घरांत एकादें वर्तमानपत्र चुकूनसुद्धां येत नसे, तिथें पुस्तकांची काय कथा! बायकोला वाचनाची आवड आहे याची आठवण असल्यामुळें नवरा मुद्दाम पुस्तकें घेऊन येत असे आणि स्वतः वाचण्याचा बहाणा करून तीं तिच्या हातीं मिळतील अशा खुबीनें टाकून जात असे. त्याला शिक्षणाची आवड होती, चांगलें बी. ए. एम्. ए. व्हावें असें त्याला वाटत होतें, पण परिस्थितीमुळें–धंद्यांत बापाच्या हाताशीं काम करणाऱ्या सचोटीच्या माणसाची जरूरी भासल्यामुळें–त्याला शिक्षण सोडून द्यावें लागलें होतें. ‘ एवढा उद्योग धंदा असतांना कॉलेजांत जाऊन असे काय दिवे लावणार आहेस ? ” असें त्याचा बाप म्हणत असे. शिक्षणाच्या अभावीं तो अंतरांत दुःखी असावा असा कमाचा कयास होता.

बाकीची हकिगत सर्व कांहीं बनी सारखीच. सासू, नणंदा, जावा, सासरे, दीर, सगळे कांहीं त्याच नमुन्याचे. तितकीच बोलायची चोरी! मात्र नवऱ्याच्या स्वभावांत भेद होता. कुणी नाहीं असें पाहून तो कमाशीं बोलण्याचा प्रयत्न करी. कोणतें पुस्तक पाहिजे म्हणून विचारी. पण ही गोष्ट चुकून कुणाच्या नजरेला आली तर घरचीं सारीं माणसें एकच हलकल्लोळ करून सोडीत असत.

लग्न झाल्यावर कमाची मुद्राही पालटली होती पण तिच्यावर थोडीशी दुःखाची छटा आली होती, असमाधानाचा डाग दिसत होता.

बनीचें तसें नव्हतें. आल्या स्थितींत तिला समाधान वाटत होतें. लग्न झाल्याचा तिला एकप्रकारें आनंद झाला होता. आहे या स्थितीपेक्षा कांहीं निराळी स्थिती प्राप्त होणें शक्य होतें, याची तिला जाणीव नव्हती.

पण तोच पोक्तपणा कमाच्या चेहेऱ्यावरही दिसत होता, यांत मात्र कांहीं शंका नाही. ब्राह्मण असो कीं ब्राह्मणेतर असो, गृहस्थिति तीच, एवढें मात्र मला पटलें.

या दोघींबद्दल मी जसजसा विचार करूं लागलें, तसतसें माझें मस्तक भणाणून गेलें. हें असें कां होतें याचा नीटसा उलगडा मला करतां येईना. अनुभवाशिवाय या परिस्थितीचें निदान मला करतां आलें नसतें.

आणि तो अनुभव तर मला नको होता. पुन्हां पुन्हां वाटे, कीं ठकी भेटेल तर काय बहार होईल! माझी खात्री होती कीं, तिची वृत्ति माझ्यासारखीच होती. माझ्या नजरेनें पाहाणारी माझ्या मैत्रिणींत एक तीच होती. तिच्या प्रत्यक्ष अनुभवाचा फायदा माझ्या स्वतःच्या अनुभवाच्या जोडीला आला असता.

पण तिची भेट कशी होणार! तिचा पत्ता कसा मिळणार! योगायोगावर नजर ठेऊन स्वस्थ राहाण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता.

परिक्षेचे दिवस जवळ येत चालले होते. सर्व लक्ष अभ्यासावर लावणें अवश्य होतें, त्यामुळें हे सर्व विचार घटकाभर दूर ठेवावे लागले. मी मन लावून अभ्यास केला असेल, तर तो याच सहामाहींत. यापूर्वी अभ्यासासाठीं म्हणून मान मोडून मी कधींच बसत नसें. पण आतां बसतें आहे हें पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. कीर्तिकरांच्या बंगल्यावर जायलाही फारसा वेळ मिळत नसे, इतकेंच नव्हे तर शेजारच्या बाबीशेटकडे जाणें देखील फार लांबणीवर पडूं लागलं होतें.

त्याबद्दल ते सपाटून थट्टा करीत असत, म्हणत असत, " गोदूताईनं अगदीं मनावर घेतलं आहे. अभ्यासाचा अगदीं धुव्वा उडवून द्यायची ही जोराची तयारी पाहिली म्हणजे वाटतं, कीं ही पहिला नंबर पटकावणार! चार

पांच हजार पुरुष विद्यार्थ्यांची चांगलीं नाकं ठेंचणार! जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप मिळवून रत्नागिरी हायस्कूलचं नांव पुन्हां वर काढणार! शास्त्रीबुवा तर अगदीं खात्रीच देताहेत—"

त्यांनीं असें म्हटलं कीं मला मूठभर मांस चढत असे. मस्तक भिरभिरून जात असे. चार–पांच हजार विद्यार्थ्यांवर जय मिळवून पहिला नंबर पटकावण्याची महत्त्वाकांक्षा सळसळून वर येत असे.

सर्व विचार बाजूला टाकून मी या एकाच महत्त्वाकांक्षेच्या मागं लागलें. प्रिलिमिनरी परिक्षा झाली आणि त्यांत माझा पहिला नंबर आला.

पुरुष विद्यार्थ्यांनीं ओरड केली कीं, मास्तर लोकांनीं गोखल्यांच्या गोदूला पक्षपातानें जास्त मार्क देऊन पहिल्या नंबरावर आणून बसवलें.

---

## प्रकरण २२ वें

# पहिला नंबर



मॅट्रिकच्या परीक्षेसाठीं मुंबईला जाणें भाग होतें. चिपळूण आणि रत्नागिरी या दोन गांवाच्या पलीकडे माझी प्रवासाची मजल गेली नव्हती. अरबी समुद्राची सीमा ओलांडून मुंबईला जाणार, या कल्पनेनें मला मोठा आनंद झाला होता.

मुंबईबद्दल मी निरनिराळ्या प्रकारच्या कितीतरी गोष्टी ऐकल्या होत्या. मुंबई पाहाण्याची उत्कंठा कुणाला होत नाही ? बाहेरगांवीं असेपर्यंत मुंबई पाहाण्याची संधि येणें म्हणजे एक कांहींतरी अजब गोष्ट आहे, असें वाटत असतें. सहसा आपला गांव सोडून न जाण्याची—कामाशिवाय गांव सोडून न जाण्याची—कोंकणच्या लोकांची प्रवृत्ति फार. त्यामुळें ज्यांनीं उभ्या जन्मांत मुंबई पाहिली नाहीं अशीं कितीतरी माणसें रत्नागिरींत दिसून येत असत. मुंबईला जाणारे म्हणजे कॉलेजचे विद्यार्थी किंवा नोकर लोक. व्यापाऱ्यांची संख्या रत्नागिरींत फारच अल्प. आणि तेही व्यापारी म्हणण्यापेक्षां नुसते दुकानदार नांवाला साजेसे असल्यामुळें त्यांचाही प्रवास रत्नागिरीबाहेर थोडाच असे. सरकारी नोकरांना तर घर सोडण्याचीच मुष्कील, तिथें गांव सोडण्याचें नांव कशाला !

बाबांना रजा मिळणें शक्य नव्हतें. माझ्याबरोबर मुंबईला कुणी जावें, हा एक प्रश्न येऊन पडला होता. दादा मुंबईला होता खरा; पण तो रेसिडेन्सींत राहात होता. त्याचीही परीक्षा त्याच सुमाराला होती. आधीं माझ्याबद्दल दादाचा लोभच मोठा, तिथें मुद्दाम माझ्यासाठीं येऊन मला मुंबईला घेऊन जाणें त्याच्या ध्यानींमनीं सुद्धां आलें नसतें.

बाबांचे एक स्नेही मुंबईला गोरेगांवकर बिल्डिंगमध्यें राहात असत. त्यांच्या घरीं मी मुक्कामाला जाणार होतें. आईसुद्धां माझ्याबरोबर जायला तयार झाली. पण पुरुष माणूस कुणीतरी सोबतीला पाहिजे होताच ना ! मग नुसती आई पाठीराखणीसारखी सोबत करायला हवी कशाला ! मी तो बेत

खोडून काढला. आईच्या नजरेनें मी अगदींच लहान मुलगी होतें, पण मला याच वेळीं माझा मोठेपणा प्रस्थापित करायचा होता. पूर्वी एकाद्या वेळीं जर मी मुंबईची सफर मारली असती, तर या वेळीं एकटेंच जाण्याचें बाबत मुद्दाम केलें असतें.

बरोबर कुणाला पाठवावें, याचीं चर्चा चालली असतांना बाबीशेट तेथें आले. त्यांनी मुंबईला नेण्यापासून परत मला रत्नागिरीला घेऊन येईपर्यंतची सर्व जबाबदारी आपल्या आंगावर घेतली.

पण एक अडचण उपस्थित झाली. बाबीशेट आपल्या कुणा नातेवाईकां-कडे उतरले असते. त्यांच्या घरीं मी जाऊन राहणें शक्य नव्हतें. आणि मी ज्या घरीं उतरावें म्हणून तजवीज केली होती, त्या घरीं उतरायला बाबीशेटची तयारी नव्हती.

ते म्हणाले, " मी तिथंही उतरलों असतों, पण मला मोठा संकोच वाटतो. जातीचा माणूस असला किंवा जातीचा प्रपंच न बाळगणारा माणूस असला तर मनाला तेवढं कांहीं वाटत नाहीं; पण गोरेगांवकर बिल्डिंगमधील बिऱ्हाडांत जायचं म्हणजे जरा मन कच खातं. माझ्या जातीच्या माणसाला तिथं खोलीत वावरतांना किती संकोच वाटत असतो, त्याची कल्पनाच केली पाहिजे. चहाचा कप सुद्धां स्वतः विसळून द्यावा लागतो. पूर्वी एकदां मी अनुभव घेतला आहे, तेव्हांपासून कानाला खडा लाऊन घेतला आहे. गोदूला मी तुमच्या मित्राच्या घरीं नेऊन पोंचवीन, परीक्षेच्या मंडपांत घेऊन जाईन, परत घेऊन येईन, हिंडण्यासाठीं तिच्याबरोबर सारी मुंबई पालथी घालीन, पण राहायचा तो आपला आमच्याच माणसांत राहीन. गोदूला तें पटायचं नाहीं हें मला माहीत आहे, पण त्याला उपाय नाहीं. माझा अनुभव तिला केव्हांही मिळणं शक्य नाहीं. कारण तिच्या जातीपेक्षां अधिक उच्च वर्णांची जातच मुळीं नाहीं. तेव्हां उच्च वर्णांच्या लोकांनीं माझ्यासारख्याच्या जातीच्या माणसाची केलेली ओढघस्त अनुभवण्याचा तिला केव्हांच प्रसंग येणार नाहीं."

तात्यांचें म्हणणें मला पटलें नाहीं. मला अनुभव नव्हता आणि अनुभव नव्हता म्हणून तो पाहाण्याचीं उत्कंठा माझ्या मनांत जागी झाली. मी म्हटलें, " तुम्हीं काय म्हणतां तेंच मुळीं मला समजत नाहीं. त्रास त्रास तो असा काय

होणार ? कसा त्रास होतो तो एकदां मला पाहूंद्याच. एक दिवस तरी मी राहाणार तिथंच राहा, आणि नंतर माझी खात्री पटली तर मी होऊनच तुम्हांला जाऊं देईन. ”

चंची सोडीत सोडीत ते म्हणाले, “ काय व्रात्य कार्टी आहे ! नुसता हिला अनुभव मिळायला पाहिजे, म्हणून ही मला हवा तसा अपमान सोसायला लावणार—”

अडकित्त्यानें सुपारी कातरीत एकवार मान खाली घालून, विचार करून ते पुढें म्हणाले, “ ठीक आहे, होऊन जाऊं द्या. तुझ्यासारख्या पोरीला अनुभव आला, तर तुझ्या पिढीपुरती तरी एका घराची सुधारणा होईल. दुसऱ्याचं मन कसं दुखावतं, याचा आधीं सूचना देऊन मग घेतलेला अनुभव तरी तुझे डोळे उघडील. कमी दर्जाच्या समजल्या जाणाऱ्या जातींचा उच्च वर्णांच्या लोकांकडून होणारा अपमान सोसण्याचं भाग्य कांहीं तुझ्या नशिबीं नाहीं. मग आमच्यासारख्याचं दुःख पाहून तरी तुला धडा मिळाला तर तेवढाच मला आनंद होईल. त्यापुढें माझा होणारा अपमान मी बॅगेत घालून गुंडाळून रत्नागिरीला घेऊन येईन. तुला माहीत नाहीं गोदे, रत्नागिरींत आम्ही शिष्ट म्हणून मिरवतों ते आमच्या जमातीपुरतेंच. बाकीचे अनुभव तूं पाहिले आहेस ! तुला वाटत असेल, कीं तूं एक तशा वागत नाहीस, आमच्याकडे परकेपणा बाळगित नाहीस, म्हणून सारींच लोकं कांहीं तशीं नाहींत. मुंबईला जाऊन सुद्धां माणसं कशीं मागसलेलीं राहातात, याचा एकदां अनुभव घे. ”

दुसऱ्याच दिवशीं आम्हीं मुंबईला जायला निघालों. दोन प्रहरीं बोटींत बसलों. पाहाटेच्या सुमाराला मुंबई दिसूं लागली.

पहिल्यानें खांदेरीच्या ‘ लाइट–हाऊस ’ चा दिवा दिसूं लागला, त्याचीच मला मोठी गंमत वाटूं लागली. तो दिवा सारखा फिरत होता, आणि त्या फिरत्या दिव्याचे किरण जवळ जवळ आमच्या बोटींत येऊन पडत होते-धक्का जसजसा जवळ येऊं लागला तसतसा दिव्यांचा लखलखाट नजरेला पडूं लागला. जिकडे तिकडे दिवेच दिवे दिसत होते. रत्नागिरी–चिपळूणच्या रस्त्यावरील कंदिलाची कल्पना असल्यामुळें ही दिव लावण्याची उधळपट्टी मला चमत्कारिक वाटं

लागली. त्यावेळीं बराच काळोख असल्यामुळें बंदराची शोभा मला स्पष्ट दिसली नाहीं. पण जिकडे तिकडे आगबोटी दिसत होत्या. त्या आमच्या आगबोटी-पेक्षां किती तरी मोठ्या होत्या. त्यांतून माग काढीत आमची आगबोट चालली होती. मधून मधून एकादीच छोटी बोट चोंचावत जातांना समुद्राच्या पाण्या-तून प्रकाशाचे फवारे उठविल असे.

बोट धक्क्याला लागलेली पाहाण्याचा हा मला पहिलाच प्रसंग होता. रत्ना-गिरीत पडावातून चढावें–उतरावें लागे, पण इथें सरळ बोटींतून अगदीं रस्त्यावर उतरतां येत असल्यामुळें मला त्याचें मोठें कौतुक वाटलें.

हमालाच्या डोक्यावर सामान देऊन आम्ही आवाराच्या बाहेर आलों. बाहेर येतांच बाबीशेट ' व्हिक्टोरिया, व्हिक्टोरिया ' म्हणून ओरडूं लागले. मला आश्चर्य वाटलें. ही 'व्हिक्टोरिया' कोण ? लहानपणापासून 'व्हिक्टोरिया' म्हणजे महाराणी एवढेंच मला माहीत होतें. पण रात्रीं अपरात्रीं मुंबईच्या धक्क्यावर येणारी ही दुसरी व्हिक्टोरिया कोण, याचा ज्या वेळीं उलगडा झाला, त्या वेळीं माझें मलाच हंसूं आलें. मला वाटलें, मुंबईला सारेंच कांहीं विलक्षण असें म्हणतात, तें कांहीं खोटें नव्हे. साठ वर्षें अबाधित राज्य चाल-विणाऱ्या व्हिक्टोरिया महाराणीचें नांव एका भाड्याच्या गाडीला द्यावें !

आम्ही गिरगांवांत आलों त्यावेळीं चांगलेंसें उजाडलें नव्हतें. बाबीशेट मुंबईचे चांगले माहीतगार असल्यामुळें बाबांच्या मित्राची खोली मिळणें कठीण गेलें नाहीं. घरीं आलों आणि सामान कॅलरीतच टाकलें. दरवाजा उघ-डतांच आंतील जागा पाहून मी स्तंमित झालें. एवढीशी खोली, आणि त्यांत चार, पाच माणसें झोंपी गेलीं होतीं. रत्नागिरीचा आमचा शौचकुप देखील या खोलीपेक्षा मोठा होता. याच जागेंत का आपण राहायचें ? मी हळूच बाबीशेटना म्हटलें, " आपण दिवाळीसाठीं वाट पाहायची नाहीं. परीक्षा होतांच रत्नागिरीला परत जाऊं. "

बाबीशेट मोठमोठ्यानें हंसत म्हणाले " येऊन पोंचलो नाहींत तोंच जाण्याच्या गोष्टी कशाला बोलते आहेस ! थोडा दम खा. अजून पाहायचें तें पुढेंच आहे. "

बाबाचे मित्र एक दिवा पेटवून हातीं घेऊन दारांत उभे राहिले. ते माझ्या

फडे क्षणभर टक लावून पाहून म्हणाले, " तूंच कां गंगाधरची मुलगी ? तूं मॅट्रिकच्या परीक्षेला बसणार ? मला नाहीं खरं वाटत ?—" बाबीशेटकडे वळून ते म्हणाले, " हे कोण आले आहेत तुझ्याबरोबर ? तुझ्या वडिलांचे कारकून का ? "

" नाहीं. मीं शेजारी आहें त्यांचा. " बाबीशेट म्हणाले, " दुसरं कुणी येण्याजोगं नव्हतं. गोदूला आमचा कळा फार, तेव्हां मीच आलों हिच्या-बरोबर. माझं नांव बाबीशेट शेटचे. "

कंदील बाबीशेटच्या अगदीं तोंडाजवळ धरून निरखून पाहून ते म्हणाले, " बाबीशेट का ?—" ' शेट' ह्या शब्दावर त्यांनीं बोलतांना मोठा जोर दिला होता. " तुम्ही कुठं जाणार आहांत राहायला ? "

त्या शब्दासरशीं मला मिरमिरी आली. मी म्हटलें, " जिथं मी तिथं ते ! त्या मला सोडून दुसऱ्या कुठंही जाणार नाहींत. "

गृहस्थ आपल्याशींच पुटपुटूं लागला, " मोठी पंचाईत आली "

आम्ही तोंपर्यंत गॅलरींतच उभीं होतों. त्यांनीं एका शब्दानें आम्हांला ' बसा ' देखील म्हटलें नाहीं. ते आंत आपल्या कुटुंबाकडे वळून म्हणाले, " अग ए, हें कसं काय व्हायचं ? हे ' बाबीशेट ' आहेत. यांची इथं कशी सोय होणार ? "

दोघेंही आपसांत कुजबुजूं लागलीं. मी बाबीशेटना म्हटलें, " चला आपण तुमच्याच मित्राच्या घरीं जाऊं ? तुम्ही तसेच ते. मला कांहीं अडचण वाटायची नाहीं. "

पुनः कंदील घेऊन दाराबाहेर येऊन ते गृहस्थ म्हणाले, " असं पहा, मुली, तूं इथं रहा. त्यांना जाऊं दे खाणावळींत—" ते पुढें कांहीं बोलणार होते, पण तिरमिरीसरशीं मी एकदम बाबीशेटना म्हटलें, " कुणी गडी असला तर पहा, आणि हें सामान खालीं न्या ! "

बाबीशेटनीं क्षणभर विचार केला आणि खालून जाणाऱ्या एका पाटीवा-ल्याला हांक मारली. सामान त्याच्या डोक्यावर दिलें, तेव्हां ते गृहस्थ म्हणाले, " जातेस ? बरं बुवा, मर्जी तुझी. गंगाधरचा उगीच गैरसमज मात्र होईल. पण मी तरी काय करणार ? एवढीशी खोली आणि तुझ्याबरोबर हे शूद्र—"

पुढलें भाषण ऐकायला मी तेथें राहिलें नाही. आवीं नीट जिन्याखालीं उतरलें.

झुंजुमुंजु दिसूं लागलें होतें. रस्त्यावर येऊन पुन्हां आम्ही व्हिक्टोरिया केली. आंत बसल्यावर बाबीशेट म्हणाले, " आपण सुखनिवासांतच जाऊं. हल्लीं तो बरी सोय झाली आहे. रहाण्याची देखील तिथं व्यवस्था असते. पूर्वी नुसत्या खाणावळीं होत्या, त्यावेळीं कुणीतरी मित्राकडे उतरावें लागे. आतांही तसाच गेलों असतों, पण आमच्या घरची गोष्ट निराळी. सुखनिवासच बरा."

आम्ही सुखनिवासांत येऊन उतरलों. आमच्या सुदैवानें दोन माणसांच्या सोयीची एक खोली लाभली. इतर खोल्यांतून चार–चार, पांच–पाच माणसांची व्यवस्था केली होती. ही खोली देखील अगदींच लहान होती. एवढ्या लहान खोलींत रहाण्याचा माझ्या लहानशा आयुष्यांत मला केव्हांच प्रसंग आला नव्हता

उजाडलें आणि रहदारीला सुरवात झाली. ती सगळी गडबड आणि धांदल पाहातांच माझा जीव कासावीस झाला. त्या दिवशीं मंडपांतली जागा आम्ही पाहून आलों. मी परीक्षेसाठीं आलें आहें हें ऐकून सुखनिवासांतल्या लोकांना सुद्धां फार आश्चर्य वाटलें. आधीं मुलगी, त्यांतून सारी १४ वर्षांची–आणि मी १४वर्षांची आहे, हें बाबीशेट पुन्हा पुन्हां वाजवून–गाजवून मोठ्या अभिमानानें सांगत असत—आणि ती मॅट्रिकला बसणारी ! सर्वांनाच आश्चर्य वाटत होतें. सर्वच कौतुकानें माझ्याकडे पाहात होते. ती जुनी भावना पुन्हां हृदयांत जागी झाली. मला पुन्हां आठवण झाली. 'मी कुणीतरी आहें'

परीक्षा झाली. माझ्या दृष्टीनें पेपर अगदींच सोपे होते. पण ते कठीण असल्याबद्दलची ओरडही माझ्या कानीं पदोपदीं येत होती. कुणी कठीण म्हणत असत, कुणी सोपे म्हणत असत, दोन्ही प्रकारचे विद्यार्थी परस्पर विरोधी मतें देऊं लागले म्हणजे मला मोठी गंमत वाटे.

परीक्षेचें ओझें खालीं उतरतांच पहिली आठवण झाली ती ठकीचा शोध करण्याची. पण प्रश्न असा आला, कीं चौकशी काय करायची ? तिचा नवरा ज्या छापखान्यांत काम करीत असे तो सर्वांत मोठा छापखाना होता. अर्थातच, तिथें कंपॉझिटर पुष्कळच असण्याचा संभव होता. पण तिथें जाऊन विचारायचें काय ? ठकीचा नवरा कुठें आहे म्हणून कां विचारायचें ?

बाबीशेट म्हणाले, " चल तर खरी, पाहूं तपास करून, पत्ता लागला तर सहजच भेट होईल. न लागला तर नाहीं हें ठरलंच आहे."

आम्ही छापखान्यांत गेलों. बाबीशेटनीं मोठया युक्तीनें तपास करण्यास सुरवात केली. त्या छापखान्याचे मॅनेजर त्यांच्या परिचयाचे होते. कुणी चिपळूणचा तेथी छापखान्यांत कंपॉझिटर आहे का, असें विचारण्यास त्यांनी सुरवात केली. नांवावरून काहीं समजण्याजोगें नव्हतें. मॅनेजरनें यादी काढून पाहिली. त्याच्यावरून त्यांना कांहीं अंदाज करतां येईना. 'फोरमन' ला विचारलें, त्यावरून असें कळून आलें, कीं चिपळूणचे तीन–चार कंपॉझिटर्स छापखान्यांत नोकर होते. मॅनेजरनीं त्या सर्व चिपळूणकरांना बोलावून घेतले आणि प्रत्येकाची जात विचारली. त्यांतील एकजण आपली जात सांगण्यास कांकू करूं लागला. जात विचारण्यांत आपला कांहींतरी अपमान होतो आहे असें त्याला वाटत असल्याचा त्याच्या भाषणावरून कयास काढतां येत होता

माझ्यानें धीर धरवेना. मला वाटलें, हाच तो गृहस्थ असावा. बनीनें सांगितलेलें वर्णनही जुळत होतें. त्याचें वय ३५–४० वर्षांचें असावें. आधींच त्याचा तो कळकट चेहरा आणि त्यापेक्षांही अंगावरचे कळकट कपडे पाहातांच माझ्या हृदयांत चर्र झालें. वाटलें, हाच का ठकीचा नवरा? ठकी भेटण्याविषयीं उत्कंठा होती खरी, पण त्याबरोबरच, त्याला पहातांच, हा ठकीचा नवरा ठरूं नये, असें मनाला वाटत होतें.

मनाचा हिय्या करून मी मधेच तोंड घातलें, " तुमच्या बायकोचं नांव ठकी आहे का?"

त्याच्या तोंडून चटकन् होकार निघून गेला; पण तितक्यांत जीभ चावून तो म्हणाला, " माझ्या बायकोचं नांव ठकी असेल नाहींतर नकी असेल तुम्हाला त्याच्याशीं काय करायचं आहे!"

" ठकी माझी बालमैत्रीण आहे " मीं म्हटलें, " चार–पांच वर्षे झालीं तिच्या भेटीसाठीं मी तळमळतें आहें. तिचा नक्की पत्ता मला कळेना; पण अंदाजानं इथवर आलें "

तो तोंडांतल्या तोंडांत पुटपुटला. 'तिची बालमैत्रीण म्हणे!' माझ्याकडे वळून तो म्हणाला, " रावसाहेब गोखल्यांची गोदू का तूं? एवढ्यासाठींच का मुंबईला आलीस?"